॥ श्री सद्गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥



# यशोविलास.

( संगीत साहित्य-वाङ्मय विविधविचारात्मक, मनोरंजक, लघु व्याख्यानें व लघु लेख- ) संग्रह.

लेखक :-

काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट्, सकलकलाकोविद, रहस्यज्ञ—

**य. स. कोरेकल.**

( काव्य-कुसुम-कलिका, पुष्प-पाकळ्या, सुमन-सौरभ, विचार-वैभव, कौस्तुभ-किरण, यशोबिंब, कलामे नुसरत इ. इ. पुस्तकांचे कर्ते )

सन
१९३९

शके १८६१ मा. श. १२२

किंमत १॥ सूर्ती / १॥। हाली




॥ श्री सद्गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥

# अर्पण-पत्रिका

अखंडमंडलाकारं व्याप्तं येन चराचरं ।
तत्पदं दर्शितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ॥
सर्वश्रुतिशिरोरत्नविराजितपदांबुजं ।
वेदान्तांबुजमार्तंडः तस्मै श्रीगुरवे नमः ॥

**गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः ।**
**गुरुरेव परं ब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥**

भक्तकार्यकल्पद्रुमादि बिरुदांकित, सकलमतस्थापित,
अभिनव शंकराचार्य
ब्रह्मीभूत
**श्रीसद्गुरु मार्तंडमाणिकप्रभु महाराज**
यांचे चरणकमलीं

## सादर समर्पित.

एकनिष्ठ चरणरजांकित, अनन्य बालक:—
यशवंत सदाशिव कोरेकल.



तकार्यकल्पद्रुमादिबिरुदांकित, सकलमतस्थापित अभिनव-शंकराचार्य, गानमार्तंड,
सद्गुरु श्रीमन्मार्तण्ड-**माणिकप्रभु**-महाराज. संस्थान-**माणिकनगर.**



कविवर्य काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट्, सकलकलाकोविद, रहस्यज्ञ—

**यशवंत सदाशिव कोरेकल.**

शाह अली-बंडा, **हैद्राबाद ( दक्षिण. )**

# अनुक्रमाणिका.

॥ श्री गुरु मार्तंड माणिक ॥

# " निरोप घेण्यापूर्वीं "




**यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं त्वाराधनं ते प्रभो ।**

पूर्वाभिवचनानुरूप " **यशोविलास** " आज रसिकांच्या सेवेंत सादर होत आहे. विलास म्हटलें कीं त्यांत विविधता आणि वैचित्र्य असावयाचेंच. किंबहुना त्याशिवाय विलासाची कल्पनाच संभवत नाहीं. सहज ग्रंथ चाळणाऱ्यासही लेखांच्या विविधतेवरून ग्रंथ यथार्थनामा आहे असेंच वाटेल. संगीत, साहित्य, वाङ्मय-विविधविचार आणि वाङ्मयतपाची महति गात गात मनोरंजक द्वितीय खंडांत जुन्या व नव्या गोष्टी ऐकवून, थोडा वेळ बेतावातानें, मर्यादितपणें हंसवून, उमलत्या कालिकांकरितां छोटी छोटी व्याख्यानें आणि लेख लिहून जी त्रिखंडात्मक वाङ्मयसेवा काव्यकौस्तुभ श्री यशवंतरावजींनीं केली आहे त्यावरून ग्रंथाप्रमाणें ग्रंथकारही यथार्थनामा झाले आहेत असेंच कुणासही वाटेल.

प्रस्तुतचा यशोविलास हा "विचारवैभवा"प्रमाणेंच पूर्वप्रकाशित लेखांचा संग्रह आहे. सर्वसाधारण अभिरुचीकडे पाहतां हा ललित-गद्य-गुच्छ सर्वारंभीं प्रकाशित व्हावयास हवा होता; पण वेदांत-प्रवण यशवंतरावजींची स्वाभाविक प्रवृत्ति साधारण जन-मान्यतेहून विद्वज्जन-मान्यतेकडे सहजच अधिक दिसून आल्यानें कर्त्यांच्या संतोषानुरूप वेदान्तग्रंथ आधीं प्रसिद्ध करावा लागला. असो.

प्रथमच दिलेला " सौभद्र समालोचन " हा लेख पुण्यांत साजरा झालेल्या " किर्लोस्कर-सप्ताहाकरितां " सप्ताहचालकांच्या आग्रहावरून लिहिला गेला. या लेखाबाबत गु. प्रो. श्री. नी. चापेकर यांनीं लिहिलेलें पत्र खासगी असलें तरी इथें देण्याचा मोह मला आवरत नाहीं.

" निरतिशय सौहार्दसंपन्न, सत्कवित्रय, मित्रोत्तम, " काव्य-कौस्तुभ " " वृत्तसम्राट् " आदि यथार्थ पदवीविभूषित श्रीमन्महाशय रा. रा. यशवंतराव सदाशिवराव कोरेकल मु॥ द. हैद्राबाद शालीबंडा, प्रमुदरबार यांसी —

परम स्नेहादरपूर्वक कृतानेक साष्टांग नमस्कार.

वि. वि. कार्यक्रमांत लिहिल्याप्रमाणें रविवारीं सकाळींच आपला निबंध वाचण्यांत आला तो एकंदर श्रोतृसमाजास फारच मार्मिक, विद्वत्ता-पूर्ण, रसिकता युक्त असा वाटला व त्याच्या श्रवणानें सर्वांस फार आल्हाद वाटला हें कळविण्यास अत्यंत संतोष व आनंद वाटत आहे. " सौभद्रांतील सूत्रधार नटीच्या प्रवेशावर कै. आण्णासाहेबांच्या नाट्य कृतीसंबंधीं केलेलें रूपक व कल्पनाविष्कार सर्वांस फार हृद्य, रम्य, अभिनव व कौतुकपूर्ण वाटलें. अर्थात् असा सुंदर निबंध धाडल्याबद्दल जाहिररीत्या " मंडळा"तर्फे आभार व्यक्त करण्यांत आले. सप्ताहाचे आतांपर्यंतचे ३ दिवस उत्तम साजरे झाले व बाकीचेही आपल्या आशीर्वादानें साजरे होतील. आपल्या किर्लोस्करसंबंधाच्या कवितांचीही मार्गप्रतीक्षा करीत आहों."

" शितावरून भाताची परीक्षा " करूं गेल्यास " सौभद्र-समालोचना"संबंधीं काढलेले गु. प्रो. चापेकर यांचे उद्गार समग्र ग्रंथा-करितांही अन्वर्थकच ठरतील. " सौभद्र-समालोचन " हें जसें "किर्लो-स्कर-सप्ताहा "करितां मुद्दाम लिहिलें गेलें त्याप्रमाणें " साहित्य " " वाङ्मय-तप " वगैरे लेखही निरनिराळया साहित्य संमेलन प्रसंगा-करितां मुद्दाम लिहिले गेले आहेत. लेखांतील अभ्यासू विचारसरणीच हें सांगेल. प्रहसनें, नाट्यछटा व उमलत्या कळिकांचे लेख वगैरे स्थानिक गणेशोत्सव व शाळा संमेलनासारख्या प्रसंगीं त्या त्या मंड-ळींच्या आग्रहावरून तयार झाले व त्या त्या प्रसंगीं रसिकरंजनाचें कार्यही त्यांनीं उत्तम प्रकारें बजावलें आहे. असो. अशा प्रकारें पूर्व प्रकाशित

लेखांचा संग्रह प्रसिद्ध करण्यांत त्यांनीं रसिकांच्या स्वागतार्थ जीं निरनिराळी फुलें वेंचलीं त्यांचा एक सुंदर गुच्छ तयार करून मी रसिकांप्रत सादर करीत आहें इतकेंच.

श्री. यशवंतरावजींच्या प्रत्येक लिखाणांतून वेदान्त इतका उसळून वर येतो कीं, त्यांच्या अध्यात्म प्रवणतेवर पुनः कांहीं लिहिण्याची गरजच उरत नाहीं. किंबहुना, त्यांची ही अध्यात्मप्रवृत्ति एव्हांशी सुप्रसिद्ध – वाटल्यास अति प्रसिद्ध म्हणा — म्हणूनच कांहींशी अयथार्थतः प्रसिद्ध झाली आहे. वेदान्ताचें वावडें असलेल्या युगांत वेदान्ती मनुष्य म्हटला कीं, लोक त्याचेकडे जरा चमत्कारिक नजरेनें पाहूं लागतात व त्याचेपासून जरा दूर राहूं इच्छितात. हाच न्याय अध्यात्मपर वाङ्मयासही लागू झाला आहे. लेखांत वेदान्त आहे असें कळलें कीं, अशा लेखांचा दुरूनच परामर्श घेतला जातो व बव्हंशीं परामर्श टाळलाच जातो म्हटलें तरी चालेल. मग हें असलें लिखाण इतर दृष्टीनें कितीही सुंदर वा उपयुक्त असो. जवळ जवळ असाच न्याय श्री. यशवंतरावजी विषयीं व त्यांच्या वाङ्मयाविषयीं झालेलासा दिसतो. नाहींतर गद्य आणि पद्य दोहोंतूनही, इतकेंच नव्हें, तर उर्दू आणि हिंदी आदि भाषांतूनही इतकी प्रचंड ग्रंथनिर्मिति होऊन सुद्धां सर्वसाधारण साहित्यिक जनतेंत यशवंतरावजींच्या वाङ्मयाचा प्रसार व्हावा तसा झालेला दिसून येत नाहीं; पण रसिकांनींमात्र रहस्यज्ञ यशवंतराव - जींच्या वाङ्मयाचा आस्वाद भरपूर घेतला आहे हें त्यांना निरनिराळ्या साहित्यिकांकडून व समाजाकडून मिळालेल्या गौरवपूर्ण पदव्याच सांगतील.

वेदान्त आणि वेदान्तीप्रवृत्तीचा मनुष्य यासंबंधीं सार्वत्रिक प्रसृत असलेल्या आणखी एक दोन महत्त्वाच्या समजुती म्हणजे वेदान्ती मनुष्य रूक्ष असतो आणि जीवनाकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोन अतिशय उदासवाणा असतो, या होत आणि पूर्णांशानें नसल्या

तरी बऱ्हंशीं या समजुती खऱ्या असल्याचें पुष्कळ वेळां अढळून येतें. श्री. यशवंतराव कोरेकल हे अद्वैतवादी वेदान्ती म्हणून प्रसिद्ध झाले आहेत; नव्हें तर ते अगदीं संपूर्णतया तसे आहेतच. तेव्हां रूक्षता आणि उदासीनता या दोन आक्षेपांची झळ त्यांनाही थोडीबहुत लागणें शक्यच आहे. तेव्हां या विषयीं कांहीं शब्द लिहिले तर प्रस्तुत ते अनुचित होईलसें वाटत नाहीं स्वभावसहज क्लिष्टतेमुळें ( हा दोष कविवर्यांनीं स्वतःच आपल्या सुमनसौरभ तृतीयोद्भवाच्या "हृद्गतावि– ष्करणांत " प्रांजलपणें कबूल केला आहे ) त्यांच्या गद्य व पद्य दोन्ही लिखाणास किंचित् रूक्षता आली असली, तरी या रूक्षतेचें महत्त्वाचें कारण म्हणजे श्री. यशवंतरावजींची प्रचंड ग्रंथ निर्मिति होय असें मला वाटतें. प्रचंड ग्रंथनिर्मितीच्या बावतींत रहस्यज्ञ श्री. यशवंत– रावजींची तुलना फक्त एक काव्यसम्राट् मोरोपंतांशींच होऊं शकेल असें मला वाटतें. पंतांचें काव्य रूक्ष असूनसुद्धां हृद्य आहे हें कुणीही रसिक कबूल करील. श्री. यशवंतरावजींचेंही असेंच आहे. हें लिहित असतांना श्री. कृष्णाकुमार यांनीं कविवर्यांच्या काव्याचें जें मार्मिक परीक्षण केलें आहे त्यांतील पुढील ओळी मजसमोर उभ्या राहतात.

" कोरेकलांनीं खरोखर आपल्या कवितांची निवड कसोशीनें करून त्यांचा वेगळा संग्रह प्रसिद्ध करावा अशी आमची त्यांना आग्रहाची विनंति आहे. निर्जीव कवितांबरोबर अर्थगौरवानें पूर्ण व प्रसादपूर्ण असलेल्या कविता मिसळण्यांत आल्यामुळें या कवीवर खरोखरीच अन्याय घडला आहे व हा कवि रूक्ष आहे अशी कल्पना रूढ झाली आहे." एकादा पेन्शनर आपल्या मर्यादित संपत्तींतून आपल्या राहत्या बंगल्याभोंवतींच थोडीशी जागा घेतो व त्यांत निरनिराळ्या सुंदर फुलांचे ताटवे तयार करून, ठिकठिकाणीं सुंदर लताकुंज उभा– रून, मधून मधून विविध आकाराच्या छोट्या छोट्या हिरवळी

(*Lawns*) सोडून सुंदर बगीचा तयार करतो, तर एकादा हौशी जमीनदार आपली संपत्ति मोठमोठाल्या अंबराया लावण्यांत, व संत्रे, मोसंबी, डाळिंबें, द्राक्ष अगदींच्या बागा तयार करण्यांत उधळून टाकतो. या अंबराया आणि फळबागा, फुलोरी बगीच्याइतक्या नयनमनोहर नसल्या, तरी त्या खऱ्या संपत्तीच्या निदर्शक तरी आहेत खास.

"असार पसारा, शून्य संसार सारा" – असला वेदान्त प्रतिपादणाऱ्या गृहस्थाचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोण उदासवाणा असावा अशी सकृद्दर्शनीं कल्पना झाल्यास नवल नाहीं व श्री. यशवंतरावजींच्या वाङ्मयनिर्मितींत ओतप्रोत भरलेल्या वेदान्तावरून त्यांचे विषयींही असा समज प्रसृत होणें शक्य आहे; पण दिवसाच्या चोवीस तासांपैकीं, जेवणासारख्या आवश्यक गोष्टींनाही फाटा देऊन, प्रत्येक क्षण कसल्या ना कसल्या तरी कार्यांत लावून, संगीत - गायन आणि वादन, चित्रकला–फोटोग्राफी आणि पेंटिंग, कातरकाम, सूक्ष्म-लेखन-रेखन, (स्त्रियांचें) रेशमी, जरतारी विणकाम व भरतकामसुद्धां, या सर्वांत नैपुण्य संपादन करून यथार्थत्वानें सकलकलाकोविद म्हणवून घेणारा गृहस्थ जगाविषयीं व त्यांतील विद्या व कलाविषयीं उदास असूं शकतो? काय? या क्षणीं तर काव्यकौस्तुभांच्या हिन्दी काव्यांतील "**सद्गुरु ने सिखाया अनुभव से, हिरदे ने जाना निश्चय से, है सत् सुन्दर सौभाग्य जगत का, दुःखशोक का नाम नहीं ॥ संसार में जब कुछ सार नहीं, तब सर्ग में सुन्दरता भि नहीं। कहाँ ज्ञानकिरण में भान जगत का, दिन हि नहीं वहाँ शाम नहीं ॥**" या ओळी माझ्या मनश्चक्षूसमोर ठळकपणें येतात. ) या अगम्य आणि अनन्त विश्वाचें कोडें उलगडण्याचा प्रयत्न कालाच्या आरंभापासून चालू आहे व त्याचा अंत कालाबरोबरच (जर काल सान्त असेल तर, होणार आहे. निरनिराळ्या तत्त्वज्ञांनीं या संबंधीं निरनिराळीं प्रमेयें मांडलीं आहेत व सिद्धांत प्रतिपादले आहेत.

एकाद्या मनुष्याची तत्त्वजिज्ञासा जागृत झाली कीं, तो आपल्या प्रवृत्ति-नुरूप यांपैकीं एकादें प्रमेय घेऊन त्यावर विचार करूं लागतो. रहस्यज्ञ यशवंतरावजींना अद्वैत वेदान्त पटला, त्यांतील प्रमेयांचा त्यांनीं खोल अभ्यास करून त्या विषयींचे आपले विचार बनविले आणि वाङ्मय-द्वारा ते जनतेसमोर मांडले. केवळ वाङ्मयावरूनच मनुष्याची प्रवृत्ति ठरविणें—हा अगदीं सनातन क्रम असला, तरी जरा घाईचेंच होईल. विचाराबरोबर आचारही लक्ष्यांत घेण्यास हवा. प्रचंड वाङ्मयनिर्मिती-बरोबरच सकलकलाकोविदत्व ज्यानें संपादलें आहे तें त्याच्या प्रवृत्तिपर आचाराच्याही जोरावरच असणार नाहीं का? खऱ्या पतितोद्धाराची ज्याच्या हृदयास तळमळ लागून राहिली आहे व योग्य, रूढ आचार आणि नीतिनियम यांचें पालन करण्यांत ("धर्म-रूढी-बंधन") जो कसोशीनें झटतो हें समाज, त्याचें स्थैर्य आणि उत्कर्ष याविषयीं उदासीन असणाऱ्या मनुष्याकडून कसें होऊं शकेल? सुशिक्षितांनीं पूर्वग्रहदूषित होऊन आपलें शिक्षण वाया न घालवतां त्याचा उपयोग आपल्या समाजाच्या उत्कर्षाकडेच करावा ("परोपकार प्रकार"), असें कळकळीनें सांगणारा गृहस्थ समाज आणि त्यांतील घटना यांपासून अगदीं अलिप्त कसा असूं शकेल? असो. श्री. यशवंतरावजी उदासीन नाहींत असें मुळींच नाहीं. ते अतिशय उदासीन आहेत आणि तेंही एका बाबतींत नांव आणि प्रसिद्धि मिळविण्याच्या बाबतींतमात्र ते अतिशय उदासीन आहेत. कार्यरजावर कीर्तिगिरी उभारण्याची खट-पटमात्र त्यांनीं कधींच केली नाहीं व अशी खटपट करण्याचें त्यांनीं मनांत आणिलें असतें तरी तें त्यांना कितपत साधलें असतें याची शंकाच आहे याला कारण त्यांचा स्वभाव.

असो. प्रथम अगदीं भरपूर किंवा सगळें कांहीं बोलून झालें असलें, तरी ऐन अगदीं निरोप घेण्याच्या वेळीं पुन: थोडें तरी बोला-वेंसें वाटतेंच. माझें असेंच झालें आहे. आतांपर्यंत काव्यकौस्तुभ यश-वंतरावजींच्या ६ पैकीं ३ पुस्तकें मी प्रकाशिलीं आणि त्या सर्वांतून

त्यांचेविषयीं मला जें कांहीं सांगावेंसें होतें तें सर्व सांगूनही पण टाकलें; पण निरोप घेण्याची वेळ आली तेव्हां पुन: थोडेंसें बोलावें वाटलेंच. आपल्या आयुष्याचें सार ( अगदीं न कळत ) श्री. यशवंत-रावजींनीं " कौस्तुभकिरणा "च्या अगदीं शेवटीं फारच सुंदर आणि मार्मिक शब्दांत सांगितलें आहे. तें तेवढें वाक्य इथें उद्धृत करून मी माझें बोलणें आटोपतोंच.

"कार्य-रजावर कीर्ति-गिरी चढविण्याच्या खटपटीची पासष्टावी कला हाताळल्यानें झटपट साहित्यिक बनून चटपट प्रसिद्धि मिळ-विण्याची कलियुगांतली पंधरावी विद्या हस्तगत करण्याइतकी सवड **उत्तरोत्तर कृतिसंवर्धनांत मग्न असलेल्या सतत कार्य-कर्त्याला लाभत नसल्यामुळें कृति-निर्मात्याप्रमाणें कार्यही कोपऱ्यांत पडून राहतें.** ( जाडा टाईप माझा ); या योगें कोपऱ्या पासून हात जोडून " कालाय तस्मै नमः " हा शान्तिपाठ सतत चालू ठेवणाऱ्याचें व्यक्तित्व त्याच्या धडधडीत जिवंतपणांतसुद्धां **अध्याहृत** राहतें ! ! ! तरी " कृति " किंवा " शब्द " अध्याहृतच ठेवून अर्थ-दिग्दर्शन करणें हीदेखील कलेची परिसीमाच होय ! "

यशोविलासाचें मुद्रण संपून बरेच दिवस झाले. प्रकाशन मज-मुळेंच लांबणीवर पडलें. याला माझी व्यावहारिक कार्यव्यग्रता हें एक कारण असलें तरी खरें आणि महत्त्वाचें कारण म्हणजे निरोप घेतांना वाटणारा मनाचा जडपणाच होय. हा ग्रंथ प्रकाशित झाल्यावर आतां-पर्यंत अप्रत्यक्षपणें कां होईना जी अल्प स्वल्प सेवा महाराष्ट्रशारदा-मातेची मजकडून होत होती तिला मी आतां तात्पुरता अंतरणार ( कारण यानंतर उर्वरित चतुर्थोद्भवाचें प्रकाशनकार्यसुद्धां बाजूस सारून आतां श्री. यशवंतरावजी हे आधीं आपले हिन्दी वाङ्मय आणि नंतर उर्दू किंवा उर्वरित मराठी वाङ्मय प्रसिद्ध करण्याच्या

विचारांत आहेत) या उदासीन विचारानेंच या बाबतींत बरेंच आलस्य झालें. असो. श्री. यशवंतरावजींच्या हार्दिक स्वकीयतेमुळेंच श्रीशारदा मातेची दुरून दुरून कां होईना, सेवा करण्याचा योग मला लाभला म्हणून मी त्यांचे माझ्या प्रथम प्रकाशनप्रसंगीं "सौरभ-सेवनांत" आभार मानले आहेतच. आतां निरोप घेण्यापूर्वी पुनः एकवार मानतों. वास्तविक श्री. यशवंतरावजी आणि माझ्यांत जी स्वकीयता आहे, त्यामुळें आभार-प्रदर्शनाचा प्रकार स्वतःची पाठ स्वतःच थोपटून घेण्यासारखा होणार आहे म्हणा. असो.

आतांपर्यंत अप्रत्यक्ष आणि दुरून दुरूनच केलेली सेवा श्री शारदामातेकडे रुजू झाली असल्यास तिच्याच कृपेनें तिची अधिक जवळून सेवा करण्याचाही योग येईलच.

तोंपर्यंत प्रेमळ वाचक

लोभ असूं द्यावा

ही विनंति.

कार्तिक शु. २ मा. श. १२२
२०-११-१९३१ इ.
सोमवार.

अप्पासाहेब देशपांडे.

# (१) संगीत सौभद्र समालोचन.

पुण्य – नगरींतील प्रथित "अभिनव शारदोपासक मंडळा" नें नियोजित "किर्लोस्कर – सप्ताह" साजरा करण्याच्या मंगल प्रसंगीं महाराष्ट्र – भाषेवरील नितांत प्रेमाकृष्टतेमुळें "समग्र किर्लोस्कर" नामक ग्रंथप्रकाशनाची जी संस्तुत्य संयोजना केली आहे तीबद्दल समस्त महाराष्ट्रीयांना – त्यांतही शारदाभक्त, व वाङ्मयोपासक – साहित्यिकांना तर अनेक दृष्टया अननुभूत आनंद होत आहे. पैकीं महाराष्ट्रभाषेंतून नाट्यकलेला प्रथितयशोदायिनी चालना प्रथमतः ज्या महाभागांनीं मिळवून दिली आणि प्रत्यक्षानुभवानें ती दीर्घजीविनी ठरली – इतकेंच नव्हें, तर सकृद्दर्शनीं सिंहमुखी पण अल्पजीवी नाटक व नाटिकांच्या या असल्या कालांतहि चिरजीविनी म्हणतां येण्यासारखी खात्रीच्या स्वरूपांत परिणत होत चाललेल्या यशोवर्धिनी आशेची परिस्थिति ज्या संगीतललामभूत व्यक्तींनीं निर्माण करून ठेविली त्या धन्यभाग अण्णासाहेब किर्लोस्करांचीं प्रथित व उच्चतर वाङ्मयसेवात्मक १ शांकर- दिग्विजय, (१८७३) संगीत शाकुंतल, (१३अक्टो.) १८८० संगीत "सौभद्र" (१८८२) संगीत रामराज्य - वियोग

( अपूर्ण १८८४ ) आणि "अल्लाउद्दीनाची चितोडवर स्वारी" हीं पांच नाटकें, त्यांच्या स्फुट कविता व इतर अप्रकाशित लेखांचाही समावेश केलेला प्रकृष्ट, टवटवीत, आपल्या सुगंधसौरभ्यानें सबंध महाराष्ट्रप्रदेश दरवळून सोडणारा हृदयाल्हादक, नयनमनोहारि समग्र-ग्रंथगुच्छ लवकरच दृष्टीस पडणार हें पाहिलें व पहिल्याप्रतीच्या आनंदाचें व तितक्याच महत्त्वाचें ! ! कारण अगदीं स्थूलमानानें ठरविल्यासही कमींत कमी तीन तशीं ठळक कारणें उल्लेखनीय वाटतात. त्यांतील एक हें होय. यद्यपि या पांच नाटकांच्या परमपरिमलयुक्त पृथक्पृथक् पुष्पांनीं, विशेषतः संगीत सौभद्र" "शांकुतल" व रामराज्य-वियोग" या परमाकर्षक पुष्पत्रयीनें तर महाराष्ट्र- नाट्यग्रंथांत पहिल्याप्रतीचें परमोच्चपद पूर्वींच पूर्णपणें प्राप्त करून घेतलें असलें तरी नाट्याचार्य किर्लोस्करांचे समग्रग्रंथ सर्वसाधारण वाचकांच्या वाचनांत सुलभपणें येण्याचा सुयोग कांहीं साधासुधा नव्हे ! तो या सप्ताहानें साध्य होणार आहे हा त्या आनंदांतलाही मुख्य विशेष म्हणतां येईल.

दुसरा :- कै. बा. किर्लोस्करांच्या नाट्यग्रंथांनीं अर्धशतकावर उत्तरोत्तर आधिक्यानें अव्याहत आणि संस्मरणीय अशी महाराष्ट्रजनतेची सर्वमान्य सेवा केली आहे त्या मानानें तिची महत्तम महति -पण प्रत्यंतरस्वरूपांत यथार्थ शब्दांनीं वर्णन करावयाची झाल्यास - अद्ययावत् या प्रदीर्घ कालांत जितकीं बाहुल्यानें नाटकें लिहिलीं गेलीं तींतील अर्धीं किंवा चतुर्थांश नाटकें तरी रंगभूमीवर धृष्टतेनें फडकूं शकलीं नाहींत, जीं "फडकलीं" (असें म्हणतां आलें तरी) त्यांना तदर्ध आयुष्यही लाभूं शकलें नाहीं अशा विविधविषयात्मक नाविन्यप्रिय कालांत अजूनसुद्धां मधून मधून रंगभूमीवर "सौभद्र" नाटक स्वयंसौंदर्यप्रभेनें झळकत असतांना एकाद्या लेखकाच्या चार प्रशस्तिपर शब्दावश्यकतेची परिस्थितीच येथें डोकावूं शकत नाहीं इतकी ती

तेजस्वी व स्वयंप्रकाशक रत्नें आहेत असें यथार्थत्वानें स्पष्टपणें म्हणतां येण्यायोग्य हा अन्वर्थक सुप्रसंग प्राप्त झाला याचा !

तिसरा ( विशेष ) म्हणजे :– अनेक लेखकांकडून अभ्यासी लेख मिळवून आजकाल महाराष्ट्रसाहित्यांत अत्यावश्यक अशी उत्तमोत्तम भर घालण्याची अत्यंत स्तुत्य प्रथा "नवभारत ग्रंथमाला" आणि नुकतेंच दोन खंडांतून प्रसिद्ध झालेल्या "श्रीज्ञानेश्वरदर्शना"सारख्या ग्रंथांनीं पाडिली आहे त्यांत तसाच मधुर सूर भरण्याचा हा सुयोग या नाट्यविषयक–साहित्य, पण संगीतविषयाधिक्याभियुक्त लेखनसंभार मिळविण्याच्या मिषानें आणखी एक ताजी भर पडणार आहे याचा.

"समग्र किर्लोस्कर" या ग्रंथपंचक – त्यांतल्यात्यांत "शाकुंतल" किंवा "सौभद्रा"संबंधीं समालोचनपर गायनशास्त्र व साहित्यसंमिश्रित चार शब्द मी लिहावेत असा माझ्या निरतिशय सौहार्दसंपन्न, परम प्रेमळ, सुप्रसिद्ध – वैशिष्ठ्यानें सबंध महाराष्ट्रास सुपरिचित साहित्यिक "साहित्यशार्दूल" प्रो. श्री. श्री. नी. चापेकर जे "शारदोपासक–मंडळा"चे मुख्याधिष्ठानभूत चैतन्यसर्वस्व होत त्यांची परमप्रेमळ आज्ञा म्हणून अधिकारानधिकारविचारही सहेतुकपणें बाजूस सारून, शिवाय माझ्याही एका पुस्तकात्मक तिसऱ्याभागाच्या ऐन प्रकाशन-प्रसंगांतील कार्यबाहुल्याच्या कचाटींतूनसुद्धां शिरसामान्य करण्यास उद्युक्त झालों आहें. या व इतर प्रकारच्या प्रस्तुत प्रसंगांतील कांहीं प्रतिकूल परिस्थितींतही परमप्रेमळ प्रो. बापूसाहेबांची हार्दिक आज्ञा तत्परिपूर्तता-संशक्तही करील असा माझा आत्मविश्वाससुद्धां आंतून मला लेखन–प्रोत्साहन देत आहे. त्याअर्थीं "संगीत सौभद्र" च सध्यां हातीं घेतों. यद्यपि या पांच ग्रंथांनीं महाराष्ट्र वाङ्मयांत बरीच भरीव भर घातली आहे तरी त्यांतल्यात्यांत "सौभद्रा"चें विशेषत्वानें जितकें उच्चतर

स्थान आहे तितकेंच यानें मिळविलेलें लोकोत्तर लौकिकाचें महत्त्व यांतील रसाळ पदें अर्धाधिक आबालवृद्धांच्या तोंडीं आहेत. नव्हे, तर तीं हृदयाशीं इतकीं संलग्न झालीं आहेत कीं, तीं जाऊन अर्धशतकावर काल लोटला तरी आजसुद्धां कालच आलेल्या एकाद्या नाटकांतील विशेष आवडलेलें पद ज्या (नाटकाचा नादी) प्रेक्षक उल्लसितवृत्तीनें गुणगुणतो, गातो, फिरतो तितक्याच उत्सुकतेनें म्हटलीं जात असलेलीं "सौभद्रां पदें कितीतरी ऐकूं येतात! व तीं गायली जात असतांना तद्वि अंतःकरणांतील सात्त्विक अभिनिवेशाधिक्यही स्पष्टपणें प्रतीत हो

"समालोचन" म्हटल्यावर मुक्तकंठानें स्तुति करणें स्वीकृ कार्यास एकांगीपणा आणतें हें जाणून असलों तरी आधींच अ वृद्धांकडून मुक्तकंठोद्भूत प्रशस्ति ज्या नाटकानें मिळविली ज्याचा सोज्ज्वल प्रत्यय आज या क्षणींही पूर्णपणें पटत आहे उभयविध - गुणदोषात्मक "समालोचन" व्हावें म्हटल्यास कृ ओढून घेतल्याशिवाय शक्य नाहीं याचीही पूर्ण जाणीव जाग्रत ल्यामुळें कृत्रिमतेचें पांघरूण ओढून घेण्याची ओढाताण येथें नको यद्यपि कोणी कृत्रिमतेची किती व कशीही जहाल कैफ जबरीनें पाहूं लागले तरी कृत्रिम - कैफच ती! किती वेळ टिकणार? इत वरही कर्तव्यतत्परतेची अजिबात आगळीक होऊं न देतां चंद्रा लांछनही लपविण्याचा लोभ धरण्याइतकी खबरदारीही पण खास नाहीं एवढें अभिवचन तूर्त देऊन ठेवतों; कारण "प्रियं ब्रूयात्" सांगण्यापूर्वीच "सत्यं ब्रूयात्" ही जोराची आज्ञा करून "न सत्यमप्रियं" अशी मार्मिक दूरदर्शित्वाभियुक्त सनातनधर्माची शि आहे.

अशी विनम्रपणें शालीनतेची पाखरणी करून लेखास सु करतों.

## “ सं. सौ. समालोचन ”

श्रीमहाभारतांत “ काल हा राजाचें कारण ? कीं राजा हा कालाचें कारण ? ” असा प्रश्न उपस्थित करून शेवटीं “ राजा कालस्य कारणं ” हें निर्णयात्मक वाक्य तेथें गोंवलेलें दृष्टीस पडतें. हल्लीचा पौर्वात्य व पाश्चात्यसंस्कृतिसंमिश्रितकाल गताब्द व उदयाब्दसंधिकाल दर्शवितो. शरदृतूंतील सोल्हादक सुंदर चांदणें आपली सुरम्य, शीतल कांति श्रांतजनमानसोल्हादकर करण्याकरितां स्वयंप्रभ सूर्य पण स्वेच्छाभियुक्त नितांत निष्प्रभ होण्यास्तव फिकटपणें मावळत असावा व तिकडे अरुण-राजाशीं सस्मित हस्तांदोलन (शेकहँड) करितांना हसत असलेला तेजो-गोल उदित होण्याच्या बेतांत असावा अशी सुंदर प्रभात, पक्षिगणांस आपापलें हृदयस्थ कृतज्ञतेचें गाणें गावयास, त्याचप्रमाणें कविगणांना काव्याचीं मौक्तिकें गोंवण्यास सुवर्णमध्य आहे असें कोणास बरें वाटणार नाहीं ? सुवर्णसंधि वरचेवर थोडीच साधते ! तेव्हां या लाभलेल्या महल्लाभांत नेहमींच्या परिचित विषयांतून आनंदाचें व वरचेवर नावि-न्यानें उसळत असलेल्या उल्लसित हर्षोल्हासाचें प्रदर्शन करण्यापेक्षां वाङ्मयविषयच, परंतु साहित्य व संमिश्रणानें सजविलेला साहित्यात्मक एकादें नवें दालन उघडण्याचा यत्न करावा; तोही तितक्या श्रमाचा नसावा ! तर, तसा तो सोपा, उघडण्यासही पण तितकाच सोपा आणि आपल्या नेहमींच्या अभिरुचीपेक्षां किंचित् भिन्न व नाविन्यात्मक असावा अशी कल्पना धरून सत्संकल्पयुक्त लेखनास सुरवात केली आहे.

ज्या योगानें आनंदाची प्राप्ति संसृतिजनित नित्याच्या व्यवहा-रांतसुद्धां होते, तंद्रा जाग्रत होऊन उन्मनीशीं स्पर्धा करित्ये, ब्राह्मी-स्थितीच्या आनंदाचें मोजमाप ज्यामुळें मापलें जातें, ज्यावर ईशसृष्टीचे तात्त्विकजीवसुद्धां हृदयांदोलिकेवरील आल्हाददायी आंदोलनें मनसोक्त घेतात, व्यवहारांत अत्यंत आवश्यक अशा शरीरांत क्रमप्राप्त असलेल्या

व ज्याच्याबद्दल आमच्याकडील वैद्यशास्त्रांतील साधनें " असाध्य " या अक्षरत्रयीचा मंत्र जपतात व ज्याच्या जभड्यांतून शरीराचें पुनरुज्जीवन अत्यंत दुस्साध्य असा सुश्रुत निघंटादि वैद्यकीय ग्रंथांनीं ज्यावर शेरा मारला आहे असें मनाचें औदासिन्य, मज्जातंतूचे रोग, मस्तकशूल, संधिवात, जीर्णखोकला, क्षय इत्यादि रोगसुद्धां बरे होऊं शकतात अशी पाश्चात्य पण वैद्यशास्त्रांतीलच विरोधप्रतिपत्ति ज्याप्रमाणें दिसून येते तद्वत् गायनशास्त्राचीही तऱ्हा अशीच कांहींशी झाली आहे. गायन हा केवल मनोरंजनाचा विषय नसून शास्त्रनिर्णीत रागांचा रसपरिपोष व्यवस्थित झाल्यास या वैद्यशास्त्रांतील रोगनिवृत्तिकरसाधनात्मक अक्षरता उल्लेख मध्येंच जो केला आहे त्याचीहि संसिद्धि गायनयोगें होऊं शकते इतकी संशक्त व सुसंपन्न कला जी आरंभीं ब्रम्हदेवानें भरताला शिकविली, त्यानें ती पुढें गंधर्व, अप्सरांना सांगून, शिकवून श्रीशंकरापुढें त्यांची हजरी देवविली त्या गायनाची कांहीं माहिती या लेखांत ग्रथित करण्याचें योजिलें आहे.

साम, संगीत व गायन ही शब्दत्रयी विचारांत घेतली, तर नाट्यशास्त्राबद्दल – त्यांतल्यात्यांत संगीत नाटकासंबंधीं विचारविनिमय करावयाचा झाल्यास वाङ्मयारण्य - सद्बंधूच्या खांद्याला खांदा लावून किंवहुना हातांत हात घालून गायन कलेलाही साहित्यारामांतील सुगंधसौरभान्वित पुष्पवाटिकांवरून फिरवून आणण्यांत प्रसंगोचित साहाय्यतेबरोबर औचित्यही लाभेल अशा विचारानें गायनशास्त्राबद्दल थोडेसें लिहून नाट्याचार्य अण्णासा.च्या नाटकांत गायनांतील शास्त्रीयत्वाचा किती सदुपयोग झाला आहे हें जें महत्त्वाचें गमक त्यांतून सांपडतें त्याबद्दल येथें मला विशेषत्वानें यथामति सांगावयाचें आहे.

( १ )– "गायन" ही विद्या नसून कला आहे तेव्हां तिच्याबद्दल इतक्या भरीव लेखनाची आवश्यकता नाहीं " असा एक आक्षेप

यावर प्रथमतः उद्भवतो यायोगें यद्यपि विद्येच्या सदरांत गायनकलेचा प्रवेश होऊं शकत नसला तरी निबळ कला म्हणून समजला जाणारा कमीपणा कांहीं अंशीं तरी कमी व्हावा अशी माझी खात्री आहे. अर्थात् वरील प्रश्नाच्या विशदीकरणार्थ विद्या व कला यांतील तात्त्विक भेद स्पष्ट केला पाहिजे. "बौद्धिक उन्नति ज्यायोगें होते ती विद्या" व "ज्यामुळें मनसेप्सित मनोरंजन होतें ती कला" अशी सुटसुटीत व्याख्या आहे; पण यांतून एक व्यवस्था चुकते. ती ही कीं, कलेचा क्रम व तिची व्यवस्थित मांडणी ज्यांत ग्रथित झाली असेल व जी कला भाषेंतील व्याकरणाच्या नियमाप्रमाणें अपेक्षितभाव उद्दीपित करूं शकते अशी नियमबद्ध ठेवण कोणत्या सदरांत घालावयाची? कारण, कलेंत क्रियासिद्धि आहे व क्रियेच्या तेलावर कलेची ज्योत तेवत असते! अशा क्रियेंत नियमावलीचा समावेश होत नाहीं. अर्थात् ही अवस्था शास्त्राच्या सदरांत घालण्यास योग्य ठरते व शास्त्र असें त्याला म्हटलें कीं, तें विद्येहून फारसें लांब नसतें. अतएव शास्त्राचा समावेश सुलभतेनें विद्येंत होतो व असाच या विद्येचा अधिक अभ्यास झाल्यास त्याचीं बौद्धिक फलें स्वादिष्टानुभव दिल्याशिवाय राहणार नाहींत. मात्र जी आरंभीं कला असते तिला जेव्हां आम्ही शास्त्र ही संज्ञा देऊं इच्छितों किंवा तीवर शास्त्रीय संस्कार करतों तेव्हां क्रियाशक्तीचा अभाव असतां कामा नये. किंबहुना आम्ही वर्णिलेली नियमावली एकाद्यानें क्रियासिद्धीशिवाय अभ्यासिल्यास त्याची जाणीव विद्या व कला या दोन्ही सदरांत न बसतां निराळेंच स्वरूप धारण करील. कारण, कलायुक्त विद्येची गोडी कलात्मकक्रियेशिवाय बुद्धीला संचलित करूं शकत नाहीं व जर बुद्धि संचलित न झाली तर अवश्यंभावी आनंद उत्पन्न होत नाहीं. सतारीचें बाह्य स्वरूप तयार करून त्याच्या तारा जोडण्याचें नियमशास्त्र होऊं शकेल; पण ज्याला सतारीच्या तारा छेडतां येत

नाहींत तो चांगला "सतारमेकर" होऊं शकणार नाहीं. सतारवादन-कला ज्याला हस्तगत झाली आहे असला सतारीचें बाह्य स्वरूप बनवूं शकेल; पण बाह्यस्वरूप घडविण्यास दोरीमाप तासणारा सुतार सतार-वादक होणें शक्य नाहीं. मूळांतल्या कला जेव्हां जेव्हां मुरङ्कन विद्येंत मुरतात त्यात्यावेळीं त्या विद्या क्रियायुक्तच असाव्यात! एरव्हीं उपयो-गाच्या नाहींत. अभिजात विद्येची महती कलेला येणार नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. कारण, ती जन्मजात मनोरंजनकारिणीच आहे. तरीपण ती सजीव आहे असें मानल्यास तिची स्वाभाविक प्रवृत्ति विद्येंत प्रविष्ट होण्याची आहे हें समजून येईल व उदयोन्मुख ग्रह जसा संपूर्ण फल देतो तद्वत् विद्यानिष्ठ कला विद्येचें फल दिल्याशिवाय राहणार नाहीं.

( २ ) – गायन ही विद्यानिष्ठ कला आहे असें वरील विवेचना-वरून ठरतें. तेव्हां इच्या उगमाचा प्रथम थोडासा इतिहास अवलोकन करूं.

गायनाची मूळ उत्पत्ति नादापासून संभवते. नाद हा ब्रह्मस्वरूप आहे असें उद्गीतीच्या ध्वनिसादृश्यभावानें म्हणण्याचा परिपाठ आहे, व "गायैतां ब्रम्हणौ" अशी श्रुति आहे· नादाच्या स्वरूपावरून ध्वनि हें नामाभिधान कल्पिलें गेलें, कीं ध्वनीच्या स्वरूपावरून नाद हा शब्द रूढ झाला? याचें उत्तर त्वरित देणें कठिण आहे. तेव्हां थोडक्यांत "नाद" म्हणजे काय? याचा विचार आधीं हवा.

नादाचे दोन प्रकार आहेत. ( १ ) अनाहत. ( २ ) आहत. आघाताच्या साहाय्यावांचून होणारा जो ध्वनि तो "अनाहत". अगदीं शांत वाटणारें वातावरणही नादस्वरूप आहे! पण जो श्रुतिगोचर नाहीं म्हणजे श्रोत्याचा विषय नाहीं, तो "अनाहत" म्हणून याचें महत्त्व योगशास्त्रांत फार वर्णिलें आहे. यालाच इंग्रजी वाङ्मयांत मिल्टन या

महाकवीनें Music of the Sphere म्हटलें आहे. निसर्गाशीं तादात्म्यता पावल्यानंतर जेव्हां वृत्ति तन्मय होते तेव्हां निश्चल-स्वरूपांत कवि त्याचें अवगाहन करीत राहतो. ईशसृष्टीच्या तत्त्वाभिसरणाची गति चालूच असते. ती केव्हांहि नादरहित नसते. तींतील नादावलि 'अनाहत' म्हणविते असें त्याचें शास्त्रीय उदाहरण असून आपले दोन्ही कान बंद केले असतां जो आवाज कानांत ध्वनित होतो तो 'अनाहत' हा त्याचा व्यावहारिक दृष्टांत आहे. ( २ ) "आहत" हा आघाताच्या साधनानें उत्पन्न होतो. हा तीन तऱ्हांनीं प्रसिद्धीस पावतो. (प्रकट होतो.) ( १ ) घर्षणानें. ( २ ) आदळण्यानें. ( ३ ) वारा संकुचित केल्यानें म्हणजे कोणत्याहि पदार्थांत वारा भरल्यानें. यावरच गायनाचा सर्व भर आहे. प्रत्यहीं होणारा आहतस्वर गायनोपयोगी आहे असें नसून याची प्रक्रिया अशी आहे कीं, प्राणिमात्राच्या शरीरांत वायु प्रेरित झाला म्हणजे तो नाभि, कंठ, हृदय, मुख व मस्तक या ठिकाणीं नाद उत्पन्न करतो. यांतील हृदय, कंठ व मस्तक या तीन स्थानांतील ध्वनि गायनोपयोगी आहे. वैदिक वाङ्मयाकडे लक्ष्य दिल्यास छांदसानंतर गायकांची निर्मिति झाली असें दिसून येतें. सामवेद हाच या गायनाचा उगमकाल धरला जातो. वेदमंत्र म्हणण्यास लागणारे उदात्त, अनुदात्त व स्वरित हे गायनाच्या बाल्यावस्थेची साक्ष पटवितात. स्वरित म्हणजे ज्या स्वरांत त्रास न होतां मंत्र म्हणणारा ब्राह्मण सहज म्हणूं शकेल तो स्वर. उदात्त, अनुदात्त हे क्रमानें चढणारे व उतरणारे स्वर होत. अशाप्रकारच्या तीन स्वरांच्या साहाय्यानें मंत्र म्हटला जाई. पण छंदाची अक्षरमाला भाषेच्या साहाय्यानें जितकी कर्णमधुर असे तितकी तीन स्वरावरील मंत्रावलि होत नसे म्हणून गायनाचा विस्तार झाला.

या गायनाच्या मूळ पीठिकेनंतर गायनकलेंत कशी कशी वाढ होत गेली हें सांगीतलें पाहिजे; पण स्थलाभावीं विस्तारभयानें

थोडक्यांत म्हणजे गायनाचा गाभा असा जो संगीतक्रम त्याबद्दल यथामति प्रवचन करूं.

संगीताची व्याख्या 'गीतं वाद्यं नर्तनंच त्रयं संगीतमुच्यते' अशी आहे; पण आज "संगीत" म्हणून प्रचारांत असलेल्या सर्वसाधारण बैठकींत नृत्याचा अभाव दिसून येतो! तेव्हां मधुर किंवा भरीव स्वराच्या वाद्यान्वित साथीसह गायनाला संगीत म्हणण्याचा परिपाठ आहे. साथीशिवाय गाणें - पायाशिवाय चालणें - असें म्हणण्या इतकेंच जवळ जवळ अशक्य ठरविलें गेल्यामुळें सर्वप्रकारच्या गाण्यास सरसगट संगीत म्हणण्याचा प्रघातही पण आहे. कदाचित् गायकाचें गायनवैकल्य भरीव साथीच्या साहाय्यानें सुलभांत भरून निघत असल्यामुळें अशी परिस्थिति सर्वसाधारणरीत्या निर्माण झालेली दिसून येत असावी. अशा तऱ्हेनें नाटककंपन्यांनीं संगीत शब्द हक्कानें (यथार्थत्वानें) आपल्याकडे ओढून घेतला आणि गवयाचें गाणें संगीतामधून वेगळें निघालें व नाटकी गाण्यासच संगीत म्हणण्याची रूढी वरचेवर वाढत चालली. त्याचप्रमाणें गवयी—धर्तीवर गाणाऱ्याबद्दल "गवयाचें गाणें" किंवा "क़व्वाली गाणें" असा शब्द असून नाटकीपदें किंवा नाटकांत म्हटलीं जाणारी पदें संगीतांत मोडलीं जात आहेत.

शास्त्रकारांनीं संगीताचे दोन भेद सांगितले आहेत. (१) "मार्गसंगीत" (२) "देशी—संगीत". 'मार्गसंगीत' हें त्याचें शुद्ध स्वरूप असून त्याला लोकाभिरुचीची, चित्ताकृष्टतेची कसलीहि गरज नसून केवल स्वतःच्या मानसिक (गान) सुखाकरितांच तो मार्ग आहे. त्यांतही वाद्य व नृत्य या दोहोंचा अभाव आहे. तेव्हां स्वराशीं जीव संलग्न झाल्यावर त्या स्वराचें सारखें गुणगुणणें हीच मार्गसंगीताची स्थिति असावी. नृत्याचा अभाव गृहित धरल्यावर साथीचें गाणें शिल्लक राहतें. व साथीशिवाय गाणेंच नाहीं या दृष्टीनें सर्वसाधारण गाण्यास

संगीत म्हणण्यास हरकत नसावी; पण मीं वर दिलेल्या कारणानें संगीत हें नामाभिधान नाटकी गाण्यासच लाविलें गेलें आहे खास! "देशी-संगीत" हेंमात्र देशपरिस्थितीनें बदलतें म्हणून आज प्रचलित असलेलें सर्व गाणें देशी-संगीतांत मोडण्यास मुळींच हरकत नाहीं.

राज्यकर्त्यांचा परिणाम जसा सर्व विषयावर होतो तद्वत् गायन-शास्त्रावरही झालेला दिसतो. मुसलमान रियासतकारांचा पगडा जेव्हां भारतावर बसला त्या कालीं गाण्यांतील पूर्वींचें शास्त्रीय शुद्धस्वरूप लुप्त-होऊन क़व्वाली गाण्यास रंग चढला व त्याच्या योगें आत्मसुख साधण्याचें तें साधन न राहतां बैठकीला रंग आणण्याची ती कला होऊं लागली. सर्वच सभासद गानप्रेमी नसतात म्हणून सर्वांना प्रसन्न करण्याकरितां नाटकी पदें गवयीहि मधून मधून गाऊं लागले. शास्त्रशुद्ध गायन केव्हां रूढ होतें याची कालगणना आज करणें बरेंच प्रयासाचें आहे. मात्र मुसलमानी राज्यापासून गाण्यांत झालेला फेरबदल क्रमानें दाखवितां येण्याजोगा आहे; पण प्रस्तुत तो विचार नको. कारण, यद्यपि गायनकलेंत समाविष्ट होणारा हा विषय गायनाचा इतिहास या सदरांत सरासरी येत असला तरी साधारणतः पाहिल्यास ख्याल, टप्पा, ठुंबरी, धृपद, तराणा इत्यादि गाण्याचें घराणें व्यक्तिनिष्ठ आहेत व याचें उत्पादक मुसलमान गवई आहेत असें इतिहास सांगतो. वस्तुतः आमच्या मूळ आर्य-संगीताविषयीं पाहूं गेल्यास यद्यपि अनेक मतें असलीं, तरी त्यांतल्या त्यांत प्राचीन संगीताचार्यांचीं मुख्य चार मतें ठरलेलीं आढळून येतात. त्यांस अनुक्रमें "१ शिवमत, २ हनुमानमत, ३ कृष्णमत, आणि ४ भारतमत" असें म्हणतात. प्रस्तुत "हनुमानमत" अधिक प्रचारांत आहे असें म्हणतां येईल. धृपदी गायनाचा समावेश शिवमतांत होतो, तर ख्याल, टप्पा, तराणा, चतरंग, त्रिताल्यांतील चिजा आणि सरगम ह्यांचा हनुमानमतांत समावेश होतो. कृष्णमतामध्यें

ठुंबऱ्या, गजला वगैरे शृंगाररसप्रधान चिजांचा समावेश होतो, तर "भारतमतमध्यें" ईशस्तुतिपर भजन, कीर्तन इत्यादि शांतरसप्रधान चिजांचा समावेश होतो असें अद्ययावत् चालू गायनपद्धतीवरूनही ठरतें. येथें एक निराळीच पण गानमहत्त्वप्रस्थापक गोष्ट सुचवावीशी वाटते. गायनशास्त्राचा समावेश भजन संकीर्तनमिषानें भारतियांच्या धर्मांतही झाल्यामुळें गायनोत्कर्षाभियुक्त महत्त्व चढलें असावें असें कोणी विधान करूं गेल्यास आमचें म्हणणें एवढेंच कीं, हें शास्त्रच मुळांत इतकें चित्ताकर्षक आहे कीं, तशी धर्माज्ञा नसलेल्या किंबहुना त्याबद्दलचें निषेधात्मक वचन असलेला वर्गही गायनाकृष्ट झाला! अस्तु. कांहीं रागांचीं नांवेंही वरील ऐतिहासिक कथनाची विधानानुकूल साथ करतात. वादनविद्येंत कुशल असलेल्या दोन चार "कुदवसिंग" वगैरे राजपूतांचीं नांवें तेवढीं इतिहासांतून दृष्टीस पडतात. कांहीं मुसलमानांचे ब्राह्मण-शिष्य या विद्येंत पारंगत झालेले अढळतात. त्यांनीं पूर्वीचीं गायनशास्त्रें चाळण्याचे श्रम घेतले असावेत म्हणूनच हल्लीं तिला शास्त्रीय स्वरूप येऊं पाहात आहे. तरी ही कला प्रदीर्घ श्रमाची व व्यवहारांत पाहिजे तितकी फायदेशीर नसल्यानें सुशिक्षितवर्गीयांनीं यांत पुढाकार घेतल्याशिवाय शुद्धगायन समाजांत रूढ होणें बरेंच कठीण आहे. तथापि आजकाल तसा वर्ग पुढें सरसावतही आहे ही एक मोठ्याच आनंदाची गोष्ट होय.

सुशिक्षित वर्ग गायनकलाभिवर्धकयत्नांत पडावा असें वर म्हटलें खरें! पण त्या वर्गानें ही कला कां व कशाकरितां ऊर्जितावस्थेला आणावी? हा प्रश्न प्रामुख्यानें पुढें येतो. मनोरंजन हेंच गायनाचें ध्येय असेल तर तिला नसतें महत्त्व कां द्यावें? असेंही वाटतें. म्हणून गायनाची विशेष प्रौढी ज्यांत आहे किंबहुना गायनांत जो जिवंत रस आहे त्याचा विचार केल्यास प्रस्तुत प्रसंगप्राप्त नाटकांतील

तीनचतुर्थांश काव्यात्मक भागाचाही यांत समावेश होईल आणि "काव्य व संगीत" हा जो प्रस्तुतचा मुख्य लेखनोद्देश तिकडेच एकदम वळतां येईल.

तत्पूर्वी अत्यंत महत्त्वाची अशी थोडीशी रसात्मक माहिती देऊं. हा उच्चतम विचारही पूर्वीच शास्त्रज्ञांनीं पूर्णपणें केलेला असून अनभिज्ञतेनें रसविघातक गायन करतां येऊं नये म्हणून मूर्छना, गमक, आश, मिड्, गिट्कारी इत्यादि नियमबद्ध मर्यादाही गायकांना घालून दिली आहे; पण याचें तितकें तंतोतंत परिपालन बहुतेक सर्वच खऱ्या आस्थेनें करीत नसल्यामुळें रसप्रत्यंतर पटाविण्यायोग्य क्रियासिद्धि अधिकाधिक दुरावत चालल्यानें कोणता राग कोणत्या रसास परिपोषक आहे याची शाब्दिक माहितीसुद्धां दुर्लभ किंवा कष्टसाध्य होत चालली ! आणि यांत किती यथार्थत्वही आहे हें खालील कोष्टकांतील यथामिलित अल्पत्वावरूनही दिसून येईल.

**" श्रृंगार हास्य करुणा रौद्र वीर भयानकः ।**
**बीभत्साद्भुत शांतिश्च रसापूर्वोरुदाहृतः ॥ "**

| | | | वादी | संवादी |
|---|---|---|---|---|
| १ | शृंगार | यमनकल्याण | ग | नि |
| २ | हास्य | भूप | ग | ध |
| ३ | करुणा | परज, प्रभात, पिलु. | स, म, ग. | प, स, नी. |
| ४ | रौद्र | जोगी, माड. | स | म |
| ५ | वीर | मालकंस, शंकरा. | म, ग. | स, नि. |
| ६ | भयानक | बागेश्री ( बागेश्वरी ) | म | स |
| ७ | बीभत्स | भूपजिल्हा | | |
| ८ | अद्भुत | कानडा, शहाना | रि, प. | प, सा. |
| ९ | शांत | भैरव (?) | ध | री |

( हें कोष्टक वाचकवर्गांना कांहींअंशीं अश्रुत तर किंचिदंशीं नाविन्यपूर्णही वाटेल आणि यावरून याच्या दुर्लभतेची कल्पनाही होईल. )

"काव्येषु नाटकं रम्यं" यांतील "काव्य" आणि "नाटक" याची अगदीं थोडक्यांत साधीसुधी पण सोदाहरण व्याख्या करावयाची झाल्यास ज्याप्रमाणें "राजे आले" अशा अगदीं साध्या वाक्या ऐवजीं याच अर्थी (राजाची) "स्वारी आली" असें म्हटलें कीं यांत "काव्य" आलें. तद्वत् आधींच सरळपणें सांगावयाचें तें तात्पुरतें कांहीं वेळ कानावर हात ठेवून विवक्षितप्रसंगीं किंवा शेवटीं सांगीतलें कीं "नाटक" झालें! नित्याच्या अगदीं साध्या व्यवहारांतीलसुद्धां मनसेप्सित एकादी गोष्ट घडवून आणावयाची ती नेहमींप्रमाणें मनांत येतांच सांगण्या-ऐवजीं चकित करून सोडण्यास्तव थोडा काल गुप्त ठेवून, विशिष्टप्रसंगीं रसपरिपोषक वाक्यांचा मागोवा घेत त्याच पूर्वींच्या साध्या शब्दांतून सांगपणें सांगण्यानेंसुद्धां, सहजांत अद्भुतपणा आणण्यांतच खरें नाट्य-कौशल्य आहे. असे अनेक प्रसंग प्रस्तुतच्या सौभद्रसमालोचनांत किति-तरी दाखवितां येतील! तेव्हां सर्वांगसुंदर अशा सुप्रथित सौभद्रनाट-काचे जनक संगीत-साहित्याचार्य कै. वा. बळवंत पांडुरंग उर्फ अण्णा-साहेब किर्लोस्कर (१८४३ ते १८५५) ही सबंध महाराष्ट्राला अत्यंत लोकप्रिय झालेली संगीतलल्लासभूत अलौकिक व्यक्ति कोणत्या विशिष्ट सद्गुणामुळें "मराठी नाट्याचे जनक" या अक्षरक्षः अन्वर्थक अशा श्रेष्ठ पदवीला चढली याचें गूढ-हा कित्ता समोर ठेवून विद्यमान किर्लो-स्कर होण्याच्या सदिच्छाभिप्रेरित नाटककारांना कदाचित् पडलें अस-ल्यास-हुडकून काढण्याचें बिनचूक स्थान म्हणजे "सौभद्र" च होय. याचा रचनाकाल इ. स. १८८२ म्हणजे ४४ वर्षे पूर्वी हें नाटक लिहिलें गेलें तरी इतक्या अर्धशतकान्वित प्रदीर्घ कालानंतरही त्याचें मनोहारित्व टिकून राहिलें इतकेंच नव्हें, तर उत्तरोत्तर गणितश्रेणीनें कसें महत्त्वास चढत चाललें याबद्दल उदाहरण द्यावयाचें झाल्यास प्राचीन वैद्यक-ग्रंथांतील प्रक्रियात्मक वचनान्वयें शास्त्रपरिशुद्धप्रकारानें तयार केलेल्या

त्रैलोक्यचिंतामणि - मात्रेचें देतां येईल. हें दर चार सहा महिन्यांनीं पॅक होऊन आलेल्या औषधांच्या बाटल्या (आमच्या इकडे अजूनही कोठेंकोठें बाटलेल्या माणसास स्वकीय सुहृद्‌सुद्धां जसें टाकतात तद्वत्) रद्द ठरत असलेल्या आजच्या कालांत, जितकीं अधिक वर्षें लोटत जातील तितकी अधिक गुणवर्धक ठरत असलेलें उदाहरण तितकेंच विचारार्ह ठरेल. त्याचप्रमाणें संगीत असो वा साहित्य असो, त्या त्या मूळ ग्रंथाचें शास्त्रशुद्ध परिशीलन करून त्याचें तितक्याच एकनिष्ठपणें परिपालन करणाऱ्यांचीच कृति अवश्यमेव अशी चिरस्थायिनी सत्कीर्ति संपादन करूं शकते हेंही स्पष्टपणें प्रतीत होईल. हेंच यांच्या वैशिष्ठ्यांतील गमक होय.

आतांपर्यंत " शेक्स्पीयर " आणि " कालिदासाची समान तुलना सर्वंच करीत आले व हीच तुलना अद्ययावत् अविच्छिन्नपणें चालतही आली आहे या स्थलीं सूक्ष्म आणि खोल दृष्टीचा जरा अधिक उपयोग केला, तर तारतम्यानें याहूनही एक पायरी उच्च असें स्थान अण्णा-साहेबांकरितां राखून ठेवण्यायोग्य आहे हें सुचवितां येईल. कविकुलगुरु कालिदास अद्वितीय प्रतिभासंपन्न होते यांत तिलप्राय, त्रिकालींही शंका नाहीं; पण केवल कवि ! आणि शेक्स्पीयर नाटककार असून (साधारण) नटही होते या दृष्टीनें उपमान उपमेयस्वरूपी यांतील एकांगीपणा तेवढा काढून " नाटककार व कुशल नट " या अन्वर्थक पदवीवर अण्णासाहे-बांचा पूर्ण हक्क प्रस्थापित होत आहे त्याअर्थी कै. वा. किर्लोस्कर केवल " मराठी कालिदास अथवा शेक्स्पीयर " म्हणण्याऐवजीं अण्णासाहेब किर्लोस्कर उभयविध ( कालिदासही होत आणि शेक्स्पीयरही होत " असें म्हटल्यास हेंच न्याय्य आणि वस्तुस्थितिनिदर्शक ठरण्यास हरकत ती कोणती ? कारण कविकुलगुरु कालिदास संस्कृतांतील आद्य नाट्या-चार्य, तर अण्णासाहेबही मराठीचे आद्य नाट्याचार्य आणि शेक्स्पीयरसदृश

नुसते नटच नव्हेत तर गायनशास्त्राभिज्ञता हें एक यांच्यांतील आणखी एक आधिक्य त्यावर शिल्लक राहतें !! अस्तु.

उपरिनिर्दिष्ट संगीतात्मक यथामति विवेचन केलें जसें आहे त्या मानानें काव्यविवेचन कमी पडतें याची जाणीव जाग्रत असूनही येथें काव्याचा संगीत नाटकाशीं किती संबंध येतो तेवढ्यापुरताच विचार प्रामुख्यानें करावयाचा असल्यामुळें " रस " हा या दोन्ही विषयांशीं अधिक निगडित आहे आणि प्रस्तुत लेखांत तो रस जरा आणखी स्पष्ट करण्यांत — अल्पप्रमाणांत कां होईना — कांहींसें नाविन्यही वर दाखविलें, त्याअर्थीं काव्य व संगीत याचा रसाशीं किती निकट संबंध आहे इकडे पुनश्च किंचित् वळून मुख्योद्दिष्टात्मक सौभद्रांतील वैशिष्ट्य-कथनास लागूं.

काव्यांत " रस " व " ध्वनि " असे दोन मोठे संप्रदाय आहेत. काव्यांतील अक्षरमाला काढली व तिचा निनाद गुणगुणत बसल्यास जो ध्वनि प्रतीत होतो त्याला गान म्हणण्यास हरकत नाहीं. काव्याचा विशेष-गुण म्हणून जसा वृत्तबद्ध रचनेचा काव्यांत अंतर्भूत होतो तत्सदृश गायनांतील तालास त्यांतील विशेष म्हणतां येईल. नुसता जो ध्वनि तो गान असें धरून चालल्यास केवल तोच उदित, अनुदित व स्वरित - स्वरानें कमी जास्त करतां येणें यापलीकडे जराही धाव घेतां येणार नाहीं. फार झालें तर अशा मर्यादित स्थितीला गायनाची प्रथम-भूमिका म्हणतां येईल. सोटक्याचें ललकारणें, गुराख्याचें गुणगुणणें हीं याचीं उदाहरणें सांगतां येतील. यानंतर त्या ध्वनीची परिणती होत गेली व एकाच ग्रामावर टिकून राहणारा ध्वनि स्वररूप झाला. असा सारखा स्वरित होणारा नाद गायनोपयोगी असून याच नादास ' श्रुति ' असें म्हणतात. स्वरशास्त्रांत ज्या २२ श्रुति म्हणवितात त्या ह्याच होत. जो नाद " श्रुति " या विशेषणास पात्र ठरतो त्यांत तीन गुण असावे

लागतात. ( १ ) अखंडता, ( २ ) माधुरी, ( ३ ) अभिव्यक्तता या तिहींच्या योगानें नाद रसाला उत्पन्न करूं शकतो. नाद जो रस उत्पन्न करतो तो कशा प्रकारचा आहे हें ज्यामुळें ओळखतां येतें त्याला त्या नादाची म्हणजे स्वराची जाति म्हणण्यास हरकत नाहीं. रस मिश्रणानें स्थायी इत्यादि भाव उत्पन्न करतो. नुसता रस कोणत्याहि नामाभिधानास पात्र होत नाहीं, कारण तो “ अखंड ” आहे. म्हणून त्याला ब्रह्मस्वरूप कल्पून श्रुतीनें “ रसो वै सः ” अशी त्याची ब्रह्माशीं एकवाक्यता करून दिली आहे. एकाच स्वराच्या संघातानें उत्पन्न होणारा रस दुसऱ्या स्वरसंघातानें म्हणजे विहिताविहित स्वराच्या लयोदयानें — ज्याला गायनशास्त्राच्या पारिभाषिक शब्दांत वादि-विवादि-स्वर म्हणतात — विकृत होतो व ही विकृति गानविद्येचें मूळ आहे. येथें “विकृत” शब्दाचा अर्थ शास्त्रीय घ्यावयाचा ( विकृत म्हणून स्वराचें लक्षण येथें विवक्षित नाहीं. ) ‘ ब्रह्मावर जगत् विकृत होतें ’ ही शास्त्रीय परिभाषा आहे. अस्तु. याप्रमाणें स्वरांत रस उत्पन्न करण्याचें सामर्थ्य ज्यास उमजूं लागतें तो गायनकलेचा “ मुमुक्षु ” होय. रसयुक्त गायन आत्मशुद्धि करणारें आहे, व अशाच गायनाची महति “ मनुष्यगन्धर्वाणामानंदः ” या शब्दानें तैत्तिरीयोपनिषदांतर्गत ब्रह्मानंदवल्लींत वर्णिली आहे.

‘ गाण्यांत रस आहे किंवा नाहीं ? असा प्रश्न टाकल्यास कोणताहि गायक “ रस आहे ”.असें म्हणेल; पण त्याचा परिपोष करून दाखवाल काय ? असा परिप्रश्न केल्यास “ हो ” म्हणणारे त्यांतून निघतील कीं नाहीं याची शंकाच आहे; कारण गाण्यांत “ रस ” आहे अशी ढोबळ कल्पना झाली तरी तिचा परिपोष व उत्कर्ष कोणत्या रसानें होतो हें कळणें कठिणतर आहे. याचा तितका खोल आणि दृढतर ( मननीय विचार किंवा ) अभ्यास केल्याशिवाय तसा रस उत्पन्न होणें शक्यही नाहीं. हसणाऱ्याचा किंवा रडणाऱ्याचा ध्वनि साहजीकपणें हास्यरस व
२

शोक ( करुण ) रस उत्पन्न करतो असें सकृद्दर्शनीं वाटलें तरी हेंच भाव मनावर उत्पन्न करण्यास फार अडचण पडेल. हास्यरसात्मक स्वरांच्या जाति ठरलेल्या तद्वत् करुणरसाच्याही पण ठरल्या आहेत. तर मग ते ते जातिनिष्ठ स्वर घोळीत राहिल्यास तसा रस उत्पन्न कां होऊं नये ? याचें शास्त्रीय वर्म असें आहे कीं, "भौतिक विकारानें स्वरित होणारी नादावलि उत्तीर्णावस्थेला गेलेली असते, तेथें स्वरांची रचना नियमबद्ध-स्वरूपांत साद देणारी नसते म्हणून तो एक गोंगाट म्हणवतो व ज्यांवर परिणाम व्हावयाचा तेसुद्धां अशा प्रकारच्या गोंगाटानें अनेकवेळां अनुभूत असल्यानें गोंगाट करणाऱ्यांच्या मनांतला रस एकदम ऐकणाऱ्यांच्या मनांत उत्पन्न होतो" गायनांत भौतिक-विकार नसतात. स्वराच्या अभिजात पराक्रमावर आधीं रसाचा मांडव उभारावा लागतो व नंतर आलापादिकांच्या ताम्र, सुवर्णादि पत्र्यांनीं त्याला स्थायिक स्वरूप द्यावें लागतें. एन्जिनमधून होणारा तिचा भौतिक-विकार एकदम गाडी आल्याची जाणीव उत्पन्न करून देतो व एन्जिनच्या भपक्यावर गाडी आली हें समजण्यास कोणासही मुळींच अडचण पडत नाहीं. गाडी येण्याचें सूचक जसा एन्जिनचा भपकारा आहे तशी शीटही पण आहे; परंतु शीट देतांना ठराविक सादच घालावा लागतो. स्वराची tune बदलल्यास कमी सरावाचा माणूस गाडी आली हें ओळखूं शकणार नाहीं. ठराविक सादामुळें स्टेशनावरील कूलीलोकसुद्धां कोणतें एन्जिन आहे हें सरळ ओळखतात; कारण प्रत्येक कम्पनीच्या एन्जिनच्या शीटीचा साद पृथक् पृथक् असतो. शीटीसारखा आवाज काढून माणसेंहि गाडी आल्यासारखें भासवितात. हा प्रकार उदित स्वराचा पण गायनाचें उदाहरण इतकें स्पष्ट नाहीं. गाडी धावतांना तिचा जो निनाद एक मैलभर पसरतो त्या निनादावरून गाडीचें निदान करण्याची जी कला ती गायनाशीं निगडित आहे. वाऱ्याचा सोसाटाही तसाच भास उत्पन्न करूं शकतो; पण गाडीच्या निनादांत जी सूक्ष्म स्वरावली असते ती वाऱ्याच्या

सोसाट्यांत नसते. तसलाच कांहींसा प्रकार गायनाच्या रसाचा आहे. ज्या रसाची निष्पत्ति हवी असते त्याची शुद्ध छाया ज्या स्वरांनीं प्रसारित होईल असा थाट मांडून त्याचा उत्कर्ष करीत गेल्यास परिणामकारी रसाविष्करण झाल्याशिवाय राहणार नाहीं. असा रस उत्पन्न करणारे गायक मागें होते अशी "दीपक" रागानें दिवे लागल्याची शालिवाहनशकापूर्वींची उद्दीपक साक्ष कथन करणाऱ्या कथा किंवा "मल्हार" रागानें पाऊस पडल्याच्या आख्यायिका ऐकीवांत तरी आहेतचना ?

कै. वा. किर्लोस्करांच्या संगीतकृतीसंबंधीं सर्वसाधारणदृष्ट्या समयोचित रागांची शास्त्रसंमत संयोजना यांच्या बहुतेक नाटकांतून सर्वश: पाळली गेल्याचें स्पष्ट दिसून येईल हें कै. वासी किर्लोस्करांच्या नाट्यग्रंथांतील महत्त्व व विशेषत्व म्हणून "कै. वा." या द्व्यक्षराबरून "संगीतशास्त्रकैवारी" हा आपोआप उसळून आलेला शब्द किर्लोस्कर या नांवाशीं जुळविण्याचा लोभ पाहून वाचकवर्ग उलट प्रसन्नसुद्धां होतील. सद्य:प्रसंगीं "संगीत" ( आधुनिकाभिमत - व्याख्यान्वयें ) म्हणविणाऱ्या नाटकांतसुद्धां नियमितपणें शास्त्रपरिपालनप्रथा महाराष्ट्र भाषेंतील आद्य नाट्याचार्यांनीं सुरू केली हें तर निर्विवादपणें ठरतें ! पुढें ती चाल तशीच चालविली गेली नाहीं ही गोष्ट निराळी ! ! उदाहरणार्थ तो धरबंध गायकाच्या सरावांतील राग वाटेल त्या प्रसंगीं आळविण्यास प्रतिरोधक होत असल्यामुळें सौलभ्यसिद्ध्यर्थ कोणतेंहीं नाटक दोन-चार वेळां तरी "भैरवी" राग जो नाटकाच्या ठराविक ९॥ ते १-१॥ पर्यंतच्या कोणत्याही वेळीं गातां न येण्यासारखा पण प्रामुख्यानें आल्या शिवाय संपतच नाहीं. म्हणूनच कीं काय "राग तालादि कसल्याही शास्त्रीयत्वाचा अटक ज्यांत नसतो तें नाटक" अशी "नाटक" शब्दाची व्याख्या प्रचारांतसुद्धां आली; पण असली व्याख्या विनोदप्राचुर्य या सदराखालीं

शास्त्रकोविदांनीं उपेक्षणीय समजल्यामुळें किंवा तिकडे मुद्दाम दुर्लक्ष्य केल्यामुळें क्षम्यही ठरली गेली असावी.

याहून अधिक खोल शिरल्यासही अण्णासाहेबांच्या नाटकांतील बहुतेक किंबहुना सर्वच पद्यांत रागाच्या ठराविक रसानुकूल अर्थप्रतिपादन करणारी सुशब्दसंयोजना पाहिली म्हणजे संगीतकैवारी किर्लोस्कर शतशः धन्यवादास योग्य व खरे अधिकारी होत यांत शंका वाटत नाहीं. अपवाद म्हणून क्वचितच अशीं स्थलें सांपडतील. उदाहरणच पाहिजे असल्यास "शाकुंतल" नाटकांतील "लाविलि थंड उटी" या पद्याकडे वाचकवर्यांचें लक्ष्य वेधावें लागेल. हें पद अभिसारिकेचें आहे व तिच्या तोंडून वदविला जाण्यायोग्य शृंगारही त्यांत आहे; पण हें "मालकंस" रागांतील आहे! आणि मालकंस हा वीररसात्मक राग होय!! तेव्हां हें पद ऐकतांना कर्णकटु, कर्कश आणि कंटाळवाणें व्हावयास पाहिजे! पण तसा प्रकार स्पष्टपणें दिसून येत नसला तरी क्वचित् शास्त्रज्ञ रसिक तेवढे "हें पद विरस वाटतें" असें केव्हांतरी म्हणतांना अडळतात. म्हणून सिद्धकंठ गायकाच्या अभावीं उलट असेंसुद्धां म्हणण्याची पाळी येते कीं, जर मालकंसामुळें वीररसाचा परिपोष करण्याचें साधन तयार असतें किंवा मालकंसाची स्वरावलि वीररस प्रस्फुरित करूं लागली असती तर श्रोत्रगणांस हें पद ऐकवलेंच नसतें. हें शास्त्रपरिशुद्ध गायनाभ्यास दुरावत चालल्याचें आणि क्रियासिद्धी तर पुरीपुरी पारखी होत गेल्याचें लक्षण!! एवढाच यांतील आशय. तरीपण त्यांत सत्य जरूर आहे! याचें प्रत्यंतरच पाहावयाचें असल्यास वीररसाचा आविर्भाव आणून "मज बहुतचि ही आशा होती वहिनी" किंवा अगदीं अलीकडील "दुर्दैवनगाच्या शिखरीं" हें शोक-गीत गाण्याचा कोणी प्रयत्न करून पाहावा. त्याचप्रमाणें "धि:कार मन साहिना" हें पद रडक्या स्वरांत घोळघोळून, आळवून पाहावें म्हणजे शब्दांत त्याच मानानें

स्वरांतसुद्धां रसोत्पादनक्रिया कशी व किती असते हें सरळ आणि सुलभपणें त्यांना कळून येईल.

" स मा लो च न " हें शीर्षक मीं या लेखास दिलें आहे खरें; पण समालोचन या शब्दसंघातून (सम्यक् आलोचन — चांगलें आलोचन) पूर्ण, सर्वांगीण निरीक्षण असा अर्थ अभिप्रेत होतो व यायोगें एक मोठी जबाबदारी मजवर येऊन पडते. नाटकाचें सर्वांगीण निरीक्षण करावयाचें म्हणजे, संविधानक, रचनाचातुर्य, स्वभावपरिपोष, रसाविष्करण, संगीत व काव्यदिग्दर्शन या सर्वांची विस्तृत चर्चा केली पाहिजे; पण यापूर्वी अनेक साहित्यकोविदांनीं किर्लोस्करांच्या नाटकांवर उत्कृष्ट टीकालेख लिहून या पैकीं बहुतेक विषयांची सुंदर चर्चा केली आहे. त्यांतील फक्त संगीतात्मकचर्चेनें या साहित्योपासकांचें तितकेसें लक्ष्य वेधलेसें दिसून येत नाहीं तेव्हां श्रीमन्महाशय प्रो. श्री. रा. रा. श्री. नी. बापूसाहेब चापेकर यांच्या प्रेमळ आज्ञेनुसार तेवढ्या उर्वरित भागाची यापुढें यथाशक्ति चर्चा करावी या हेतूनें आतांपर्यंत संगीत-नगरीचें विहंगमावलोकन करून झाल्यावर त्यांतील " संगीत सौभद्र " या चेतोहर भव्य व सुंदर मंदिरांत आपण प्रवेश करूं.

ईशस्तवनोत्तर नाटकाला सुरवात ज्या पदापासून होते तें इतकें अर्थपूर्ण व आटोपशीर आहे कीं, सर्वसाधारण श्रोत्यांच्याही हृदयाशीं चटकन् समरस होऊन जातें. अगदीं सुरवातीची नान्दी " भूप " रागांत आहे. तो राग "गीयते पूर्वयामे" या शास्त्रवचनान्वयें नाटकसुरवातीच्या समयानुकूलच आहे. शिवाय काव्यशास्त्रदृष्ट्याही तें नादमाधुर्यानें भरलेलें आहे. यायोगें दुप्पट जोरानें संगीतदृष्टीला जसें समाधान लाभलें तद्वत् लगेंच पुढील "झाली ज्याची उपवर दुहिता" हें सुंदर पद काव्यदृष्टीलाहि अनेकप्रकारें प्रसन्न करण्यास पुढें सरसावतें. एकतर हें मुळांतच रसाळ आहे, अर्थपूर्णहि आहे आणि यांतील कमनीयतातर कमा-

* पृ. ५ (नववी आवृत्ति १९२५) वरील " वैशाखमासि वासंतिक-समय " आणि (पृ. ६) " नाहिं झाले षण्मास " हीं २ पद्यें समयोचित " झिंझूटी" रागांतील आहेत हा रागही भूपानंतरच्या क्रमानें १७-१९ वा आहे. याच्याच पुढील "लीलांबरी (नीलांबरी) [पृ. ६] "बिलावल (वेलावली) (पृ. ७, ८) आणि " कानडा ", विहाग (विहंग) यासारखे शुद्ध रागही या अंकांत आहेत; पण नीलांबरीपर्यंतच्या रागांना जी क्रमसंसिद्धि साधली तिला मध्येच अवेळीं आलेल्या "वेलावली"चा अडथळा आला. कारण, त्याबद्दल "प्रातःकाले" हें शास्त्रवचन समयानुचित प्रतिकूल असें आहे, तरी इतकें तंतोतंत शास्त्रपरिपालन सर्वशः प्रचारांतही पण नाहीं. " राधाधरमधुमिलिंद " (पृ. ९) हें श्रीनारदाचें पहिलें व शेवटलें " पावना वामना" (पृ. १७) अशीं दोन पद्यें भक्तिरसप्रधान, लाटानुप्रासयुक्त अतएव ( काव्य – संगीतात्मक उभयशास्त्रानुकूल ) नादमाधुर्यानें पूर्ण भरलेलीं ! एकूण या अंकांतील पद्यांनीं काव्यात्मक दृष्टीलाहि सुप्रसन्न राखून संगीतशास्त्रान्वित सुसंबद्ध-क्रमसंसिद्धीहिं प्रस्थापित केल्याचें पाहून संगीत आणि काव्य एकमेकांच्या हातांत हात घालून सहज सहल करण्यास निघाल्यासारखें वाटतात. येथें श्रीनारदाच्या तोंडून वदविलेल्या प्रत्येक पदांत स्वभावपरिपोष जो दिसून येतो तो लक्ष्यांत ठेवण्यासारखा विशेष आहे. कानडा (कर्णाट) रागांतील " निजरूपीं जगदाकृतिभासा । कारण होउनि करित विलासा" या पदाच्यायोगें तर कमाल केली किर्लोस्करांनीं ! यांत सर्वच विशेषें एकवटलीं आहेत. एकतर " निशियामे द्वितीयके " या वचनानुरूप वेळेच्याही अनुरोधानें पूर्ण समयोचित आहे आणि हा राग जितका प्रौढ तितकेंच पदांतील शब्दलालित्य, अर्थगांभीर्यही आहे. यांतील तिसरा विशेष म्हणजे नाटक सुरू होऊन १॥-२ तासांनीं हें पद

---

* पृष्ठांचा उल्लेख सं. १९२५ च्या आर्यभूषण प्रेसच्या प्रतीवरून केला आहे.

* पृ. ५ (नववी आवृत्ति १९२५) वरील " वैशाखमासि वासंतिक-समयें " आणि ( पृ. ६ ) " नाहिं झाले षण्मास " हीं २ पद्यें समयोचित " झिंझूटी" रागांतील आहेत हा रागही भूपानंतरच्या क्रमानें १७-१९ वा आहे. याच्याच पुढील "लीलांबरी ( नीलांबरी ) [ पृ. ६ ] "बिलावल (वेलावली) (पृ. ७, ८) आणि " कानडा ", विहाग ( विहंग ) यासारखे शुद्ध रागही या अंकांत आहेत; पण नीलांबरीपर्यंतच्या रागांना जी क्रमसंसिद्धि साधली तिला मध्येच अवेळीं आलेल्या "वेलावली"चा अडथळा आला. कारण, त्याबद्दल "प्रातःकाले" हें शास्त्रवचन समयानुचित प्रतिकूल असें आहे, तरी इतकें तंतोतंत शास्त्रपरिपालन सर्वशः प्रचारांतही पण नाहीं. " राधाधरमधुमिलिंद " ( पृ. ९ ) हें श्रीनारदाचें पहिलें व शेवटलें " पावना वामना" ( पृ. १७ ) अशीं दोन पद्यें भक्तिरसप्रधान, लाटानुप्रासयुक्त अतएव ( काव्य — संगीतात्मक उभयशास्त्रानुकूल ) नादमाधुर्यानें पूर्ण भरलेलीं ! एकूण या अंकांतील पद्यांनीं काव्यात्मक दृष्टीलाहि सुप्रसन्न राखून संगीतशास्त्रान्वित सुसंबद्धक्रमसंसिद्धीहि प्रस्थापित केल्याचें पाहून संगीत आणि काव्य एकमेकांच्या हातांत हात घालून सहज सहल करण्यास निघाल्यासारखें वाटतात. येथें श्रीनारदाच्या तोंडून वदविलेल्या प्रत्येक पदांत स्वभावपरिपोष जो दिसून येतो तो लक्ष्यांत ठेवण्यासारखा विशेष आहे. कानडा ( कर्णाट ) रागांतील " निजरूपीं जगदाकृतिभासा । कारण होउनि करित विलासा" या पदाच्यायोगें तर कमाल केली किर्लोस्करांनीं ! यांत सर्वच विशेष एकवटलीं आहेत. एकतर " निशियामे द्वितीयके " या वचनानुरूप वेळेच्याही अनुरोधानें पूर्ण समयोचित आहे आणि हा राग जितका प्रौढ तितकेंच पदांतील शब्दलालित्य, अर्थगांभीर्यही आहे. यांतील तिसरा विशेष म्हणजे नाटक सुरू होऊन १॥-२ तासांनीं हें पद

---

* पृष्ठांचा उल्लेख सं. १९२५ च्या आर्यभूषण प्रेसच्या प्रतीवरून केला आहे.

अगदीं कानड्याच्या वेळेला म्हटलें जातें! पद्यार्थ तर तत्त्वमंडित वेदान्तपर!! येथील उभयविधरसानुकूल तर गांभीर्य अननुभूत आनंद अनुभवावयास लावतें!!!

वाचकवर्य! "नाटक" या शब्दोच्चाराबरोबर त्यावर सर्वसाधारणत: जी एक थिल्लरपणाची समजूत केवल मनोरंजन किंवा शृंगारप्रधान विषयोद्दीपक भावनेनें दृढमूल झालेली असते तिला संसृतिव्यसनविस्मरणपूर्वक शाश्वत अशा कैवल्यानंदाकडे वळण घ्यावयास लावून निजरूपपद प्राप्त करून घेण्याचा परमोच्च सदुपदेश किती नाटकांतून झाला आहे बरें? (यद्यपि कोणी करूं गेल्यास त्यास आबालवृद्धांच्या तोंडून ऐकूं येण्याइतकी लोकप्रियता लाभणें सुलभ आहे काय?) हा प्रश्न हातीं घेऊन जे जे जें जें म्हणून नाटक हातीं धरतील त्यांना त्यांना त्या त्या सगळ्यांतून निःसंशय नकारोत्तरच निनादित झालेलें अढळून येईल, तेव्हां ते स्वत: च स्वसंतोषानें "अशाप्रकारचें उच्चतर (एकमेवसुद्धां म्हणतां-येण्यायोग्य) हेंच नाटक" असें प्रांजलपणें कबूल करतील. आधीं तर उन्नत अंत:करणावांचून अध्यात्मपर पद्यें लिहिलींच जाऊं शकत नाहींत. अन्तर्मुखवृत्त्यांतर्गत आनंद आंत न समावला तरच त्याच्या मुक्या लाटा उन्नत होऊन उचंबळूं लागतात. तेव्हांच्या त्या तांडवतंद्रीमध्येंच असलीं रसाळ पद्यें सुचतात.

असाच एक विशेष नाट्यकलेच्या दृष्टीनें दाखवून दुसऱ्या अंकांतील विचाराला लागूं. काव्यांतील सहजता एकाद्या विवक्षित शब्दावरून जशी सिद्ध होते तद्वत् "याहुनि होउनि संन्यासी" (पृ. ३०) यांतील "संन्यासी" हा त्र्यक्षरी शब्द – खरोखरींच अर्जुनानें पुढें त्रिदंडसंन्यासच घेतला आहे ही गोष्ट ध्यानांत घेतल्यास नाटकांतील कथानक किंवा संविधानकालासुद्धां सूचक असा अनेकार्थी, अत्यंत महत्त्वाचा, मार्मिक

खोंचदार आणि इतक्यावरही अगदीं साधासुधा म्हणून हा ( शब्द शुष्क-शब्द नसून ) मौल्यवान्, तेजस्वी अष्टपैलू हिरा वाटतो.

दुसरा अंक विचारांत घेण्यापूर्वीं नाटककार आणि नट अशा उभयदृष्टीनें कालिदास आणि शेक्स्पीयर या दोघांहूनाहि अण्णासा. करितां एक पायरी उच्च अशा स्थानाचा जो ओझरता उल्लेख आला आहे त्याचें किंचित् स्पष्टीकरण हवें आहे. नसतां " सम्यक् – आलोचन" या व्याख्येनुरूप सर्वांगीण विवेचन होण्याऐवजीं तें एकांगी स्तुत्यात्मक वाटण्याचा संभव आहे. शेक्स्पीयर झाले तरी उत्तम नट म्हणून त्यांचा कोठें उल्लेख नाहीं. त्यांनीं मुख्यपात्राचें काम केव्हांही केलें नाहीं. तें किरकोळ भूमिका घेत असत. अण्णासाहेबांनींहि मुख्य नायकाची भूमिका कधीं केली नसली तरी श्रीकृष्णाग्रजाची भूमिका जी त्याच्या खालोखालची म्हणवूं शकते प्रत्यहीं सुयशपूर्वक वठवीत असत इतकाच त्यांतील आशय ! आतां दुसरी, पण महत्त्वाची आणि मुख्य अशी बाब म्हणजे "एकमेव" म्हणतां येण्यासारखी नाट्यकृति ठरूं शकते किंवा काय? कारण, नुसत्या लोकप्रियतेवरच असें म्हणावयाचें तर तद्विरुद्ध पुरावा म्हणून "शारदेचें एक पाउल आधिक पुढें पडलेलें कोणीहि पुढें करूं शकेल! यायोगें "गंगा गये गंगादास! जमुना गये जमुनादास!!" या अनिश्चित भक्तिनिदर्शक म्हणीप्रमाणें धरलेला सदाभिनिवेश डळमळंता ठरूं लागेल! तेव्हां यांतीलही आशय अधिक स्पष्ट करणें भाग पडलें. अण्णासाहेबांना "नाटकाचे आद्य जनक" म्हणण्यांत तर कोठेंहि मतविरोध दिसून आला नाहीं हें जितकें सत्य तितकेंच सत्य संगीत वैगेरे लोकरंजकसाधनें अशिक्षितवर्गातील असभ्यतानिदर्शक ज्या कालांत समजलीं जात होतीं, जें संगीत " नाच-तमाशा " पैकीं एक गणलें जात होतें तशा पूर्ण प्रतिकूल कालांत संगीताला सभ्य व सुशिक्षित वर्गांत जागा मिळवून देणें हें असाधारण कार्य म्हटल्यास फारशी चूक होणार





नाहीं. संगीत-नृत्य कला म्हणजे "समस्त दुर्गुणांची – विशेषतः कैफी जनांची जननि" असा दुसता निर्वाळा तत्कालीन समाजानें दिला होता इतकेंच नव्हे, तर याचा संपर्कही लागूं न देण्याचें व्रत सभ्य आणि सुशिक्षित वर्ग तितक्याच तीव्रतेनें पाळीतही पण होते, अशा भोंवताल्च्या अत्यंत बिकट परिस्थितींत ज्यांनीं अनेक प्रतिकूल प्रत्याघात सोसून केवल स्वतःच्या प्रयत्नानें सुयशस्वितपणें संगीताला सद्गुणमंडित ठरविलें त्यांचे अतोनात उपकार "नाटक" या शब्दोच्चाराबरोबर प्रत्येक महाराष्ट्रीयहृदय प्रांजलपणें कबूल करील. स्त्रियांनींच स्त्रियांच्या भूमिका कराव्यात अशा प्रकारच्या विचारसरणीला प्रत्यक्ष प्रायोगिक स्वरूप देण्याची प्रथा पडलेल्या कालांत कै. वा. अण्णासाहेबांच्या या नवीन सुधारणेबद्दल तितकासा आदर वाटणार नाहीं; पण कोणत्याही व्यक्तीच्या कार्यांची मूल्यवत्ता ती ज्या कालांत झाली त्या कालांतील परिस्थितीवरूनच चोखाळणें न्यायाचें आहे हें विसरून चालणार नाहीं. अस्तु.

# "दुसरा अंक"

दिंड्या, साक्या वगळल्या तर दुसऱ्या अंकाच्या सुरवातीपासूनच्या ८,१० पद्यांपैकीं कांहीं राग उपरिनिर्दिष्ट "नाटक" या शब्द–मीमांसेकडे किंचित् कलंडलेले वाटण्याचा संभव आहे; कारण त्यांवर नुसत्या चालींच दिल्या आहेत. तरीपण तीं सर्व पदें रात्रीच्याच रागांतलीं आहेत. "भैरवी", "सारंगा" सारख्या पूर्ण प्रतिकूल वेळांच्या रागांचासुद्धां आधुनिक नाटकांत सररसहा धिंगाणा जो चालतो त्या दृष्टीनेंच ती मीमांसा अन्वर्थक ठरते. प्रस्तुत प्रसंगीं फार झालें तर "तितकी तंतोतंत क्रमबद्धता येथें किंचित् सैल झाली" इतकेंच म्हणतां येईल. त्यानंतरच्या शेवटशेवटचीं "माझ्या मनिंचें" (५४) व "किति सांगु

तुला" ( ५७ ) – यद्यपि मध्येंच " अरसिक शेला " ( ५५ ) आणि " पिलु" ( ५६ ) आला असला तरी हीं दोन पदें क्रमाभियुक्त "जोगि" ( जोगिया ) ( ५४ ) व "आनंदभैरवी" ( ५७ ) ( आनंदभैरव ) रागांतील – ( आधीं "आनंदभैरव" आणि नंतर " जोगिया " असा शास्त्रीय क्रम आहे तरी ) – अगदीं समयोचित अशीं आहेत. " पिलु" ( पील्लू ) जात्याच कोमल ! त्यावर तितकी तीव्र दृष्टि रोखतां येत नाहीं. इतर रागांना तीव्रतेनें कालनियम घालून देणारें शास्त्रसुद्धां " गीयते सर्वकालम्" अशी याला सूट देतें ! विशेषतः खास " पिलु "बद्दलतर " सदा गेयः सर्वार्भकतरुणवृद्धैः" अशा शब्दांनीं गोंजारून सबंध चोवीस तासाची सूट (सुट्टी) देऊन ठेविली आहे. म्हणून दयेच्या दृष्टीनें त्यावर मायेचें पांघरूण घालावें अशी त्याबद्दलची माझी रदबदली आहे ! असो. " भूपकल्याण", " बागेश्वरीबहार " या सारखे जे मिश्रराग असतात त्यांत प्रत्येकीं फक्त त्या दुसऱ्या एकाच रागाचें मिश्रण असावें असा निर्बंध आहे. यासारखेंच, पण याहून अधिक स्वातंत्र्य ज्यांत आहे अशा " जिल्हा " या शब्दाशीं एकाद्या रागाचें नांव जोडल्यास उदाहरणार्थः– " भूपजिल्हा", " काफीजिल्हा", " खमाजजिल्हा", " सोरटजिल्हा", " पिलूजिल्हा" इ. इ. संगीतशास्त्रान्वयें " जिल्हा" ज्या रागाशीं संलग्न होतो त्याचें स्वरूप तेवढें मधून मधून स्थिर राखून इतर आजूबाजूच्या रागांतील क्वचित् स्वर गायक वापरूं शकतो अशी एक या " जिल्ह्या "पुरती सूट मिळाली असल्यामुळें येथील नियमनिर्णायक निकष सर्रास सरसावूं शकत नाहीं. यांत पुन्हा नुसता " जिल्हा " म्हटल्यावर त्याला एवढाही धरबंध नसतो असले यद्यपि प्रत्यक्ष नामनिर्देशयुक्त पुढील चौथ्या अंकांत पृ. ८६ व ८८ वर दोन जिल्हे आले आहेत, तरी पहिल्या अंकापासून तों पांचव्या अंकांतील " सुवहित जाहलें" या पद्यापर्यंत चालीवरील पदें तर मनस्वी आहेत. या सगळ्यांचा समावेश सरसगट जिल्ह्यांत होऊं शकतो. चालीवरील पदें झालीं तरी तीं अशास्त्रीय म्हणविलीं जात नसून " ठुंबरी"

या सदराखालीं मोडतात. कारण, कोणत्या ना कोणत्या रागाशीं किंवा मिश्ररागाशीं तीं संमिलित असतात हें असल्या जिल्ह्यांचें बाहुल्य आमच्या नाट्यसम्राटांचें साम्राज्यैश्वर्यच प्रकट करीत असून या मुख्य राजधानी स्वरूपाच्या "संगीत सौभद्रा"स साजेलसेंच दिसेल. शिवाय दुसऱ्याही एका दृष्टीनें स्वातंत्र्याभिमुख असे राग कायदेशीर असूनही वर गायकास फायदेशीर असतील तर सढळपणें यांचा उपयोग केल्यास प्रत्यवाय कसला ? नाटक एक संस्था म्हणवते. यांतील प्रमुख एक दोन पात्रें शास्त्रपरिशीलन केलेले अत्युत्कृष्ट गायक असतात. सर्वच नट उत्कृष्ट असणें केव्हांही शक्य नाहीं ! तेव्हां इतर साधारण पात्रांच्या तोंडीं चालींचीं साधीं पदें घालावींच लागतात ! अधिक तर काय, क्वचित् प्रसंगीं प्रेक्षकाभिरुचीनुरूप मनसाकृष्टक प्रथित चालींचीं कांहीं पदें प्रमुख पात्रांकडूनही म्हणवावीं लागतात.

यांतील काव्य पाहूं गेल्यास "व्यर्थ मि जन्मलयें थोर कुळीं (४९)" हें पद्य अर्थपूर्ण, अत्यंत रसाळ व जितकें सरस आहे तितकेंच सरळही आहे. "वद जाऊं कुणाला शरण (५०)" हें करुणरस पोषक असून वरील पदाची जोडी म्हणून जास्त शोभतें. नाटककारांनीं शेल्याला अरसिक ठरवला आहे; पण या शेल्यांतील "ला" चा लाटानुप्रास हमखास रसिकांस आवडला खास ! "दुर्मिळ जें स्थळ मजला ॥ तें सहज मिळुनि या दुर्भाग्याला ॥ तेथुनि कां हा ढळला ? ॥ (५१)" हा उत्प्रेक्षात्मक प्रश्न कोणत्या रसिकास प्रसन्न करणार नाहीं ? "वधुनि उपवना" (५६) या पद्यांतील कल्पनासौंदर्य कुणाची मान डोलवावयास लावणार नाहीं ! ! रुक्मिणीस केलेल्या उलट प्रश्नानें समर्पक उत्तर मागितलें खरें, पण त्यायोगें एकीकडे रुक्मिणीचें तोंड बंद करावयास लावलें तर दुसरीकडे उभयतां सुभद्रा आणि रुक्मिणीचें नातें लक्ष्यांत घेतां एकमेकांचीं वर्में काढण्याची मार्मिक शैली आणि बायकांची

स्वाभाविक भाषा यायोगें साहित्यदृष्टीसही सुप्रसन्न करून प्रेक्षकांच्या तोंडून सहजोद्भूत प्रशंसोद्गार काढविल्यास नवल तें काय?

## तिसरा अंक.

या अंकांतील पहिलें व शेवटलें "भूपाली" (६५,८५) रागाचें आणि त्याच जातींतील "कालंगड्यां"तील (७५) एक पद या तिहींनीं—यद्यपि मध्येंच "मल्हारा"नें (७७) उडी घेतल्यामुळें समयोचित शास्त्रोक्त क्रमाचें परिपालन केलें नसलें तरी — "प्रातर्गेयो" या वचनान्वयें समायोचित कालनिर्णय अवश्य पाळला आहे; कारण प्रभातकालांतील (सूर्योदयापूर्वींचे) हे राग होत. शिवाय शेवटल्या "प्रिये पहा रात्रीचा समय सरुनि" (८५) या पद्यांत काव्यशास्त्रांतर्गत "मुद्रालंकारासारखा प्रकार "येत उषःकाल हा" यांतील "उषःकाल" शब्दानें रागाची वेळ सुचविल्यामुळें सहजांत साधला आहे. याच मानानें दुसरी बाजू पाहूं गेल्यास "भैरव", प्रभात, विभास, यानंतर १२, १३ राग ओलांडल्यावर "भूपाल" चा क्रम येतो. पद्याच्या शिरोभागीं तर रागाचें नांव "भूपाळी" असें स्पष्टपणें दिलें आहे; पण तसेंच म्हणूं गेल्यास त्याचा शास्त्रीय कालनिर्देश "निशि" अशा निःसंदिग्ध शब्दानें झाला असल्यामुळें तो पद्यांतील वर्णनाला मुळींच जुळत नाहीं तेव्हां "भूपाल" हेंच या रागाचें नांव धरून चालणें जास्त सयुक्तिक होईल. त्यांतही पुनः ढोबळ मानानें जरी "प्रातर्गेयो" या सदराखालीं वरील चारही राग ढकलतां आले तरी सूक्ष्मदृष्टीनें परस्परांतील कालनिर्देशनांत बराच दूरचा अंतर पडतो. उदाहरणार्थ येथें घेतलेल्या चार रागापुरतेंच पाहिलें असतां, पहिल्या "भैरव" आणि चौथ्या "भूपाल" यांबद्दल "प्रातःकाले" असा संदिग्ध कालनिर्देश असला तरी "प्रभाता"बद्दल "प्रत्यूषकाल", "विभासा"बद्दल "उषसि" असा गायनशास्त्रांत स्पष्ट उल्लेख आहे. त्या अर्थी "विभास" हाच

राग याला पूर्ण परिपोषक आहे, आणि " येत उषःकाल हा " या वर्णनाला पूर्ण अन्वर्थकही आहे. इतरत्र हें पद याच रागांत म्हणत असलेलें ऐकण्यांतही आलें आहे. अस्तु. इतक्या बारकाईनें पाहिल्यास प्रत्येक अंकांत असे अनेक आक्षेपार्ह प्रसंग दिसून आल्यानें इकडे आमचा मुख्य हेतु जो किर्लोस्करांच्या शास्त्रवचनपरिपालनांतील दक्षतानिर्देशनाचा आहे त्यावरच " मूले कुठारः " या न्यायें कृतप्रणाशनात्मक मोठा दोष येतो, तर तिकडे " मनःपूतं समाचरेत् " ही औपहासिक म्हण लागू केल्याचा अकृताभ्यागम-दोषही येऊन चिकटतो! तेव्हां उभयपक्षही दोषसंपर्कापासून अलिप्त ठेवण्याची सोय उपरिनिर्दिष्ट " मनःपूतं" या म्हणींतील श्लेषमूलक वक्रोक्तीमध्येंच आहे. "मनःपूत " याचा अर्थ मनस्तोक्त असा नसून कितीही प्रकारानें किंवा कशाही तऱ्हेनें शास्त्रवचन पाळावें म्हटलें तरी शास्त्रीय अडचणींतून पार पडण्यास वावच सांपडत नसला अशा प्रसंगीं आपल्या मनालाच विचारावें व तें जो मार्ग दाखवील तो " पूत" पवित्र सन्मार्ग समजून त्याचें अवलंबन करावें, असा खरा अर्थ होय; पण अशा वेळीं तें तसलें मनसुद्धां नेहमीचें शास्त्रावगाही तितकेंच पवित्र असावें लागतें हें मुळींच विसरतां कामा नये.

निष्कपटी, अत्यंत सरळ स्वभावी बलरामाच्या शुद्ध सद्भक्तिपर भाषणापासून या तिसऱ्या अंकाची सुरवात आहे. सुरवातीलाच विरोधवैचित्र्यानें जो रंग भरत चालला तो उत्तरोत्तर अंकाच्या शेवटापर्यंत वाढतच राहिला. " जीं जीं कर्मे त्या योग्याच्या हस्तानें घडतीं॥ निष्कामत्वें सहजपणें तीं झालींसीं दिसतीं " हें पद्य सद्भक्तांच्या हृदयांत दाटलेल्या सात्त्विक-भक्तीचे अष्टभाव प्रकट करण्यांत जितकें सत्य दिग्दर्शन करतें तितकेंच याच्या विरुद्ध उत्तरात्मक " वधुनि सुभद्रेला॥ कसा यति वेडावुनि गेला॥ " हें पद्य सत्यच कथन करीत असूनहि

अवश्यंभावी विरुद्धप्रतिपात्ति मुळींच होऊं देत नाहीं. नाट्यकलेंतील खरें कौशल्य काय तें हेंच ! पुढील " घाली सारें मीठ तुपांताचि " आणि " जेव्हां जेव्हां वाढायातें " हीं दोन्ही पद्यें जवळजवळ पूर्ववत् परि-प्रश्नात्मक दिसून आल्यानें पुनरुच्चारित वाटतील; पण हेतुसाफल्य दुप्पटीनें पदरांत पडतें. शिवाय दादांचा राग व तो शमविण्याची कृष्णाची शैली नाटकाला दुप्पट रंग चढविते. " प्राप्त होय जें निधान करिं तें दवडूं नये " या ज्येष्ठबंधूंच्या हितोपदेशावरील उत्तरार्थ श्रीकृष्णांनीं " वसंतीं बघुनि मेनकेला " आणि " लाल शालजोडी " या पद्यजोडीचा उपयोग केला आहे. त्याचेंही पण प्रत्युत्तर " रंभा मोही सकलाला ॥ परि तिज शुक तो गुरु झाला " हें किति समर्पक आहे बरें !! भूगोलस्थित मंदिरांतील " परम सुवासिक पुष्पें " हें वस्तुस्थितीचें हुबेहूब वर्णन ठरतें तर याच्या नंतरचेंच " नभ मेघांनीं आक्रमिलें " हें खगोलांतील वर्षावर्णन पुढील पतिपत्नींतील संवादाची प्रस्तावनाही सुचवितें ! " नच सुंदरि करुं कोपा " याचा उत्तरार्थ " करपाशीं या तनुला " यांतील उत्तानशृंगाराच्या योगानें रंगभूमीवरील शृंगारमर्यादेचें किंचित् अतिक्रमण झाल्यासारखें वाटतें न वाटतें तोंच याच्यापुढील " अति कोपयुक्त होय परी सुखाविते " यांतील मुग्ध किंवा अस्फुट शृंगार प्रेक्षकांना आनंदानें डोलावयास लावतो. यांच्यांतील "पा" आणि " ला " लाल शालजोडीची आठवण करून देतात. शिवाय शृंगाररसानुकूल अर्थपरिपोष किती बहारीचा साधला आहे ! नाट्यकलेच्या दृष्टीनें कांहींअंशीं हा शेवटला प्रवेश अनावश्यक वाटत असला तरी या अंकाला सुरवातीपासूनच जो रंग चढत चालला त्यांतच शेवटपर्यंत प्रेक्षक दंग होऊन राहतात. अशा प्रत्यक्षानुभवावरून पाहतां याच प्रवेशांतील श्रीकृष्णांच्या " बोलण्याच्या नादांत रात्र कशी सरली, हें कांहीं कळलें नाहीं " या वाक्याप्रमाणें "अंक इतक्या लवकर कसा संपला ? " असेंच प्रेक्षकाला वाटत असेलही !

# चवथा अंक.

या चवथ्या अंकांतील पूर्वार्धांत " झिंझूटी " आणि उत्तरार्धांत " केदार " यासारखे मध्यरात्रीच्याही अलीकडील वेळेचे राग आहेत. शुद्ध-राग असे हे दोनच ! बाकींचीं ५, ६ पदें चालीवरचीं आहेत. राग समयोचित नसले तरी त्याहून फार दूर गेले नाहींत. रात्रीचे राग तरी आहेतचना ! अशा प्रसंगीं आधीं " केदार " आणि नंतर " झिंझूटी " असा याचा क्रम असता तर त्यांतल्यात्यांत थोडेसें अधिक बरें दिसलें असतें. तरी पण कांहीं विशेष बिघडलें नाहीं. जसें या अंकाच्या सुरवातीला दोन जिल्हे आले आहेत, शोभलेही बिचारे ! " जिल्हा " म्हणून ! ! तद्वत् यावरही संगीतशास्त्रज्ञांचा तेवढा तीव्र दृष्टिक्षेप होणार नाहीं ! आधींतर या अंकांत इतर अंकाच्या मानानें पदांची सगळयांत कमी अशी आठ ही संख्या भरते. सगळयांत जास्त म्हणजे पहिल्याच अंकांतील पद्यांची ३९ ही संख्या आहे. त्याच्या खालील स्थान पांचव्या, तिसऱ्या आणि दुसऱ्या अंकास उतरत्या क्रमानें मिळतें. कारण त्यांच्यांतील पदांची संख्या अनुक्रमें १९, १६ आणि १४ भरते. शैक्षणिक परीक्षेंतील शेंकडा प्रमाण धरल्यासमात्र प्रस्तुत अंकांत शास्त्रोल्लेखित चार राग आले आहेत तेव्हां संगीतदृष्टीस येथें यत्किंचितही हिरमुसलें होतां येण्यासारखें अत्यल्प कारणसुद्धां उरत नाहीं. उलट शेंकडा पन्नास गुण पदरीं पडत असल्यामुळें ती हर्षनिर्भरही होईल. ही बाजू यद्यपि नुकतेंच संपलेल्या तिसऱ्या अंकाच्या शेवटल्या " प्रिये पहा " किंवा दुसऱ्या अंकांतील " बघुनि उपवना " ( पृ. ५६ ) तद्वत् पहिल्या अंकांतील " वलसागर " ( पृ. २४ ) यासारख्या वेंचक आणि प्रामुख्यानें उल्लेखनीय पद्यांतील कल्पनासौंदर्याप्रमाणें यांत एकादें पद सांपडलें नसलें तरी " मज बहुतचि ही आशा होती वहिनी " या

करुणरसपरिप्लुत पदानें आणि " नीरक्षीरालिंगनरूपीं ( पृ. ८८ व ९२ ) या नितांत रमणीय रूपकात्मक पदानें " धान्याचें माप गिन्यांनीं " या मानानें भरून काढिलें आहे.

रुक्मिणीनें केळवण देवकार्याचें तात्पुरतें नाटक रचून अर्जुनाचें नाटकी बिंग बाहेर पाडलें हा गद्यभाग नाट्यदृष्ट्या नितांत सुंदर आणि महत्त्वाचा आहे. याहून अधिक महत्त्वाचें मान पृ. ९८ वरील '... पण " अर्जुना, अर्जुना " असें म्हणूं नकोसग ! ' यांतील नुसत्या तीन अक्षरांचा दोनच वेळ उच्चार केल्यानें दुप्पट किंबहुना चौपटीनें चढतें हा या अंकांतील विशेष म्हणूनसुद्धां लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे.

## पांचवा अंक

या अंकांत देखील मागील अंकाप्रमाणें पूर्वार्धांत कर्णाटकी ( कर्णाट ) पृ. १०५ " देस " ( पृ. १०८ ) आणि " कालंगडा (कलिंग)" असे शास्त्रीय तीन राग आले आहेत. उपरिनिर्दिष्ट चौथ्या अंकांतील रागक्रमासंबंधीं जो उल्लेख झाला तसाच प्रकार येथेंही झाला आहे. फक्त "देस" तेवढा "कर्णाट"(कानड्या)पूर्वीं आला असता तर पहिल्या अंकांतील क्रमाधिक्याहूनहि अधिक प्रशंसनीय हा शेवटला अंक ठरला असता. तरीपण यांतील पद्यसंख्येच्या मानानें शुद्धरागाचें आधिक्य आपला तशा प्रकारचा हक्क प्रस्थापित करूं शकतें. " कालगड्यां "तील " निजरूप इला मी दाऊं का " हें पद्य शास्त्रनिर्णीत रागसमयानुसार - नाटक जरा अधिक उशीरा संपल्यास - म्हटलें जातें. हा विशेष म्हणून दाखवितां येईल. पृ. ११५ वर गवयी-धर्तीवरील एक ठुंबरी आली आहे ( वस्तुतः यावर दिलेली चाल " बागेश्वरी " रागांतील आहे; पण हें पद म्हटलें जातें " धनाश्री किंवा " भीमपलाशिका " च्या अंगानें ). असो.

कांहीं सुंदर कर्नाटकी चालीवरील पदें या नाटकांतून आलीं आहेत तींमुळें नाविन्याबरोबर चित्ताकृष्टताहि तींतून दिसून यावी हा नाटककारांचा उद्देशही बहुतांशीं सुफलित झाला आहे. फक्त दुसरा अंक सोडून पहिल्यांतून दोन तर तिसऱ्या व चवथ्या अंकांतून एक एक

आणि या पांचव्या अंकांतून तर तसलीं तीन पद्यें आलीं आहेत. विशेषत: पहिल्या अंकांतील " नच सुंदरि करुं कोपा " आणि या अंकांतील " पांडुनृपाति जनक " (१०९) व " बहुत छळियले " (११५) या चाली आबालवृद्धांच्या तोंडीं मोठ्या आवडीचीं होऊन बसलीं आहेत. चित्ताकर्षक चालींची सुयोजना हें नाट्यकलेच्या बरोबरीनें गानकलाभिज्ञतेचेंही एक प्रमुख लक्षण म्हणण्यास हरकत नाहीं. हे दोन्ही अवश्यंभावी सद्गुण कै. वा. किर्लोस्करांच्या अंगीं समसमान वसत होते ह्या आणखी एक विशेष जास्त लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. कारण, इतर बहुतेक नाटकांतील पदांच्या चाली निवडण्याचें श्रेय ज्या कम्पनीला नाटक द्यावयाचें असेल त्यांतील एकाद्या उत्तम गायकाच्या किंवा प्रमुख पात्राच्या पदरीं पडत असतें. गायनशास्त्र व लेखनशास्त्र निराळें निराळें असल्यामुळें अशा स्थितींत रचलेल्या पद्यांतील एकांगीपणा – सुंदर व सौरभयुक्त अशा गद्यमय पुष्पवाटिकांच्या पङ्क्तींतून उल्हासित वृत्तीनें फिरतां फिरतां अज्ञातपणें एकाद्या दगडाशीं ठेंचाळून पडल्याप्रमाणें – स्पष्ट प्रत्ययास येत असतो. नाटककार स्वत: गायकही असला तर दुधांत साखर पडल्याप्रमाणें " सुशिक्षितगायक" ही कष्टसाध्य पदवी सार्थ करतो; उलटपक्षीं दूध जसेंच्या तसें कायम असलें तरी मागून आणलेल्या चालीच्या विरजणामुळें दह्यांत परिणाम पावतें इतकेंच! त्यांतही मधुर पद्यरचना झाल्यास साखर पडते खरी! पण तें "श्रीखंड" असें निराळें नांव मिळवितें!! अस्तु.

" नच दृष्टिस पडती ( १०४ ) " या पहिल्या पद्यांतील सदुपदेश नुसता भूमिकेला अनुसरून आहे इतकेंच नव्हें, तर वर प्रथम अंकांत सुचवून ठेवल्याप्रमाणें यांत विविधार्थनिष्पत्तिसुद्धां कशी होते हें आपण पाहूं. "आतां भाषणाचा ओघच बदलला पाहिजे" असा गद्यमय उपक्रम करून हें पद्य सुरू केलें आहे तेव्हां त्यांतून जें कांहीं सांगीतलें जाणार

तें सर्व ओढून ताणून कृत्रिमपणाचेंच असावें; पण अण्णासाहेबांचीं पदें सूक्ष्मदृष्टीनें पाहिलीं असतां पद रचीत असतांना ते त्या विचारांत किती तन्मय होऊन जात असत हें त्या त्या पद्यांतील स्पष्टार्थसिद्धीवरून ध्यानांत येतें. मुनिहृदयाला दिलेल्या निरभ्र नभाची उपमा, तद्वत् सगळ्या जगाला उद्योगार्थ उद्युक्त करणारा तसारि ज्ञानमार्तंड उगवण्याच्या पूर्वीच रात्र कशी नष्ट होते हें सांगण्यास निरुद्योगी पुरुषाच्या क्षयी लक्ष्मीची उपमा किती अन्वर्थक! जिवंत!! आणि सहजोद्भूत आहे!! अशीच तन्मयता लगेच पुढील "पुष्पपराग सुगंधित" या पद्यांतील रमणीयार्थप्रतिपादक शब्दपरिप्लुत निसर्गाचें सुंदर वर्णन पटवून देईल. निबिडकुंजासमोरील मोर-मयूरींचें नृत्य, हरिणांचें बागडणें, शशकांचें धावणें किती रम्य आणि स्वाभाविक वर्णन हें!! "गिरिवरि डोलत नाग हा" ही शेवटली चरणपूर्ती तर कसल्याहि द्वेष्ट्याचीसुद्धां मान डोलावयाला लावील! नाग स्वभावदुष्ट म्हणवतो; पण हा नाग तर जन्मजात खरा गंध-नाद-भोक्ता म्हणून केवल रसिकच! तशांत पुष्पपरागसुगंधित शीतल वनवायु मंदगतीनें वाहात असतां डोलल्याशिवाय स्वस्थ कसा बसेल! इतकेंच उच्चतर स्वाभाविक वर्णनपर "वदनीं घर्मजलाला ॥ पुसुनि पुसुनि कर शिणला ॥ श्वासभरित उर जाहला ॥ ये रक्तपणा गालाला" (१०५) हें हळुवारपणें दर्शित करणारें कोमलभावपूर्ण पद्य चेतोहर वठलें आहे. हीं एकानंतर एक तीन पद्यें चढत्या श्रेढीनें चढत चढत "प्रतिपर्व रसोदयः" ही प्रथित म्हण सार्थ करीत आहेत तों याची सीमाच दाखविण्याकरितां कीं काय, अनेक उत्प्रेक्षा-उपमादि अलंकार-नगरी हिंडून, फिरून नाविन्यनिदर्शक नमून्यांनीं भरलेल्या नावेसह कायमची वसती करण्यास्तव येथें "गिरिवर हा सवदागर" आला असावा किंवा चढणावरील सहज वेगांत आलेली रसाची गाडी दिंडीमुळें थांबवावी लागली असली तरी "सुंदर ललना" १०७, "निःसारीं संसारीं (१०७)," अशा साकीरूपी दोन रुळावरून

दिंडीपर्यंत थेट थडकली असावी ! असें एकाद्यास वाटल्यास नवल काय ? पृ. ११५ वरील " बहुत छळियलें " हें अनुपमेय पण सहजसुंदर पद्य तन्मयतेनें नुसतें वाचतांनाही वाचकास रोमांचित करतें मग नाटक तर दृश्यकाव्यच ! तिथेंही झालें तरी वृत्तितल्लीन - स्थितींतलाच निरीक्षक लागतो. नसतां वरवर वेंधळ्या दृष्टीनें पाहणाऱ्या प्रेक्षकास यांतील गूढ-गुंजनाचा उमग कसा व्हावा ? यानंतर नाटकाचा शेवट प्रेमप्राप्ति व साफल्यजन्य संन्यासत्यागांत होतो. चमत्कार हा कीं जगांत संसाराला कंटाळून संन्यासी झालेल्यांचीं शेंकडों उदाहरणें प्रत्यहीं दिसतात, पण येथें पाहावें तर उलट सुखाचा संसार थाटावयास लावणारा अर्जुनाचा संन्यास ! हें एक अभूतपूर्व वैचित्र्याचें एकमेव उदाहरण कां न म्हणावें ?

हा शेवटला समारोपकात्मक अंक असल्यामुळें इतस्तत: पूर्वं अंकांत पसरून ठेवलेले दुवे घाईघाईनें एकत्रित केल्याची धांदल जी इतर नाटकांतून कोठें कोठें दिसून येते त्याचा मागमूसही या अंकांत नाहीं असें दर्शविण्याला आनंद वाटतो ! नाटकांतील गूढ आणि उकल अशा घटना प्रेक्षकांना आपल्या अंतरंगांत घेऊन घडविण्याची कलावंत नाटककाराची शैली जी किर्लोस्करांनीं सौभद्रांत केंद्रित केली आहे तीच नाटकाच्या सद्यशास सर्वस्वीं कारण आहे. चमत्कृतिपूर्ण; पण सुसंबद्ध ! स्वभावचित्रांतील मार्मिक विरोध; पण त्यांतही प्रमाणबद्ध विनोदाचा परिपोष ! श्रीकृष्णाचें भविष्यसूचक, पण द्व्यर्थी भाषण ! प्रेमविवाह, पण मर्यादशील ! रसात्मक अनेक प्रसंग, पण एकप्रवेशात्मक पहिला, चवथा व जवळजवळ तसाच हा शेवटला इत्यादि मधुर पण विविध घटनायुक्त चिरंतन सद्गुणमंडित असें हें नाटक केव्हांही असेंच राहील.

प्रभुदरबार. शालीबंडा, हैद्रा. द.
श्रीगणेशचतुर्थी ५७. सप्टें. ३६. रविवार

श्रीसद्‌गुरु माणिकप्रभु प्रसन्न

किर्लोस्कर सप्ताहांत रसिकरंजनासाठीं निरतिशय सौहार्दसंपन्न प्रो. श्री. नी. बापूसाहेब चापेकर यांच्या स्फूर्तीनें सुचलेले भाव व्यक्त करणारी —

# कविता.

माला कुठली? नच हें फूलहि, ना पाकळी तरी आहे।
अभीष्टचिंतनपर परि परमाविनितपद्यपत्र पाठविं हें ॥१॥

किर्लोस्कर-सप्ताह-स्थित सद्यशसंधि लाभली नामी।
कसला तरी अभागी! येऊं शकलों प्रसंगिं परि ना मी ॥२॥

पत्रहि निमंत्रणाचें येउनि उशिरा जणूं असें वदतें।
" भाग्य असावें पदरीं, घेउनि बसलास काय हें वा तें " ॥३॥

सांवत्सरिकशतार्ध-स्मृतिगौरव होत पुण्य-पत्तनिं जो।
जावा केविं तिथें, जो खिळला निजसदनिं पुण्यपत्तनिं, तो ४

" समग्र-किर्लोस्कर " या नामें ग्रंथप्रकाशनारंभीं।
चालू असेल मोठा थाट तिथें आज त्या समारंभीं ॥५॥

सरस्वतीदेवीच्या उद्यानांतिल विशाल तरु, वेली।
कां कि फुलले अजिवरि? यत्नें त्यांनींहि काय कामि केली? ६

संगीत-गद्य-कितितरि वैपुल्यें नाटकें जरी झालीं।
परि कां किर्लोस्कर-सर आजिवरि त्यांच्या कृतीस ना आली?७

उत्तर हेंच सुचे मज " ती श्रीप्रभुचीच देणगी सत्य।
आम्हीही तद्गौरव हार्दिक करणेंच योग्य, सत्कृत्य! ॥८॥

"लक्ष्मी बळेंच सदनीं आणावी" जरि असेल शिकवण ही।
हेंही बुध जाणति कीं "लक्ष्मी चंचल सदा" म्हणे कुणिही ९

यशोविलास.

ज्याचें भाग्य तयाला! यत्नाचा भाग्य हा विषय नाहीं।
जवरीचें जितुकें जें असतें सन्निध सदा न तें राही ॥१०॥
किर्लोस्कर-सत्कृति जी सत्कीर्तीनें स्वयेंच वाढतसे।
कवनानें गुणगायन कवि केल्या, केधिं होय वाढ तसें? ११
महाराष्ट्र-शेक्स्पीयर "अण्णासाहेब" एकमेव जरी।
एकनिष्ठ भक्तावरि भाषा-देवी दया न काय करी! ॥१२॥
साहित्यिक-सत्कृतिचा पारायणलाभ थोडका नाहीं!।
सद्गुणसौरभ शांतवि, गाण्यानें गोड-लाभ कानांही ॥१३॥
श्री. नी. चापेकरसत्स्नेहऋणोत्तीर्ण कवि तरी व्हाया।
विनम्रभावें चरणीं प्रेषितसे यश चतुर्दशार्या ह्या ॥१४॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्रा. द.
का. शु. ६/५७. २-११-३६ शनिवार.

# ( २ ) " साहित्य "

" साहित्य " हा शब्द उच्चारल्याबरोबर आर्य-सारस्वताची जी संस्कृत किंवा गीर्वाण भाषा – तिचीच परंपरा अशी " आर्य-भाषा " किंवा संस्कृत, प्राकृत अथवा देशभाषा असली तरी, संस्कृत अध्ययनशील माणसाच्या दृष्टीसमोर अलंकार व काव्यशास्त्रासंबंधीं केलेल्या चर्चेचे " वृत्तरत्नाकर, छंदोमंजरी, साहित्यदर्पण " इत्यादि ग्रंथ येतात. अथवा सुभाषितें, काव्यें किंवा महाकाव्यें वगैरे ग्रंथ फिरत राहातात. तें एका दृष्टीनें योग्यही आहे ! त्याचें कारणही तितकेंच योग्य म्हणजे संस्कृत भाषेचें व्याकरण अगदीं पूर्ण आणि इतकें चोख आहे कीं, त्यांत यत्किंचितसुद्धां बदल प्रदीर्घ कालापासून अद्ययावत् होऊं शकला नाहीं. अतएव संस्कृत भाषाच चिरस्थायी म्हणण्यास सर्वथैव योग्य होय ! ! शिवाय, ती भाषा विद्याव्यासंगीय म्हणून निराळी राखून ठेविल्यामुळें [ किंवा असेंही म्हणतां येईल कीं, भाषेला अनधिकाऱ्यापासून संरक्षित राखण्याची योग्य काळजी घेतल्यामुळें –.आणि अशी काळजी घेतां यावी म्हणून लोकव्यवहारास्तव एक निराळी ( बोलण्याची ) भाषा तोडून दिल्यामुळें ] आणि विवक्षित शास्त्रीय पद्धतीनें शिक्षण मिळविलेल्याच विद्वानांनीं, शिक्षकांनीं व सर्वच लेखकांनींही एकमतानें, ठरीव पद्धतीनेंच चालू ठेविल्यामुळें त्या भाषेचें पावित्र्य आणि श्रेष्ठत्व यत्किंचितही डळमळूं शकलें नाहीं ! ! !

लोकव्यवहारार्थ ज्या प्राकृत भाषेचा किंवा प्रांतिक उपभाषेचा उपयोग तत्कालीन जनता करीत होती त्या सर्वांत किती फरक होत गेला आणि त्याचे नानाविध पोटभेद किती उत्पन्न झाले हें स्पष्टच असल्यामुळें विस्ताराच्या ( विस्तीर्ण ) अरण्यांत शिरण्याचें कारणच नाहीं ! कालांतरानें भाषेंत फरक पडत राहिलाच पाहिजे असा सर्व-साधारण दंडकही आहे. शिवाय, स्थलांतरानेंही " बारा कोसावर भाषेंत फरक होतो " अशी एक मराठी म्हणही पण प्रचारांत आहेच ! अशाच प्रकारें "आपली मराठी भाषाही फार प्राचीन काळच्या एका आर्यभाषेचें कालांतरानें फेरफार होत जाऊन बनलेलें नवीन स्वरूप होय" हें व इतर विद्वद्वर्यांचीं असलीं मतेंच प्रस्तुत प्रसंगीं अधिक लक्षणीय व श्रेय-स्कर आहेत. अलीकडे तर 'साहित्य शब्दाची व्याख्या फारच व्यापक व विस्तृत होत चालली आहे' असें म्हणणारे " भाषाभिवृद्ध्यर्थ झालेल्या व चालू असलेल्या खटपटींत बारभाईमात्र फार माजली आहे " असाही सूर काढीत असतात. यांतील याथार्थ्य तर त्याहून अधिक लक्षणीय आणि चिंतनीय आहे ! असो. तद्वत् "काव्य" म्हणजे "पद्यप्रबंध" असा ध्वनि संस्कृत वाङ्मयांतून निघतो असें कांहींचें म्हणणें आहे. वस्तुतः काव्य शब्दाची उपपत्ति पाहूं गेल्यास ती "कवि" शब्दापासून झालेली व "कवि" हा शब्द विद्वान्, मंत्रद्रष्टा या अर्थीं वापरला गेला आहे, पण मंत्र तर या यांत्रिक - कालांत आम्हाला फारच दुरावले आहेत ! किंबहुना मंत्राशीं आपण पारखे होऊन फार काल लोटला ! ! मंत्र आहेत, पण त्यांतील चैतन्य घालवून अक्षरात्मक स्वरूपचित्रमात्र आम्हीं आपल्या धर्ममंदिरांत ( ? ) टांगून ठेविलें आहे ! हेंही असो. वेद छंदोमय आहेत आणि ब्राह्मणकाल त्यानंतरचा ! तेव्हां गद्यापेक्षां पद्य - वाङ्मय आधीं आणि अधिक निर्माण झालें असें म्हणावें लागेल. शास्त्रीय ग्रंथ - अधिक तर काय, वैद्यकी ग्रंथही पद्यात्मकच आहेत ! ! शिवाय, जुनें मराठी

वाङ्मयही बहुतेक कवितावद्धच असल्याचा पुरावा पुष्कळ ठिकाणीं सांपडतो. तरीपण पद्यमय बोलण्याचा प्रघात असलेला आजपर्यंतच्या इतिहासांतून वाचनांत नाहीं आणि कोणी कोठें ऐकिलाही नाहीं.

"काव्य" हा शब्द वाङ्मय शब्दाशीं समानार्थक आहे. गद्यपद्यमय प्रबंध म्हणजे काव्य होय. काव्याच्या एका भागांत पद्य व दुसऱ्या भागांत गद्य असा समावेश होऊं शकतो. पद्यभागांतील काव्याचे दोन मोठे भेद "श्राव्य" व "दृश्य" आणि अलंकाराचे "स्थायी" व "संचारीभाव" त्याच प्रमाणें गद्यांत असलेली एक प्रकारची ऋजुता, गद्यासंबंधीं कांहीं नियम होण्यासारखे आहेत काय? इत्यादि विचार अधिकारी मंडळींनीं करावयाचे आहेत व तशा प्रकारच्या ग्रंथांची आज फार आवश्यकता आहे. कांहीं वाङ्मय, सारस्वत, साहित्य यांत भेद दाखविणारे आहेत, तर तिन्ही समानार्थक घ्यावेत असें म्हणणारेही कांहीं आहेत. इंग्रजींत ( Literature ) लिटरेचर हा शब्द वाङ्मय, सारस्वत, साहित्य यांचा समानार्थक आहे. "साहित्य कसें असावें?" याबद्दल पुष्कळ विद्वद्वर्यांनीं आपापलीं मतें देऊन ठेविलीं आहेत. प्रसिद्ध ग्रंथकर्ता हडसन्, मोर्ले यांनीं साहित्याची जी व्याख्या दिली आहे तीवरून, शिवाय "हितेन सह सहितं तस्य भावः साहित्यं" "सत्यं शिवं सुंदरं" "सहितस्य भावः साहित्यं" या सर्वांवरून सत्य, हृदयाला पटणारें, मार्मिक, बुद्धीला चैतन्य देऊन त्याचा विकास करणारें, कालाच्या मावळत्या ओघाबरोबर वाहून न जाणारें, अनेकांच्या विचारानें संस्कारित झालेलें गद्यपद्यमय प्रबंध म्हणजे "साहित्य" होय. हीच व्याख्या काव्यास लाविल्यास चिंता नाहीं. —"कविता कशी असावी"— हा विषय बराच गहन व बऱ्याच वादविवादानें ठरणारा आहे. तेव्हां त्याच्या स्वरूपाबद्दल विशेष कांहीं न सांगतां तें काम योग्य अधिकाऱ्याकडे सध्यां सोपवून कवितेच्या अंगापैकीं "वृत्त" आणि "दुसऱ्या

भाषेंतील शब्दांची भेसळ करण्याची प्रवृत्ति" याबद्दल स्वल्प चर्चा करण्याचा हिय्या केला आहे.

नादमाधुर्य-सातत्य, मनास चटका लागून नेहमीं तोंडांत राहील अशी धाटी कवितेला येण्यास "वृत्त" हें मुख्यतः कारणीभूत आहे. उलटपक्षीं वृत्ताला शृंखला समजून ती अजिबात तोडून टाकावी व निरंकुश काव्य गावें असें म्हणणारेही कांहीं कमी नाहींत! रागतः प्राप्त अशा गोष्टीबद्दल आग्रह असूं नये. यावरून पाहातां वृत्ताच्या बंधनानें परिवृत्त झाल्यामुळें काव्योत्पत्ति होण्यांत किंचित् अडथळा येईल व त्यांतील सौकर्य नाहींसें होईल असें धरून चालूं तर वृत्त नसल्यामुळें मोकाट सुटलेल्या कवितारूप गद्यगाण्याला (?) अशक्य असा विषय-प्रदेशच राहणार नाहीं! हेंही विसरून चालावयाचें नाहीं. वाङ्मयनगर सुशोभित दिसावें अशी अपेक्षा केली तर त्यांतील रस्ते ऐसपैस असावेत याबद्दल कोणालाच विरोध नाहीं; पण ते रस्तेही चांगले साफसूफ केलेले व आवश्यक अंतरावर फुटलेले पाहिजेत. श्रीदेवी-सरस्वतीला वैभवसंपन्नता कमी आहे! नसतां सिमेंट-रोड सारखे राखीव रस्ते "वृत्त" तिच्या दर्शनलोलुप भक्तांस चालींच्या तीव्रगतिक यानांतून चटकन् दर्शन घडवून देण्यास निर्माण झाले असते!! मग झोपाळ्यावरचीं गीतें गाऊन लोकरंजन करणें कांहीं कठिण कार्य नव्हें असें कोणालाही पण वाटलें असतें. ("हा एक वृत्तांचा पूर्ण अभिमानी" असेंही म्हणवून घेण्याचा माझा आशय नाहीं आणि म्हणूनच प्रचलित चालींतूनही मुद्दाम कांहीं कविता-पण ज्यांना मी "गजल", "गाणीं" न म्हणतां "पदें" म्हणतों – लिहिल्या आहेत. ही कबूली या स्थलीं अप्रस्तुत होणार नाहीं) भावगीतें उत्कृष्ट असतात व कांहीं, तशीं आहेतही! पण आजकाल लोकप्रिय कवि होण्याचा जो ठराविक साचा आहे त्याचें मोज-माप जर कोणाच्या काव्यास बसलें नाहीं तर त्या कवीचें काव्य फारसें लक्ष्यपूर्वक

वाचनांत येऊं नये अशी प्रथा पडते कीं काय किंवा यावरून नैतिक, उद्बोधक काव्याचें उच्चाटणही कदाचित् होणार आहे कीं काय अशीसुद्धां शंका डोकावल्यावांचून राहात नाहीं. वस्तुतः पद्य असो वा गद्य असो "शीलवृत्तफलं श्रुतम्" [विद्येचें फल म्हणजे उत्तम शील आणि सदाचार] "सैव सालोक्यसारूप्यमुक्तिरित्यभिधीयते । सदाचाररतो भूत्वा द्विजो नित्यमनन्यधीः ॥२२॥ (मुक्तिकोपनिषत्). कारण, "शीलं प्रधानं पुरुषे तद्यस्येह प्रणश्यति । न तस्य जीवितेनार्थो न धनेन न बन्धुभिः" (महाभारत ५।४४।४८). [मनुष्याच्या ठिकाणीं शील हेंच मुख्य आहे. तेंच ज्याचें नष्ट झालें त्याला या जगांत जीविताचा, धनाचा अथवा बांधवांचा कांहीं एक उपयोग नाहीं.] असा उपनिषदादि अनेक वचनावरून नीति व सदाचारसंवर्धनकार्यंच साहित्यांतील श्रेष्ठ व लेखकाचें प्रमुख लक्षण ठरतें. असो.

वृत्त, छंद, प्रासानुप्रास, यमक, यति इत्यादि काव्यालंकार कवितेच्या मालकीचे आहेत. ते दागिने स्फूर्तिरूपानें उज्ज्वल झाल्यावर तें सर्व किंवा त्यापैकीं कांहीं अंगावर घालणें किंवा न घालणें हा सर्वस्वीं कवितादेवीच्या मर्जीचा प्रश्न आहे! कवीनें ते जबरीनें काढावयास लावणें हें केव्हांही योग्य होणार नाहीं. कांहीं दागिने मांगल्यसूचक आणि अत्यावश्यक असे असतात — त्यांतल्यात्यांत खास (मंगल) नामक एक अत्यंत महत्त्वाचा दागिना असतो - ज्यास काढावयास लावणें म्हणजे तसा शब्दोच्चारसुद्धां अंगावर शहारे आणणारा वाटतो! तो प्रमुख अलंकार म्हणजे वृत्तसूत्रांत ओवलेला प्रास होय. कवितेचेसुद्धां तात्पुरता आणि निश्चित अशा प्रकारचे दोन निधि आहेत. तात्पुरतीं गीतें आजच्या व्यवहारास कदाचित् उपयोगी वाटतील; पण वाङ्मयाचा निश्चित निधि म्हणून जी काव्योत्पत्ति होते ती वेगळ्या तऱ्हेची पाहिजे. कवि व्यावहारिक व्यासंगाला विसरून निसर्गाशीं तादात्म्य पावल्यावर काव्यस्फूर्तीसरशीं जी उत्प्रेक्षा करील ती खरी स्फोरकता असें मला वाटतें.

सापेक्षतेनें लोकप्रिय उत्प्रेक्षा ( उत्पन्न ) करून त्यावर काव्यगान करणें वेगळें. एकंदरींत, " कविरेव विजानाति कव्ये काव्यपरिश्रमम् " हें सुचवून स्थल-काल-संकोचत्वें दुसऱ्या मुद्याकडे वळतों.

" परक्या भाषेंतून शब्द घेण्याची प्रवृत्ति " ही याचकतेच्या दृष्टीनें आक्षेपार्ह आहे. जिंकलेला प्रदेश आपल्या देशाला जोडण्यांत जेत्याला जसा आनंद वाटतो तसा कांहींसा ( ओढून ताणून आणिलेला ) भाग यांतही आहे, पण त्यांत भेसळ किंवा अपभ्रंश होतां कामा नये. " शाहीर, महशूर, बेदरकार, गहजब, ग्वाही " असले कितीतरी शब्द माझ्या या म्हणण्याची साक्ष देतील. होताहोतां अशी भेसळ इतकी अंगवळणी पडली व ही संवय इतकी बळावली कीं, विद्वान्, मंत्रद्रष्टा कवि ! पण प्रागपावित्र्या ऐवजीं शाहीर म्हणवून घेणें भूषणावह समजूं लागला. ज्या स्थितींत जो परका शब्द आपण आत्मसात् केला किंवा करतों त्याच स्थितींत तो राहूं दिला पाहिजे. असें करण्यांत एक प्रकारचें स्वारस्य आहे; पण त्या शब्दाशीं स्नेह करून किंवा स्नेहाच्या अतिरेकाबरोबर त्याला व स्वतःलाही बाटवून घेणें केव्हांही योग्य नव्हें. काव्य उदार आहे, त्यांत सर्वकांहीं येतें म्हणून सर्वकांहीं ढकलणें योग्य नाहीं ! ! स्वभाषेचें नगरभाषेशीं अव्याहत संघटण असल्यामुळें कांहीं शब्दांची भेसळ केव्हां केव्हां अपरिहार्य होऊन बसते ( कदाचित् तसा भेसळपणा हैद्राबादवासीयांनीं केला असता, तर या सदरेखालीं ती चूक, पण क्षम्य समजली गेली असती ) हेंही यद्यपि खरें आहे; पण कांहीं जबरीनें अमत्रंण लावून शिरलेल्या शब्दांस, त्याचें एकादें अक्षर उलटसुलट करून किंवा वर्णोच्चारांत मुद्दाम फेरबदल करून आपल्या शब्दाच्या वळणांत आणूं पाहणें म्हणजे कित्त्यावर पातळ कागद ठेवून ( ज्याला ट्रेसिंग म्हणतात ) तशा तऱ्हेनें काढलेल्या पुस्तीस अधिक मार्क मिळविण्याचा हावरेपणा धरून फसलेल्या विद्यार्थ्यांप्रमाणें होऊन बसतें !

स्वभाषेची संपन्नता दुसऱ्या भाषेंतील शब्द घेऊन होणार नाहीं. ईशकृपें हें दारिद्र्य आपल्या वांट्याला आलेलें नाहीं ! विकृत, अपभ्रंशित तर असो तद्भव शब्दाऐवजीं तत्सम शब्दच अधिक श्रेयस्कर ! ! उत्तम रत्न कोठेंही सांपडलें तरी घ्यावें हें खरें; पण त्या रत्नापेक्षां अधिक मूल्यवान् किंवा तसलेंच रत्न आपल्या ( कोशांत ) जामदारखान्यांत आहे कीं नाहीं हें काळजीपूर्वक आधीं तपासलें पाहिजे. द्रव्याच्या अभावीं जामदारखान्याची आवश्यकता कोठून भासणार ! म्हणून कोश हा आपला शब्द, पण तो जवळ जवळ त्या अर्थानें पारखा होत चालला आहे. द्रव्यच नाहीं तर कोश कोठला ! फार फार झालें तर " कोश " म्हणतांच डिक्शनरी डोळ्यासमोर उभी राहाते ! ! उगीच कांहींतरी गोळा करीत सुटलों तर मग मात्र भाषेचा जामदारखाना अल्पावधींतच एक अजब अजबखाना होऊन बसेल ! ! ! तेव्हां भाषाभिवृद्ध्यर्थ भरणारीं संमेलनें, भाषाप्रचारार्थ निघणारीं नियतकालिकें व विद्वान् लेखक इकडे लक्ष्य देतील काय ? हा प्रश्न स्वभाषाभिमानाचा आहे. यांतील अभिनिवेशही सात्त्विक आहे ! शांतपणें विचार व्हावा. तरच ध्यानांत येईल कीं, कोणताही शब्द जसाचा तसा शुद्ध वर्णोच्चारासह वापरण्यांत दुप्पट फायदा आहे. एकतर शब्द घेतांना शास्त्रीय, दृष्टि जाग्रत राहिल्यानें त्याचा मूळ शब्द कोणता ? इकडे लक्ष्य जातेंच ! आणि यायोगें तितकें अधिक ज्ञान पदरीं पडतें. शिवाय, त्या त्या भाषाभिज्ञांशीं बोलण्याचा संबंध आल्यावेळीं हसें होण्याचेंही थांबेल. उलटपक्षीं जाणून बुजून विकृत, अपभ्रंशित अतएव अशुद्ध शब्दात्मक खोटें नाणें वापरण्याच्या दोषापासून दूर राहणें तर दूरच ! " इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः" ही शोचनीय स्थिति मात्र अधिकाधिक दुर्निवार्य होत जाणार. शुद्ध वर्णोच्चारार्थ जी अडचण इतर भाषेंत पडते तशी अडवणूक आमच्या भाषेंत जवळ जवळ नाहींच म्हटल्यासही हरकत नाही. कारण,

तीनचतुर्थांश स्वरसाहचर्य मिळण्याची सोय आर्धीपासूनच मराठी वर्ण-मालेंत आहेच आहे. फार झाल्यास क़, फ़, ज़, ञ़ इत्यादि वर्णोच्चारार्थ ज्याप्रमाणें हिंदींतून अक्षराखालीं अनुस्वार देऊन काम भागविलें जातें तशा विवक्षित कांहीं खुणा ठरविल्यास कसलीही अडचण पडणार नाहीं. इकडे साहित्यभक्त हार्दिक लक्ष्य पुरवितील काय ?



प्रभुदरबार, शाली. हैद्रा. द.<br>
वै. व. ५।५३ मे १९३१ गुरुवार

## (३) "वाङ्मयविविधविचार"

कोणत्याही भरभराटीस आलेल्या राष्ट्राचा इतिहास सूक्ष्मदृष्टीनें अवलोकन केल्यास असें दिसून येईल कीं, राष्ट्राची उन्नति सर्व भागांचें ऐक्य झाल्याशिवाय झालेली नाहीं. ऐक्यांतच सामर्थ्य व शक्ति असते - आणि ऐक्यानेंच देश संपन्न होतो. हें ऐक्य आचारांत, विचारांत, कृतींत तसेंच लेखांतही एकवटलें पाहिजे. अशा तऱ्हेचें ऐक्य एकवटण्याकरितां ज्या महत्त्वाच्या गोष्टी आहेत त्यापैकीं वाङ्मय हा जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. कारण, जगांत वाङ्मयासारखी ऐक्यता सांधणारी गुरुकिल्ली दुसरी नाहीं. शक्ति, बल, विविधता, वृत्तिधर्म आणि प्रकृति या सर्वांचा संगतिसंगम करण्यास वाङ्मयाची फार जरूरी आहे. किंबहुना याशिवाय ती साध्यही नाहीं. भिन्न विचाराचा समारोप एका कार्यांत करण्यास वाङ्मय फार उपयोगीं पडतें, कारण साधारणतः मनुष्य विचारप्रधान असतो, व स्वतःचा विचार इतरांपेक्षां जास्त ध्येयान्वेषी आहे अशी प्रत्येकाची कल्पना असते. दुसऱ्याकडून त्या विचारासंबंधीं जीं साधक बाधक प्रमाणें येतात त्यांचा यथायोग्य निर्णय देण्यास आपल्या विचारानें विकृत झालेलें मन सहसा तयार नसतें किंवा बहुतांशीं त्याचा कल साधक - साधनाकडेच वळत असतो. अशा वेळीं बाधक - प्रमाणांची चर्चा करणारा मनुष्य जितका विचारी असेल व त्या जवळचीं प्रतिकूल कारणें ज्या प्रमाणांत समर्पक असतील त्यावर दुसऱ्या विचाराचें

आकर्षण अवलंबून असतें. या आकर्षणशक्तीलाच 'स हा नु भू ति' म्हणतात. मात्र यावेळीं जी वाङ्मय-योजना असते ती हितपरिणामी असली पाहिजे; पण दुर्दैवानें अशी परिस्थिति दिसत नाहीं असें दुःखानें म्हणावें लागतें. जो तो आपल्या विचारांचा अभिमान बाळगून तो हृदयाशीं इतका चिकटून ठेवतो कीं, बाधक प्रमाणांची सत्यता पटत असतांही आपल्या थोरपणास किंवा नेतृत्वास कमीपणा आणील या क्षुल्लक भीतीनें, त्या आकर्षक सहानुभूतीचा त्याग प्रत्येक विद्वान् शक्य त्या जोमानें करतो; इतकेंच नव्हे, तर बाधक विचार जितक्या मुद्यावर दृढीभूत झाला असेल तितक्या तीव्रतेनें तो खोडून काढण्याचा प्रयत्न अविचारभरांत होतो. अशा अविचारसंभ्रमाचें फल ध्येयानुसंधानराहित्यांत परिणत होतें, व ध्येय बाजूलाच राहून नुसता विचाराचा झगडा चालविण्यांत बुद्धि, युक्ति व शक्ति यांचा दुरुपयोग होतो. आणि या स्वस्वयूथकलहांत दोघेही ऐन रंगांत येऊन देशाच्या अकल्याणाचें अपयशच आपापल्यापरीं वांटून घेतात.

राष्ट्रांत एकी नांदण्याचें जें रहस्य आहे, तें माझ्या मतें वाङ्मय-एकीकरण होय. वाङ्मयएकीकरणाचा अर्थ – 'एकच भाषा साऱ्या हिंदुस्थानांत चालू असावी व दुसऱ्या भाषेचा बीमोड व्हावा'– असा नाहीं. राष्ट्राच्या दृष्टीनें राष्ट्रीयभाषा म्हणून एकच भाषा वापरणें ठीक असेल; पण तो विचार आतां कर्तव्य नाहीं. वाङ्मयएकीकरणाचा प्रश्न जवळजवळ जातीभेदासारखा आहे. जातीभेदांत ज्याप्रमाणें मूळ जात न काढतां, त्याचा अनुचित भाग, किंवा ज्यायोगें जातीजातींत मत्सर उत्पन्न होतो तसलेच तेवढे आचार विचार काढून टाकावेत असा विद्वानांचा अभिप्राय आहे. त्याचप्रमाणें भाषेंत सुद्धां परस्परांकरितां आंखलेली किंवा अंगीकृत करावी लागणारी अनुदार बुद्धि काढून टाकली पाहिजे. ती निघून गेली म्हणजे मग एकी होण्यांत फारसा अडथळा येणार नाहीं !

उपरिनिर्दिष्ट गोष्ट मागील कालांत जरा कठिण वाटली असती, पण आजच्या चालू जगांत मुबलग मुद्रणसंपत्ति आणि तत्काल संदेश पोंचविणारीं साधनें उपलब्ध आहेत. तेव्हां असें कार्य अधिकांत अधिक व्हावयास पाहिजे !

लोकजागृतीचें उत्तम व सुलभ साधन म्हणजे मुद्रणालय होय. तद्वत् पार्लमेंट, पोलिस व प्रेस ही राष्ट्रबळकटीची त्रिपुटी होय ! यापैकीं एकादें साधन हाताशीं आलें तरी राष्ट्राची सर्वांगीण सुधारणा करता येणें शक्य आहे; पण त्यांतील पहिलें साधनच आज आमच्या हातीं आहे आणि हेंच साधन पुढील साधनें मिळविण्याचा राजमार्ग आहे. लोक–जागृति झाली म्हणजे राष्ट्र सुधारणेच्या मार्गास लागतें; पण आज आम्ही या साधनाचा उपयोग योग्य तऱ्हेनें करीत आहों का ? हाच प्रश्न आहे व आमच्या हातीं हें साधन आल्यापासून आजपर्यंत ज्या मर्यादेंत लोकजागृति व्हावयास पाहिजे त्या प्रमाणांत ती झाली नाहीं हेंच त्याचा दुरुपयोग केल्याचें प्रत्यंतर होय ! अस्तु. कांहीं कालाच्या मर्यादेनें ही बाब आमच्या पूर्ण ताब्यांत असती, तर कराराची मुद्दत संपली व इच्छित कार्य झालें नाहीं म्हणून हताश व्हावें लागलें असतें; पण ईशकृपें तशी परिस्थिति नाहीं. आतां या पुढेंही झटून व खऱ्या कळ-कळीनें कार्य करण्यास पुष्कळ वाव आहे. तेव्हां सर्वांनीं मनापासून आधीं वाङ्मयाकडे अधिक लक्ष्य पुरवावें अशी नम्र सूचना आहे.

माझ्या दृष्टीनें वाङ्मयएकीकरणास ज्या ज्या गोष्टीची जरूरी आहे त्याचा ऊहापोह केला आहे. कदाचित् हीं कारणें चुकीचीं असतील तरी त्याबद्दल जास्त हितकारक उपाय जे असतील ते अमलांत आण–ण्यास मुळींच हरकत नाहीं. त्या मार्गाचा विचार या लेखानें झाल्यासही माझे श्रम बहुतांशीं फलदायी झाले असें मी समजतों. हे विचार मांडण्या-पूर्वीं आजकाल उदित होत असलेल्या वाङ्मयाच्या इतिहासाचें पर्या-लोचन केलें पाहिजे.

## यशोविलास.

हिंदुस्थान हें जातिभेदाप्रमाणें अनेक भाषांचें माहेरघर आहे. सर्व भाषा मूळ संस्कृतापासून निघालेल्या आहेत. अर्थात् एकाच आईचीं हीं लेकरें होत. प्रत्येक भाषेंत लेखक, विद्वान् व्यासंगी अशीं माणसें झालेलीं असून त्यांनीं आपापल्यापरीं भाषाभिवृद्धीचें कार्य केलेलें आहे. एकादी भाषा एकाद्या भाषेपेक्षां कमी असणें, हा भाग त्या भाषेंत जन्मणाऱ्या विद्वान् लोकांच्या संख्येवर अवलंबून आहे. विपुला पृथ्वींत अजूनही भाषेला प्रौढत्व व संपन्नता देणारे विद्वान् निघूं शकतील तेव्हां कोणतीही भाषा कमी प्रतीची मानणें श्रेयस्कर नव्हें. स्वभाषेचा अभिमान म्हणजे दुसऱ्या भाषेची निंदा नव्हे! हें प्रत्येकानें लक्ष्यांत घेण्याजोगें आहे. इतकेंच नव्हें, तर दुसऱ्या भाषेंतील कोणताही सुंदर भाग आपल्या भाषेंत घेऊन त्याला स्वदेशीय स्वरूप देणें हें स्वाभिमानाचें द्योतक होय. मनुष्यास सधन होण्यास ज्याप्रमाणें अनेक उत्तम मार्गांनीं द्रव्यसंचय करावा लागतो त्याप्रमाणें भाषेची संपन्नताही अनेकविध मार्गांनीं करावी लागते. इतर भाषेंतून वाङ्मय घेणें हाच भाषावृद्धीचा उपाय हें माझें मत नव्हें. खरा उपाय म्हणजे स्वतंत्र ग्रंथसामुग्री तयार करणें हा होय; पण दुसऱ्या भाषेंतील काहीं घेणें वाईट आहे या मतांचाही मी नाहीं. बाग सुशोभित आणि परिपूर्ण असण्यास सर्व तऱ्हेचीं फुलझाडें लावावीं लागतात. निधि होण्यास द्रव्याचा विपुल समावेश व्हावा लागतो. त्याप्रमाणें भाषा सुसंपन्न होण्यासही अनेक मार्गांनीं त्यांत भर टाकली पाहिजे. विविध विषयप्रतिपादक "काव्य व नाटकें" असे अर्वाचीन ग्रंथांचे दोन विभाग दाखवितां येतील. त्यांत पहिल्या प्रकारच्या ग्रंथांत पाश्चात्यग्रंथांचीं भाषांतरें किंवा त्यांचीच 'री' ओढणारे ग्रंथ बहुतेक आहेत. त्यांत तर्क मीमांसादि मानसिकोन्नतिकारक ग्रंथ फारच कमी! असें म्हटल्यास वस्तुस्थितिविपर्यास मुळींच म्हणवणार नाहीं. ही शोचनीय उणीव कधीं भरून निघेल ती निघो!! एतावता

अभिजात महाराष्ट्र भाषेतील अर्वाचीन ग्रंथसंग्रह अत्यल्प आहे. तो योग्य प्रमाणांत शक्यतों लवकर—पण योग्यरीतीनें—मोठा व सशक्त होईल तो मोठा सुदिन ! !

उत्तम ग्रंथसामुग्री निर्माण करण्यानें भाषा जशी संपन्न होते, तद्विरुद्ध वाईट ग्रंथ निर्माण करण्यानें किंवा निर्माण झालेल्याकडे कानाडोळा करून त्यांचा समावेश होऊं दिल्यानें तितकीच हानी होते ! ही हानीमात्र फार घातुक होय हें सूक्ष्म निरीक्षणोत्तर केलेल्या खोल विचारांतीं पूर्णतया पटेल.

भाषांतर, नियतकालिकें, मासिक, पाक्षिक, दैनिक व साप्ताहिक हीं भाषावृद्धिचीं साधनें आहेत. यांतील पाक्षिक, दैनिक पत्रें चालू भाषेची सरणी चपळ करण्यास जास्त कारणीभूत होत. तात्कालिक विषय सोप्या भाषेंत व चटकन् वाचकांच्या मनांत ठसेल अशा धर्तीची भाषा तयार होत असल्याचें श्रेय यांकडेच आहे. त्यांतही भाषेच्या दृष्टीनें उत्तम भाग राहात नाहीं असें नाहीं, पण त्याचें ध्येय तें नव्हें. मासिकें, निबंध हीं मात्र भाषेच्या खऱ्या वृद्ध्यर्थच आहेत. मात्र यांतील लिखाण केव्हांही भाषेच्या दृष्टीनें भरपूर व भारदस्त पाहिजे.

वरील विचार मान्य धरून आजकाल दैनंदिन उदित होणाऱ्या वाङ्मयाकडे नि:पक्षपातपणें पाहिलें तर चांगल्या चांगल्या शीलसंपन्नलेखकांनींही वरील धोरण क्वाचितच पाळल्याचें दिसून येतें. यामुळें भाषेच्या अभिवृद्धीऐवजीं भाषेला वेगळें वळण लागूं लागलें आहे. मी अगोदर लिहिल्याप्रमाणें प्रत्येकाच्या विचारकक्षेंत संक्रमण करणारे कांहीं ग्रह आहेत व त्या ग्रहांची गति चालू वर्तमानपत्रांतून व मासिकांतून दृष्टोत्पत्तीस येते. आपल्या विचारविनिमयास समरस न होणाऱ्या



व्यक्तींना वाव न मिळाल्यानें प्रत्येक कंपू आपापल्या विचाराच्या परिपालनाकरितां वेगळें पत्र काढतो. प्रथमारंभीं आपल्यास पत्र काढण्याकरितां काय कारण झालें हें माहीत असूनही तशा तऱ्हेची हेटाळणी आपण दुसऱ्याकरितां न दाखविण्याची खबरदारी घ्यावयास पाहिजे; पण पुनः त्याच विचारकक्षेंत तो येतो आणि तद्विरुद्ध विचाराचें संगोपन करणाऱ्या दुसऱ्या कंपूस दुसरेंच पत्र काढावें लागतें. या विचारानें विकृत झाल्यावर मासिकाच्या किंवा पत्राच्या मूळ उद्देशाकडे कानाडोळा होऊन प्रतिस्पर्ध्यावर तोंडसुख घेण्यांत किंवा त्याच्या विचाराची पायमल्ली करण्यांत यांचे रकाने खर्ची पडतात. कावीळ झालेल्या मनुष्यास जसे सर्वच पिवळें दिसतें त्याप्रमाणें आपल्या विचाराचा विरोध करणाऱ्याबद्दल दोषान्वितदृष्टीची चाळशी लावून हे संपादक जेव्हां लेख संपादन करतात तेव्हां दुसऱ्याच्या विचारांतील खरेंखोटेंपणा न्याहाळण्याची त्यांची दृष्टि चाळशीमुळें नाहींशी होऊन आपला विरुद्ध पक्ष जें काय म्हणतो, त्याविरुद्ध आपलें मत, हेंच धोरण ठेवल्यानंतर त्यांत भाषा व वाङ्मय यांकडे दुर्लक्ष्य व्हावें यांत नवल नाहीं!

आणखी एक्या गोष्टीचा यांत उल्लेख करवासा वाटतो तो हा कीं, संपादकाच्या विचाराशीं जुळणारे जे लेखक असतील त्या सर्वांच्या लेखांचा समावेश त्यांच्या पत्रांत होईल असें मानलें तरी तें चुकीचें ठरतें. त्यांत पुन्हा शिफारसी व्यक्तिविषयक आवड-निवड, कार्य - कारणभाव पाहावयाचा असतो, अशामुळें कांहीं विवक्षित लोकांच्याच विचारांचें प्रसरण त्यांच्या अधिकृत मासिकांतून होतें असें म्हणावें लागतें. यामुळें मासिकांची संख्या दिवसेंदिवस वाढूं लागली असून मुद्रणसामुग्रीची ज्या ज्या मानानें वाढ होत जाईल त्या त्या मानानें आणखी त्यांत भरच पडणार! पण अशी भर खऱ्या संपन्नतेची निदर्शक नसून आजाऱ्याच्या अंगावर येणाऱ्या सुजेसारखी घातुक वाढ असते!! यावर

" प्रत्येकाचे विचार वेगळे त्या मानानें स्वतंत्र बाणा पाहिजेच. त्यायोगें मासिकांचें वाढतें प्रमाण भाषाभिवृद्धीस पोषकच आहे " असे येणारे आक्षेप कबूल आहेत; पण 'स्वतंत्र बाणा' या शब्दांत जो खरा अर्थ आहे त्याकडे दुर्लक्ष्य न झालें म्हणजे मग जितकीं मासिकें निघतील तीं केव्हांही अभिनंदनीयच होत. "स्वतंत्र बाणा" म्हणजे तऱ्हेवाईकपणा, दुसऱ्याची निंदा किंवा हडसून केलेली टीका अथवा खडसून काढलेली खरडपट्टी नव्हे! जगांत अनेक विषय आहेत त्या प्रत्येक विषयाला वाहून घेतलेलीं मोजकीं मासिकें निघतील तरी त्यांची संख्या भरमसाट निघणाऱ्या व क्षणांत लुप्तप्राय होणाऱ्या मासिकांपेक्षां अधिक भरेल व तशीं मासिकें निघावींत असें कोणाही सहृदयास वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

आजकालच्या मासिकांतून अशा तऱ्हेच्या विषयाची वाण आहे. एकाच्या विचाराचें ध्वन्यर्थानें दोषान्वेषण करणारें म्हणून दुसरें मासिक अशी आजच्या लिखाणाची बहुतांशीं तऱ्हा आहे. विरुद्ध लिखाणसुद्धां पुष्कळ वेळां उपकारी असते. किंबहुना टीका ही विषयाची खरेंपणा पारखणारी कसोटी आहे! हिऱ्याचे पैलू पाडण्यानें हिरा जसा जास्त तेजस्वी होतो त्याप्रमाणें साधक-बाधक-विचारानें लेखाचें अंतरंग शुद्ध व स्पष्ट होतें व त्यांत जिवंतपणा येतो ही दृष्टि अगोदर हिरा आहे असें धरून चालल्यानंतरची! आपला विरुद्ध पक्ष ज्याला हिरा म्हणतो त्याला गारगोटी म्हणण्याचें ब्रीद ज्यांनीं अंगिकारिलें आहे त्यांच्या दृष्टींत पैलू पाडण्याची गोष्ट येणारच कशी? यामुळें पैलू पाडून हिरा तेजस्वी करण्याऐवजीं तो "हिरा नव्हे, तर गारगोटी" म्हणून शुष्कवाद घालून त्याबद्दलचा लोकांत भ्रम उत्पन्न केला जातो आणि खरें खोटें निवडण्याचें विशेष ज्ञान सामान्य लोकांत नसल्यानें त्यांची दिशाभूल होते. अशा या दिशाभुलीमुळें त्यांच्या विचारांत आणि उच्चारांत सुसंघटितपणा केव्हांही येत नाहीं!

इतकी कटुतर विषमता उत्पन्न होण्याचें कारण काय असावें? हें पाहूं गेलें, तर असें अढळून येईल कीं, परोत्कर्षसहिष्णुता हा गुण परमेश्वरानें आमच्या या महाराष्ट्राच्या वाटेस तरी (फार) कमी दिला आहे. परक्यापैकीं एकाची उन्नति ही विभुत्वदृष्टीनें आपलीही किंचित् उन्नति हें मानण्याचें किंवा मुंगीच्या पायानें (जी खरी चिरस्थायी होय) उन्नति मोजण्याचें कार्य आमच्याकडून होत नाहीं! जर एकाद्याची उन्नति झाली असेल तर ती मान्य करून ज्या गुणांनीं अगर क्रियेनीं ती त्याला मिळाली तशी कार्यशक्ति आपल्या अंगीं बाणविण्याची खटपट करण्याचा विचारही कित्येकांना करवत नाहीं!! उलटपक्षीं "त्याचा उत्कर्ष अयोग्य आहे" असेंच (येन केन प्रकारेण) दर्शविण्याचा अट्टाहास करून त्याचा ऱ्हास हाच स्वतःच्या उन्नतीचा पाया असें समजण्याची प्रवृत्तिमात्र दुर्दैवानें वाढत आहे!!! बळजबरीनें दृश्यवस्त्वात्मक कार्य किंवा त्याचे कांहीं भाग हरण करतां येतील, केवल निंदेनें कोणाबद्दलही गैरसमज उत्पन्न करतां येईल; पण ज्या सद्गुणानें उन्नति प्राप्त होते त्याचा नाश कांहीं निंदेनें होऊं शकत नाहीं. बहुजनसमाजांत अज्ञांची संख्या जरा अधिक असल्यानें या गैरसमजूतीचा प्रभाव कांहीं काल त्यांच्यावर होईल; पण खऱ्या सद्गुणाचा विजय थोड्या उशिरानें कां होईना, पण टिकाऊ असा झाल्याशिवाय राहाणार नाहीं! सारांश, दुसऱ्याच्या विचाराचें पर्यालोचन सत्यान्वेषणदृष्टीनें वेळींच न केलें गेलें, तर तो विरोध वाढत जाऊन शेवटीं आज भासतो असा कटुविरोध प्रत्ययास येतो!!

आजकालच्या वाङ्मयाचें स्वरूप कसें आहे हें विहंगमदृष्ट्या आपण पाहिलें. आतां यापुढें वाङ्मयाभिवृद्धीस (माझ्या मतें) कोणते उपाय हितकर आहेत ते तेवढे लिहून हा विषय संपवितों.

१– विवक्षित विषयास वाहून घेतलेलीं मासिकें निघावींत, व त्या त्या मासिकांतून मूळ विषयाचें सांगोपांग विवेचन व्हावें.

(अ) एकाच ध्येयाचे अनेक मार्ग दाखविणारे पक्ष आहेत. जसें जहाल आणि मवाळ; पण दोघांनाही एकच ध्येय पाहिजे असतें. अशा वेळीं आपला मार्ग कसा ध्येयानुसंधानी आहे एवढेंच त्यांनीं दाखवावें. त्यांत स्वमतपोषणार्थ दुसऱ्या मार्गाची निंदा नसावी. कारण, उभयपक्षीय कारणें पुढें ठेवल्यावर कोणता पक्ष जास्त चांगला—हें वाचक ठरवील.

(ब) स्वतःच्या विचाराची स्तुति म्हणजे दुसऱ्याची निंदा असा एक गर्भितार्थ होतो; पण अशा तऱ्हेची निंदा भाषेला अनुपकारी नाहीं किंबहुना तिची जास्त जरूरी आहे.

२ – मासिकांत येणारे लेख नाविन्यपूर्ण असावेत, ठराविक व्यक्तींचे लेख किंवा केवल संपादकाच्या दृष्टीनें योग्य ठरलेले – पण वाचकांस कसेंतरी वाटणारे लेख संपादन केले जाऊं नयेत.

३ – लेखनस्फूर्ति ही कित्येकांस असते व ते जिज्ञासेनें एकादे-वेळीं मासिकांतून प्रसिद्ध होणाऱ्या विक्षिप्त विचारात्मक लेखापेक्षां नीतिमर्यादान्वित चांगले लेख लिहून संपादकाकडे पाठवितात; पण त्यांच्यामागें बोटभर चिठ्ठी नसल्यानें किंवा बहुतेक भरमसाटपणें वाचून (कदाचित् हेंही भाग्य कांहींना लाभत नसेल!) टाकल्यामुळें लेखांना केराची टोपली पाहावी लागते! यामुळें अनेक जिज्ञासूंचा उत्साहभंग होतो आणि एकापरीनें भाषेचें व त्याबरोबर समाजनीतीचेंही नुकसान होतें. असें न होऊं देण्याकडे प्रत्येक संपादकानें पूर्ण लक्ष्य पुरवावें.

४ – हातीं असलेल्या मुद्रणसामुग्रीबरोबर जराशी सदिच्छा असली म्हणजे गोड शब्दानें व थोड्या प्रयत्नानें उत्कृष्ट लेखाबरोबर सहजगत्या लोकप्रियता संपादन करतां येते, ही अशी लोकप्रियताच लोकमान्यपदाला पोंचवूं शकते. इतकें सुलभ साधन संपादकांनीं निष्काळजीपणानें दवडूं नये.

(अ) कोणताही विचार उत्पन्न झाल्यावर त्याची साधक बाधक चर्चा होतच राहते व ती तशी झालीच पाहिजे ! पण त्या चर्चेंतसुद्धां दुसऱ्याचा मर्मच्छेद न करतां भाषेला प्रौढत्व देतां येईल अशी टीका उपकारी होय. व अशा टीकेमुळें मूळ विषयाचा खुलावच जास्त होतो; पण आज अशी परिस्थिति दिसत नाहीं, किंबहुना मराठींत दुसऱ्याचें मर्मच्छेद करणारे व कुत्सित वाङ्मय आज जेवढें वाढलें आहे तेवढें दुसऱ्या भाषेंत नसेल असें म्हटलें तर अतिशयोक्तिदोष येणार नाहीं असेंच वाटतें.

५ – याशिवाय पुष्कळ मार्ग सुचवितां येतील; पण हे विशेष महत्त्वाचे आहेत. एकंदरींत लोकजागृति करण्यांत स्वार्थपरायणता, (परोत्कर्ष) असहिष्णुता इत्यादि दुर्गुणांचा आज होत आहे असा परिपोष होऊं न देतां विविधज्ञान आमच्या जिल्हाळ्याच्या गरजा समजून आणि ज्यायोगें लोक तदनुवर्ती होतील असें ध्येय प्रत्येकानें ठेवून भाषेची वाढ केल्यास ती थोड्याच कालांत लोकजागृति करून पूर्णत्वास प्राप्त होईल.

६ – संपादक आपला साह्यकवर्ग निःपक्षपातपणें मिळवून त्यांच्याकडून आलेले लेख परीक्षणोत्तर प्रसिद्ध करतील तर तें कार्य किती तरी जिज्ञासूंना ऋणी करून ठेवण्यास व नवीन वाङ्मयभक्त उत्पन्न करण्यास कारणीभूत होईल ! यामुळें लोकप्रियता तर वाढेलच ! ! पण त्याबरोबर जनसमूहांत वर्चस्व कायम राहून भाषेची खरी सेवा करण्याचें श्रेय त्यांना संपादन करतां येईल ! ! !

शेवटीं एकच गोष्ट प्रामुख्यानें सांगावयाची आहे कीं, भाषाभिवृद्धि कराणाऱ्यांनीं इतर भाषेंतील वाङ्मयसेवकांकडे लक्ष्य द्यावें व आपली वाङ्मयवृद्धि कशी व्हावी याबद्दल निरंतर काळजी ठेवावी.

वाङ्मयसेवक उत्तरोत्तर जास्त कसे उत्पन्न होतील हें धोरण ध्येयाशीं चिटकून ठेवून एकादा नवीन मणि वाङ्मयरत्नभांडारांत थोडासा चमकूं लागला कीं, त्यास आपलेसें करून त्याचें तेज वरचेवर कसें वाढवतां येईल इकडे लक्ष्य द्यावें. म्हणजे हाताच्या बोटावरच मोजण्याइतकी वाङ्मयसेवकांची यादी वाढत जाऊन आपली महाराष्ट्रवाङ्मय-सरिता सागराचें रूप धारण करील. भाषाभिवृद्धीच्या यत्नसौकर्यार्थ आजकाल पावलोपावलीं आधिक्यानें वाढत जाणारा हिंदी आणि आंध्रभाषाभक्तांचा स्वाभिमान मला वाटतें आपल्यांतील वाङ्मयसेव-कांस ध्येय गांठण्याचा लवकरचा व सोपा मार्ग दाखविण्यास साहायक बनेल ! त्यांच्या धडाडीचा कित्ता समोर ठेवून त्याच्या घटकोघटकीं वृद्धिंगत होत चाललेल्या यशोविकासाकडे लक्ष्य पुरविल्यास मूळचीच तेजस्वी पण तिला उजळा मिळण्याऐवजीं काळजी न घेतल्यामुळें काजळीचेही हात क्वचित्, किंबहुना जास्त प्रमाणांत लागत चालल्यानें धूसर भासणारी महाराष्ट्रभाषेची प्रभा अल्पावधींत पूर्वद्विगुणित फांकेल व उलट हीच इतरांस मार्गदर्शक होण्याचा सन्मान पटकावील.

आपल्या मातृभाषेची वाढ व तिचा स्वाभिमान हा स्वराज्याचा जरीपटका आहे तो दिगंत फडकत राहावा यासाठीं प्रत्येक साहित्य-भक्तानें व हिंदुस्थानांत जन्मलेल्या प्रत्येक महाराष्ट्रीयानें स्वभाषाभि-वृद्धीची हवा त्याला मिळवून दिली पाहिजे व ती मिळविण्यांत भाऊ-बंदकी नसून सर्व आपापल्यापरी सारखेच हक्कदार आहेत अशी भावना अव्याहत मनांत बाळगावी.

---

प्रभुदरबार. शालीबंडा, हैद्राबाद द.
भा. शु. १ श. १८४९
२८ आगस्ट १९२७ रविवार.

# ( ४ ) वाङ्मय-तप.

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥
( श्रीमद्भगवद्गीता अ. १७ श्लो. १५ )

जगांत आजपर्यंत जितके कर्तृत्ववान् व असाधारण पुरुष होऊन गेले त्यांनीं समाजोन्नतीस्तव अविश्रांत श्रम करून वाङ्मय-तपाचें भांडवल निःस्वार्थबुद्धीनें आणि विशाल औदार्यानें समाजास अर्पण केलें आहे. कोणताही व्यापार भरभराटीस येण्यास त्याचें मूल भांडवलच कारणीभूत असतें. ज्या मानानें भांडवल अधिक त्याच मानानें व्यापार-क्षेत्र विस्तीर्ण होत जातें. कोणत्याही कार्यसिद्धीस आधीं तप लागतें हा सिद्धांत आहे. वरुणासारखा, पूर्ण शक्त, सामर्थ्यवान् ब्रह्मज्ञ सद्गुरु असतांना देखील भृगूस ब्रह्मोपदेश अंगीं बाणण्यास तपाचेंच अवलंबन करावें लागलें. " स तपस्तप्त्वा " तेव्हां कोठें त्यास ज्ञानप्राप्ति झाली ही गोष्ट प्रसिद्ध आहे. यावरून तप हेंच कार्य-यशाचें मूलभूत शौर्य, उन्नतिफलान्वित वृक्षाचें बीज व वाङ्मय-भव्य-मंदिराचा भक्कम पाया होय हें सिद्धच आहे.

असले मूलाधारभूत वाङ्मयाचे जिवंत झरे आपलें अमृतमय जीवनतप ज्यांनीं भाषेच्या शाश्वतीस्तव अर्पण केलें आहे त्या प्राचीन दिवंगत महात्म्यांत महाराष्ट्र-वाङ्मयदृष्ट्या पाहिल्यास सुमारें ६०० वर्षांपूर्वीचे श्रीज्ञानेश्वर, मुकुंदराज किंवा मुकुंदराज, ज्ञानेश्वर ( श. ११९३ ), नामदेव, भानुदास ( १३७० – १४३५ ), सेना, जनार्दन-स्वामी ( १४१३ – १४९७ ), अंबाजोगाईचें दासोपंत ( १४७२ – १५३७ ), श्रीएकनाथ ( समाधि श. १५२१ ) रघुनाथपंडित, आनंद-तनय, विठ्ठल, श्रीधर, कवि वामन ( शके १५३० ), सहजानंद ( १५३२ ), मुक्तेश्वर ( श. १५५१ – १५७२ ), शिवरामस्वामी ( १५५४ ), शिवकल्याणस्वामी ( १५५७ ), जनीजनार्दन ( १५९३ ), विठ्ठल ( १५९६ ते १६०२ ), अमृतराय ( १६२० ),शिवदिनकेसरी ( १६२० ते १६९६ ), साधु रामदास, संत तुकाराम ( १६५० ते १७५० ), मध्वमुनि ( समाधि १६५६ ), नरहरि मोरेश्वर (१६५० ते १७०७ ), दयाळनाथ ( श. १७१० ते १७५८ ) आणि त्यानंतरच्या कालांत कवि मोरोपंत, महिपती, रामजोशी, अनंतफंदी इत्यादिकांनीं तपोनिधानत्वाची पूर्णता केली आहे. या मुख्य जिवंत झऱ्याच्या जिवावरच इतर आधुनिक साहित्यिकांचे ओढे, नाले त्या त्या कालानुरूप वाहूं लागतात व त्यांचें प्रवाहकत्व थाटानें साजरेंही होत असतें. कसलेंही काव्य, अलंकार रूपक, कोटिक्रम जरी नवीन पेहेरावानें आधुनिक - वाङ्मयांत उठावदार दिसलें तरी खरें सौंदर्यधन वरच्याच गंगाजळींतून मिळालेलें असतें.

अगदीं प्राचीन कवींपैकीं बाणभट्टासारखे ज्यांच्याबद्दल "बाणो-च्छिष्टं जगत्सर्वं" ही म्हण प्रचारांत आली अशा उच्च पदवीला पोंच-लेल्या – श्रेष्ठतर म्हणविलेल्यांच्या काव्यनिर्मितीपासून तों "उडत्या माशीस पाहून" "चालत्या मुंगीस बघून," भुर्रकन् उडालेली चिमणी,"

"पटकन् पडलेली पाल" इत्यादि आधुनिक काव्यापर्यंत अलंकार व रूपकपरंपरा आधींपासूनचीच थोड्याबहुत प्रमाणांनीं दिसून येणारी, पण आधारतः तीच सर्वत्रानुस्यूत असलेली अरा सूक्ष्मावलोकनाचें श्रम घेतलें, तर सहज दृष्टोत्पत्तीस येईल.

खरें पाहूंगेल्यास महाराष्ट्र-वाङ्मयाच्या उत्तरोत्तर वृद्धीचें श्रेय याच साधुसंतांना देतां येतें. त्यांची अधिकारयुक्त वाणी त्यांच्या अनेक जन्मसांसिद्धज्ञानसंपादनश्रमानें, मिळविलेल्या प्रत्यक्ष अधिकारानें तदानुयायी भक्तांना, सांप्रदायिकांना तीं उपदेशपर काव्यें – पद्यें – पाठ करावयास लावून मुद्रणसामुग्रीच्या अभावींसुद्धां चालत्या बोलत्या जिवंत हृदयांत खरें जिवंत-काव्य मुद्रित केल्यामुळें प्रत्येक श्लोक, पद्य ओवी आणि अभंग आदरबुद्धीनें, आस्थेनें व मोठ्या भक्तीनें प्रत्येक भक्त पाठ करीत असे. यामुळेंच त्यांचें सत्कीर्तिरूप जीवन चिरस्थायी – जास्त काय, तें इतकें लोकप्रिय झालें आहे कीं, सद्योपलब्ध मुद्रणसाधनांनीं त्यांच्या हजारों प्रती असल्या तरी भक्तहृदयांत खोल मुद्रित झालेलें जितक्या प्रेमानें तें ध्वनित होतें, त्याच्या त्या अवर्णनीय प्रेमांत तल्लीन होऊन ज्या करुणस्वरानें म्हटलें जातें, त्याच्या एकदा ऐकण्यानेंच जितकें लवकर आणि सौकर्यानें हृदयांत रुजतें आणि सहज पाठ होतें तितकें छापील पुस्तकें अहोरात्र सन्निध बाळगून दोन-चार-वेळां वाचून काढावेत म्हटल्यासही त्रासदायक वाटतात; मग तोंडपाठ करण्याची गोष्टच कशाला !

ज्या कालीं मुद्रणाची कल्पनाही नव्हती – अधिक तर काय, लेखनपद्धतीही उपलब्ध नव्हती अशा कालींसुद्धां वाङ्मयसार, बीजरूप, निष्कर्षित असा वेद अध्ययन व अध्यापन या धार्मिक निर्बंधाच्या योगें अनादि कालापासून आजपर्यंत अव्याहत जिवंत राहिला याचें

खरें कारण म्हणजे त्याच्या चिरस्थायिकत्वाबद्दल झालेलें तीव्र व प्रदीर्घ तपच होय. यांत माझा हेतु मुद्रणसामुग्रीचें विफलत्व दाखविण्याचा नसून त्या त्या महात्म्यांचें काव्यमहत्त्व आणि कार्यश्रेष्ठत्व दिग्दर्शन करण्याचा आहे.

जसें वाङ्मयाचें जनकत्व तद्वत् त्याचें पोषणकर्तृत्वही याच साधुसंतांकडे प्रामुख्यानें येतें. वस्तुतः त्यांनीं अध्यात्मपर आणि भक्तिपरिप्लुतकाव्येंच लिहिलीं आहेत; तरीपण त्यांत आधुनिक भाषातज्ज्ञांच्या दृष्टीनेंसुद्धां निसर्गवर्णन, ईशस्तवन, स्वानुभवकथन, विरह–दिग्दर्शन, करुणालाप, हृद्भेदी विलाप, प्रेमगुंजन, स्तुतिपरवर्णन, इतिहासदिग्दर्शन, हास्य, विनोद, विरोधाभास, विप्रलंभ, छेकापन्हुति वगैरे वगैरे काय एक नाहीं? ज्ञानेश्वरांच्या पोतडींत, पंडित व पंतांच्या चोपडींत, तुकारामांच्या गोदडींत, सूरदासांच्या घोंगडींत, रामदासांच्या कुबडींत, अमृतरायांच्या देवडींत, नामदेवांच्या झोपडींत आणि दासोपंतांच्या पासोडींत जें नाहीं तें जगांत कोठेंच नाहीं! तसेंच आमच्या दाक्षिण - महाराष्ट्रांतील केशवस्वामी, आत्मारामस्वामी, कल्याणचे – ( रामदासकालीन ) – शिवरामस्वामी व नारायणमहाराज जालवणकर इ. साधुसत्पुरुषांच्या वाणींत जें अढळलें नाहीं – ( अगदीं शेवटल्या ) ७२ वर्षापूर्वींच्या श्रीमाणिकप्रभूंच्या गादीखालीं जें दिसलें नाहीं तें केव्हांही इतरत्र सांपडणार नाहीं!! आद्य श्रीमच्छंकराचार्यांच्या अध्यात्मपर भव्य वाङ्मयमंदिरांत सर्वसाधारण मुमुक्षूंना श्रीमद्विद्यारण्यांनीं जसा प्रवेश करवून दिला तद्वत् दक्षिण प्रांतांतील या आधुनिक कालांतही श्रीमन्मार्तन्डप्रभु महाराजांनीं अनेक – वेदान्तपर पण – अत्यंत रसाळ पद्यें, महामौनशतकासारखे तात्त्विक ग्रंथ निर्मून "ज्ञानमार्तन्ड" नामक अध्यात्मग्रंथाचा सोनेरी कळस झळकवून सोडला आहे. ( ज्ञानमार्तन्डग्रंथानें वेदान्ताच्या जगांत क्रांति घडवून आणिली आहे. अध्यात्मपर-

ग्रंथांतील ठराविक ठशाच्या विशदीकरणपद्धतीनें कांहीं कांहीं न सुटलेलीं व संशयित असलेलीं प्रमेयें आकलनीय अशा सरळ आणि असंदिग्ध शब्दांतून समजावून देण्याची शैली या ग्रंथाशिवाय इतरत्र अढळणार नाहीं असा माझा विश्वास आहे). भविष्यकालांतील वातावरणांत हा ग्रंथ सौकर्यानें अल्पावकाशांत अध्यात्मशास्त्रफल प्राप्त करून देणारा कल्पद्रुम ठरेल अशी आमची भावना आहे. अस्तु.

एकूण, साधुसत्पुरुषांनींच या वाङ्मयवृक्षाची जोपासना अत्यंत काळजीनें स्वरूपसाक्षात्कारजीवन सिंचून केली आहे हें आतापर्यंतच्या विवेचनावरून ध्यानांत आलें असेलच! या आधुनिक कालांतलेच पण दिवंगत असे किती तरी जाळवणकर नारायण महाराज व कल्याणकर शिवरामस्वामीसारखे ज्योतिर्मय काव्यसृष्टींतले तेजस्वी तारे असून या विसाव्या शतकांतील विद्युत्प्रकाशमय जगांत लुप्तप्राय अप्रसिद्ध राहिले! ते कां? याच्या कारणमीमांसेसह त्या कविवर्यांच्या काव्यनिर्मितीबद्दलची थोडी-बहुत माहिती द्यावी असा माझा मनोदय आहे.

साधुसत्पुरुषांच्या ग्रंथांत बहुतेक वेदान्त किंवा भक्ति या शिवाय केव्हांही कांहीं एक अढळून येत नाहीं" हाच काय तो यावर सर्वांत मोठा आक्षेप! एकादें प्रौढ मासिक हातांत आलें असतां अध्यात्म दिसलें कीं चटकन् तें तेवढें पान उलटून विनोदपर, हास्यलहरी किंवा एकादी मनोरंजक गोष्ट (तीही संपूर्ण आणि उत्तानशृंगारपर असली तरच) वाचण्यापलीकडे सर्वसाधारण वाचकांची प्रवृत्ति दिसून येत नाहीं. अध्यात्म म्हणतांच एक मोठें डोईजड ओझें, साधुसंतांचें काव्य म्हटलें कीं "नन्ना म्हणती मान" असें कां व्हावें? आणि वेदान्त म्हणजे "पाऊणशें वयमान"-वाल्यांनींच तो वाचावा असा अवास्तव हट, अशी विपरीत भावना स्वीकारिल्यामुळेंच आज वाङ्मयाची झालेली दुर्दशा गोचर होत आहे!! वस्तुतः "येन विज्ञातेन सर्वं

विज्ञातं भवति" अशी त्रिकालाबाधित सत्य-म्हणूनच कोणत्याही मताभिमान्याला, कोणत्याही धर्म व पंथानुयायीला मान्य आणि सकल-हितास्पद अमृतवल्ली ज्या अध्यात्मांतच सांपडते, ज्या निगम-कामधेनूची कास धरल्यास "यद्गत्वा न निवर्तंते" असें तें चिरस्थायी आनंदमय कैवल्यपद सहज प्राप्त होतें त्यांत पूर्णपणें मुरलेले-त्याचा प्रत्यक्ष साक्षात्कारानुभव आब्रह्मस्तंबपर्यंत पावलोपावलीं जे घेतात असल्या सत्पुरुषांच्या वाणींत काय अमृतत्त्व आहे अशी आकांक्षा एकाद्या जिज्ञासूस झाली असली तरी तो केवळ एकदा कसेंबसें त्याव-रून दृष्टि फिरवून धावत्या वाचनापलीकडे श्रम घेत नसल्यामुळें त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेण्यास साधनावश्यक ज्या मनन-निदिध्यासनादि मुख्य तपाची अत्यंत आवश्यकता असते त्याच्या अभावीं पडल्या पडल्या वाक्यावरून उडत उडत दृष्टिक्षेप करतांच सहज आकलन होण्यासारखी ती कांहीं इसापनीतींतील करडू, कोंबडीच्या गोष्टीसारखी गोष्ट नव्हे! किंवा अजीबाईनीं सांगितलेली कोल्होबाची किंवा जांवयी-बुवांची कहाणी नव्हे!! कोणतेंही पुस्तक विद्वन्मान्य आणि चिरस्थायी होण्यास त्यांतील लिखाण ज्ञानगर्भित पाहिजे. वाऱ्यावर येऊन वावट-ळींत वावरणारें किंवा विलीन होणारें वाङ्मय वेगळें व कालकृत अनेक व्यक्तींच्या शंका-कुशंका सहन करून अभिप्रेत ज्ञानाच्या लालसेनें वाऱणाऱ्या अधिकारी वाचकांस ज्ञानाचा बोध देणारीं पुस्तकें वेगळीं!!! अल्पावधींत उद्भवून पळांत मावळणारीं किंवा क्षणभर चमक दाख-विणारीं पुस्तकें भिक्षेकऱ्यास मूठमूठभर प्रत्यहीं भिक्षा घालणाऱ्या घरासारखीं असून ज्ञानगर्भित पुस्तकें सदावर्तासारखीं आहेत. पहिल्यांत त्याठिकाणीं बिऱ्हाड राहीपर्यंतच झांकल्या मुठींतील चार दाणे लाभल्यास लाभतात! तर सदावर्तें सदासर्वदा चालणारीं अस-तात!! आतां वेदान्त" या शब्दोच्चाराबरोबर सर्वसाधारणतः डोकें

उठण्याचें कारण पाहूं गेल्यास "वैराग्य (संसाराची किळस) आणि नश्वर म्हणून 'जगाबद्दलचें औदासीन्य' हे प्रवृत्तीला अत्यंत घातुक होत" हेंच मुख्यत: दर्शविण्यांत आलेलें दिसून येतें; पण विचार केल्यास कळून येईल कीं, देहाचा लोभ धरून रणांत गेलेल्यास केव्हांही रणांगणावर शौर्य गाजविणें शक्य नसतें. फुशारकी मारणाऱ्यापेक्षां कार्यदक्ष मौनी अधिक शूर होय हें कोणीही कबूल करील. वेदान्त झाला तरी या व्यतिरिक्त कांहीं तरी सांगत नसून देहात्म-भावनेलाच त्यागनीय अहंकार म्हणतो. कारण, दैहिकभावनेनेंच मानव विषयांचा दासानुदास होत जातो आणि ही विषयासक्ति देहाचा लोभ अधिकाधिक वाढवीत असते. म्हणून जीव संसारजालांत अधिकाधिक गुरफटतो. "देही" च्या मागें 'देहि' हें दैन्य दैनंदिन वाढत असतें. तेव्हां "देहीति वचनं कष्टं" हें कष्टतर कष्ट—विफल कष्ट—जे विनाकारण त्याला पडतात त्यांतून त्याची सुटका करावी म्हणूनच हा वेदान्त फलाशा न धरतां कर्तव्य म्हणून केलेलें कार्य आदिमध्यावसानीं सारखें श्रेयस्कर कसें असतें हें अनेक उदाहरणांनीं दाखवून, विदेही आणि देही या उभयतांचें — शाश्वत स्वातंत्र्य, सर्वशक्तिमत्व आणि अनेकाश्रयत्व म्हणजेच अमर्याद पारतंत्र्य स्पष्टतया पटवून देतो. जें प्राप्त व्हावयाचें तें होतेंच; पण अधीरतेनें अधिक धडपडून अधैर्ययोगें अधिकाधिक घाबरून यत्नार्थ कांहींतरी करीत सुटणें म्हणजे कर्तव्यहानि आणि धैर्यानें, अहेतुकत्वें योग्य कर्तव्य करीत राहण्यांत जें स्थैर्य व ईप्सित प्राप्त्योत्तर जी शान्ति लाभणार त्यांचा कर्तव्यारंभापासूनच स्वीकार केल्यास समाधानचित्तानें अत्युत्कृष्ट कर्तव्य बजावलें जातें ! 'हें माझें' व "शरीरात्मक मी" हा अविवेक रहस्योपदेशानें विलयास गेल्यास यशापयशाचा वाराही त्यास स्पर्श न करतां उभयस्थितींतही शांति आणि आनंद ह्यांचा लाभ होतो ! ! आणि त्याची कार्यदक्षता जनतेंत आदर्शनीय ठरते ! ! ! "जग नाहीं,

तर सर्व ब्रह्मच आहे किंवा जग आहे, दिसतें, तर ती सारी माया आणि जगद्भास हा सारा भ्रम ! " न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः " इतकेंच नव्हें, तर – न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् " तद्वत्च "अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ॥ अव्यक्त निधनान्येव तत्र का परिदेवना ॥" इत्यादि प्रकारें वेदान्ताचीच शिकवण जातिवंत शूर, पण उभयसंकटात्मक प्रसंगानें गांगरून गेलेल्या किंकर्तव्यमूढ अर्जुनास श्रीकृष्णांनीं दिली. म्हणजे कांहीं राख फासून बैरागी बनविलें नाहीं ! किंवा अठरा अक्षौहिणी सैन्याच्या गर्दीतून निर्जन अरण्यांत पळावयास लाविलें नाहीं, तर कर्तव्यपराङ्मुखास कर्तव्यदक्ष, सद्ध्येयानिष्ठ बनविलें, त्याच्याकडून स्वधर्माचरण करविलें आणि शेवटीं रणदेवींकरवीं विजयाच्या गळ्यांत विजयीमाळ घालविली ! हें कोणाही विचारी बुद्धीला अमान्य होणें शक्य नाहीं. उठल्या सुटल्या वेदान्तावर जिकडून तिकडून, ज्याचे त्याचे अडवे तिडवे हल्ले जेव्हां तेव्हां जे चढत असतात ते विनाकारण कसे याचें हें अधिक परिणामकारी, सर्वश्रुत अतएव अधिक परिचयाचें ठळक उदाहरण म्हणून विनम्रपणें दर्शविण्यास हा जरासा वळसा घ्यावा लागला. असो.

ज्ञानगर्भित पुस्तकें म्हणजे वेदान्ताचींच असें कांहीं माझें म्हणणें नाहीं. होत राहील तितकी, अधिकांत आधिक वाङ्मय-निर्मिति आवश्यक आहे आणि तत्प्रीत्यर्थ इतर वाङ्मयांतील अनुवादात्मक किंवा माहितीच्या दृष्टीनें रूपांतरित पुस्तकेंही जास्तींत जास्त जितकीं निघतील तितकीं हवींतच ! कांहीं गंधहीन, पण दिसण्यांत मोहक अशा फुलांच्या "आणा – माला" आणि "अणे – माला" सारख्या गुंफतां गुंफतांच गळून पडणाऱ्या मालांच्या ऐवजीं केवळ आर्थिक दृष्टि जाग्रत ठेवून बाजारांतील मागणीप्रमाणें भराभर पुरविल्या जाणाऱ्या मनोरंजक कादंबऱ्या, लघुकथांच्या भरभराटीच्या कालांत-

५

सुद्धां "स्टार्टशान," " विविधज्ञानविस्तार, " व " तत्त्वज्ञानमंदिर " यां सारखीं मासिकें आणि "नवभारतमाले"सारख्या टिकाऊ सौरभान्वित बकुल-पुष्प-माला गुंफल्या जात आहेत ! हीमात्र मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. कोणत्याही तऱ्हेची—पण सदुपयोगी, नीति व सदाचार शिकविणारीं, शांति आणि सुसंस्कृतता अंगीं बाणविणारीं प्रगल्भ विचारपरिप्लुत पुस्तकें या सदरांत मोडतात एवढेंच मला येथें म्हणावयाचें आहे. याबद्दल माझें स्वत:चें मत किंवा स्वत:बद्दल म्हणजे—सदाचाराच्या नियंत्रणाखालीं दीर्घोद्योग आणि चिकाटी यांच्या जोरावर जनसंतोषार्थ अनेक कला हस्तगत करणें आणि जनता-जनार्दनाची अहेतुक, पण चिरस्थायी सेवा घडावी म्हणून ( यथाशास्त्र, सांगोपांग अध्ययन शक्य नसलें तरी ) उद्‌घाटण—यत्नानें वाङ्मय—क्षेत्रांत शक्य तितकी प्रगति करणें हें माझें ध्येय आहे. शिवाय, कसल्याही गर्दीत व गडबडींत एकांत साधण्याची मन:संयमनशक्ति थोड्या कालांत पुष्कळ कार्यें करण्यास समर्थ असते असा माझा अनुभव आहे. तोच मला कृतिसंवर्धनार्थ प्रोत्साहन देत असतो ! यावरून वर जो साधु-सत्पुरुषांचा उल्लेख वाङ्मयासंबंधीं केला आहे तोसुद्धां वेदान्त, भक्तिपर अतएव संत-वाङ्मय अशा एकांगी दृष्टीचा नसून अनेक भाषाभिज्ञांच्या हृदयांत सहानुभूति, एकी, समानत्व आणि यामुळें अविच्छिन्न प्रेम किंवा " सर्वे जना: सुखिनो भवन्तु " या सार्वत्रिक कल्याणकर सदिच्छेचें मूलभूत, अत्यंत श्रेयस्कर व यशस्वित यत्नाचें महत्त्व दाखविण्याचा आहे. स्वभाषेचें अभिवर्धन म्हणजे इतर भाषांच्या ऱ्हासार्थ चालविलेला यत्न असा जो एक दुसराच विरुद्ध ( पण ओढून ताणून केलेला ) अर्थ त्यांतून निघूं शकतो त्याचा बीमोड व्हावा आणि सर्वांत सारखी बंधु-भावना पसरत राहावी अशी वाङ्मयसेवा ज्या प्रकारच्या लेखनानें होऊं शकते तो प्रकार अधिक स्पष्ट व्हावा. तद्वत् जरासा वळसा घेऊन मी माझें ध्येय म्हणून

जें सांगितलें त्यांतहीं ह्याच हेतु मुख्यत: आहे. कारण, वाङ्मयाभिवृद्धि म्हटल्यावर ती ती भाषा ज्या ज्या विशिष्ट धर्मीयांची असेल तो तो धर्मही मध्येंच डोकावूं लागतो. " भाषा " म्हणतांच मातृ - भाषेचा सदभिमान जाग्रत होणारच ! आणि त्या बरोबर जन्म - भूमीचा अभिनिवेशही अपरिहार्य होणार ! ! अर्थात् कोणतीही भाषा घेतली तरी स्थलपरत्वें पुन: तींत भेद पडणार ! अशा अडचणी प्रत्येक भाषेच्या अभिवर्धन - प्रसंगीं त्या त्या भाषाभिमान्यांना चांगल्या जाण-वल्या आहेत आणि म्हणूनच सर्वत्र एक भाषाप्रसाराची आवश्यकता भासूं लागली. तसा यत्नही झाला; पण एक भाषा ऐक्य - प्रस्था-पनेस व परस्पर - प्रेमसंवर्धनास कारणीभूत आहे असें कांहीं ठरूं शकलें नाहीं. तशा दृष्टीनें विश्वप्रयत्न करणाऱ्यांनीं केलाही ! तद्वत् यूरोपांत फ्रेंच भाषा लिंग्वा फ्रांका ठरली आहे, तरी त्याचा अर्थ असा थोडाच होऊं शकतो कीं, इंग्लंडच्या बोळा - बोळांतील मजूरसुद्धां फ्रेंच जाणतात ? असें होणें शक्यही पण नाहीं. देशांत अनेक भाषा चालू असतांना आणि एक लिंग्वा फ्रांका नसतांनाही जात्याभिमान आणि धर्माभिमान जाग्रत असलेल्यांच्या हृदयांतीलमात्र समानबंधुत्वात्मक सहानुभूतींत ज्यांच्या योगें यत्किंचितही अडथळा येऊं शकला नाहीं— याहूनही उच्च म्हणजे जाती, धर्म, मतमतांतर - भेदाचा संपर्कही नस-लेलें उदाहरण म्हणून मी साधु - सत्पुरुषांच्या वाङ्मयनिर्मितीचा अत-एव वाङ्मय-तपाचा उल्लेख केला. तेंच यूरोपाकडे पाहा ! म्हणजे ध्यानांत येईल कीं, इंग्लंड, अस्ट्रेलिया आणि अमेरिका या ( तीन निरनिराळ्या ) त्रिस्थळींतील एकच भाषा असूनसुद्धां ती विचार-विरोधाला अथवा ( एक धर्म असूनही पंथ - भेदामुळें, जन्मभूमीच्या व मातृभाषेच्या जन्मजात - सदभिमानामुळें पृथक् ठरलेल्या ) भाव-नांच्या विविधतेला आळा घालूं शकली नाहीं ! उलटपक्षीं इंग्लंड

आणि अमेरिकेंत मोठें युद्ध झालें आणि उभयतां एकमेकांपासून पूर्ण विलग्न झाले ते झालेच ! ! शिवाय, मातृभाषा मग ती कोणतीही असो ! प्रसंगीं ज्याची जी धर्मभाषा असेल तिचा अभिमान अधिक जाग्रत होऊन भाषेहून धार्मिक-भावनेचें महत्त्व आणि त्या भावनांची उत्कटताच तीव्र परिणामकारी ठरते असें अनेकवेळां अनुभवास आलें आहे. धार्मिक शैथिल्य म्हणजेच पारमार्थिक भावनांची उपेक्षा ही अनेकदृष्ट्या ऐहिक उत्क्रांतीला तारक ठरण्याऐवजीं मारकच ठरली आहे हें शांतपणें आणि जरा खोल विचार करून पाहिल्यास सहज पटण्यासारखें आहे ! याबद्दल इतिहासाची साक्ष मिळवूं गेल्यास त्यांतून भाषाभिमान आणि धर्माभिमान या दोहोंचीं समसमान उदाहरणें सांपडतील तथापि माझ्या प्रस्तुत मताला इतिहासाची अर्ध सम्मती-तरी आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. तेव्हां विविध जाती-धर्म - भाषा-त्मक अथवा मतमतांतराच्या अरुंद बोळांतून सुटका मिळवून आम्हांला जो शाश्वत आणि सकल-श्रेयस्कर राजमार्ग गांठावयाचा आहे तो सन्मार्गदर्शक सत्पुरुषांच्या वाणींतूनच सांपडतो ! मग ती वाणी कोण-त्याही भाषेंतील असो ! ! कारण, भाषेवांचून जसें भाषण अशक्य तद्वत् ऐहिक आणि पारमार्थिक अशा उभयविध धर्माभिमानावांचून भाषेचें संवर्धनही अशक्यच. "धर्म" शब्दाला अजिबात वगळून केव्हांही चालावयाचें नाहीं. फार झाल्यास विवक्षित धर्माची संकुचित व्याख्या सोडून श्रेष्ठतर आणि विशाल अशी केल्यासही "मानवी - धर्म" तरी म्हणावें लागेलच ! तशा दृष्टीनेंही सन्मार्गनिदर्शन, नीतिशिक्षण, सर्व-भूतहितात्मक अशा अत्युच्च वातावरणांत ती वाणी नेऊन सोडते ! ! ! उदाहरणार्थ किंवा याच हेतूच्या अधिक स्पष्टीकरणार्थ कल्पना करूं कीं, चाळींतील एका घरास आग लागली आहे. त्या चाळींतील विविध धर्मीय, जन्मभाषाही ज्यांची निरनिराळी तद्वत् विविध व्यवसायी

असे लोक राहात असले तरी हें सारें वैविध्य चटसारें विसरून ते आधीं आग विझविण्यास एकमतानें, सारख्या कळकळीनें मनापासून धाव घेतात. या सहानुभूतीला लिंग्वा फ्रांकाचा अभाव जरासुद्धां आडवा येत नाहीं ! कारण, चाळींतील त्या प्रत्येक घटकाला ही पूर्ण जाणीव असते कीं, आग, प्लेग, कॉलरासारख्या भोंवतालच्या वातावरणांत आपल्यापुरतेंच पाहात राहून सर्वांशीं फटकून राहाणाऱ्याचें जीवन सुरक्षित राहणें शक्य नाहीं. भाषेचा संबंध जीवनकलहाशीं जेव्हां जेव्हां येतो त्या त्या वेळीं भाषेहून भावनेचें महत्त्व अधिक हें पटूं लागतें. भावना जितकी अधिक विशाल आणि सात्त्विक असेल तितकी अधिक हितावह आणि जितकी अधिक संकुचित त्या मानानें ती अधिक कलहसंवर्धक होते. आमच्या महाराष्ट्र भाषेच्या संवर्धनार्थ तर असो—शुद्धीकरणार्थ म्हणूनही झालेल्या व चालू असलेल्या यत्नांत मतैक्य कितीसें दिसून आलें ? असा प्रश्न समोर धरल्यास कोणाचें आणि कसल्या प्रकारचें वाङ्मय श्रेयस्कर व हितावह तद्वत् बहुमतानें अनुकरणीय ठरलें आहे हें स्पष्टतया दिसून येईल. निवळ शाब्दिक अनुकरणीय आणि अभ्यसनीय ठरूनच स्वस्थ राहिलेलें हें वाङ्मय नव्हें, तर याच्या निर्मितीपूर्वीं अत्यंत परिश्रमपूर्वक केलेल्या कायिक, वाचिक आणि मानसिक अशा तपत्रैविध्याची याला पुष्टि असल्यामुळें सत्पुरुषांची वाणी अभंग राहिली. हें तप ! व तपसामर्थ्य ? ! म्हणूनच नुसतें वाङ्मय न म्हणतां या लेखाला मीं “वाङ्मयतप” असें नांव दिलें आहे. सर्वतोमुखीं झालेलीं—इतकेंच काय, सुप्रसिद्ध किंबहुना जगत्प्रसिद्ध कवींच्या कवनांहूनही अनेकपटीनें अधिक लोकप्रिय झालेलीं व शतकानुशतकें आबालवृद्धांकडून सारखीं गइलीं जात असलेलीं आणि आजसुद्धां अत्यंत आस्थेनें म्हटलीं जाणारीं पद्यें म्हणजे साधुसत्पुरुषांचींच ! हें कोण नाकबूल करील ? असो. निरिच्छ-वृत्ति, कमी खर्चाची राहणी आणि बौद्धिक उन्नति रागतः हिंदुस्थानास प्रिय

असल्यानें आमचें वाङ्मय वेदान्तीय बनलें आहे एवढेंच! तरीपण निवळ वेदान्तग्रंथावरच काव्यनिर्मितीची परिसमाप्ति झाली असें नाहीं, तर नीति, वैद्यक, ज्योतिष, शिल्प इत्यादि विषयांतही — अधिकतर काय, अश्वपरीक्षा, मुद्रा, वशीकरण, उच्चाटण, गुप्तधन ( भूमींत गाडलेलें धन ) कोठें आहे? पाणी खात्रीनें कोठें लागेल इत्यादि शास्त्रांची आमच्या पूर्वकालीन लोकांनीं जी ग्रंथसामुग्री तयार केली आहे ती अजून तरी कोणत्याही सुधारलेल्या राष्ट्राच्या ग्रंथांच्या झगड्यांत हार न जाण्या इतकी पुरेशी आहे. म्हणून उत्तम ग्रंथ-संपादनानें भाषा जशी संपन्न होते त्याचप्रमाणें तें पचनीं पडण्यास बौद्धिक श्रमही घ्यावे लागतात. असल्या श्रमसाध्य साधनांनीं संपादन केलेल्या अनेक ग्रंथ-संग्रहानें जितका फायदा होतो त्याच्या दशांश, किंबहुना शतांश कां होईना — पण वाईट ग्रंथाचा अल्प शिरकावही पळभर पायसांतील चिमटभर विंचे इतका हानिकारक ठरतो. ही हानिमात्र फार घातुक आणि दुर्निवार्य होय! असल्या ग्रंथाचा प्रवेश होऊं न देण्याबद्दलची खबरदारी संपादकांनीं, संग्राहकांनीं आणि विशेषतः वाचकांनीं तर अधिक काळजीनें घेतली पाहिजे. विचारविरोधाकडे दोषान्वित चाळ-शींतून दृष्टिक्षेप करण्याची अंगीं खिळून राहिलेली आणि संवयींत मुरत चाललेली अंधानुकरणप्रवृत्ति क्षणभर बाजूस ठेवून श्रद्धेच्या — तरीही चौकसबुद्धीच्या पण स्वच्छ चाळशींतून मुमुक्षूच्या प्रेमळ दृष्टीनें पाहिल्यासच त्यांतील अमृतत्वाचा प्रत्यय येऊं लागतो.

बौद्धिक ग्रंथनिर्मितीप्रमाणें किंबहुना तदाधिक वाङ्मयाच्या टिकाऊपणास काव्याची फार जरूरी आहे. गद्यपद्यमय प्रबंध म्हणजे "काव्य". काव्याच्या प्रथम भागांत "पद्य" व दुसऱ्यांत "गद्य" हे उभय भाग वाङ्मयशब्दाशीं समानार्थक आहेत. पैकीं पद्यभागांतील दोन मोठे भेद श्राव्य व दृश्य, अलंकार-शास्त्राचे स्थायी व संचारीभाव

हें काव्याचें ऐश्वर्यद्योतक, अत्यंत आवश्यक अशीं ठळक लक्षणें होत. तेव्हां कवितेंत नियमबद्धपणानें भाषेची आभिजात वृद्धि होते. जितक्या अधिक नियमांनीं कविता बद्ध असेल तितका तिच्यांत रस अधिक भरतो. पण "स्फूर्ति-काव्यास हे नियम प्रतिबंधक आहेत म्हणून जशी स्फूर्ति होईल तसें काव्य लिहावें. नियमांचे पाश झुगारण्यानें जिवंत—काव्याची वाढ जोमांत होते" असें म्हणणाराही एक पक्ष आहे. पण कवितेचा मूळ उद्देश नियमबद्धतेमुळेंच सुफलित होतो असा दीर्घानुभव असल्यानें आजपर्यंत त्याच मार्गाचें अवलंबन अविरोधपणें सर्वच करीत आले आहेत. यावरून विचारपूर्वक पाहिल्यास नियमबद्धता श्रेष्ठ सद्गुण असून अत्यावश्यकही आहे असें स्पष्ट दिसून येईल. "जातीच्या सुंदरांना कांहींही शोभतें" म्हणजे लक्तरी किंवा विविध चिंध्यांची मलिन गोदडीही शोभेल? तद्विरुद्ध अभिजात सुंदरांवर अलंकार चढविल्यानें विद्रूपता येईल असें कोण समंजस म्हणूं शकेल? एतावता "स्फूर्ति नियमांनीं मारली जाते किंवा तिची गळचेपी होते" हें म्हणणें आम्हांस कबूल नाहीं. स्फूर्ति ही निसर्गनिर्मित आहे तरी व्याकरणाचीं बंधनें मूळ स्फूर्तीस अडथळा करूं शकत नाहींत. शिवाय कविता करण्याचा ज्यांना सराव आहे असल्यांना ही गोष्ट अनुभवात्मकही पटेल कीं, नियमबद्ध कवितारचनेस शब्दासंबंधीं जितका विचार करावा लागतो तितका अनियमित ( पदें,-गजल, पोवाडे इ. ) कवितेस लागत नाहीं. त्यामुळें शब्दाच्या क्रमांत जी गोडी आहे व शब्द शोधण्यास जी चिकित्सक बुद्धि लागते तिला अनियमबद्ध कवितेमुळें चालना मिळत नाहीं. कोणतीही इमारत जशी वास्तुशास्त्रान्वयें सुव्यवस्थित बांधण्यानेंच सुंदर ठरते तशीच "कविता जितकी नियमबद्ध असेल तितकी मर्यादशील, मोहक व मनोहर दिसते."- अगदी. थोडक्यांत म्हणजे-"काव्योत्पत्तीचें रहस्य सूत्रमय भाषेंतच दिसून येतें." तेव्हां वाङ्मयाभिवृद्धीस्तव कमींतकमी खालील

पांच सूचनांचा तरी साहित्यिकांनीं अवश्य विचार करावा व तो अधिकांत अधिक प्रमाणांत प्रचारांत आणावा. अशी विनम्र सूचना आहे.

१ – काव्यांत शब्दलालित्य, लाटानुप्रास, यमक हे त्याचे ठळक ठळक अलंकार होत. यामुळें क्वचित् काठिण्य दिसून येणें साहाजिक आहे अशा प्रसंगीं अर्थसौकर्यास्तिव फार झालें तर टीपा द्याव्यात; पण सुवर्णालंकाराऐवजीं मुलाम्याचे अथवा सुलभोपलब्ध पितळी दागिन्यांचा मोह आवरून धरावा.

२ – प्रौढ, गंभीर आणि प्रसाद – माधुर्ययुक्त काव्यानिर्मितीस अधिक महत्त्व मिळावें. म्हणजे असल्या ग्रंथांचा संग्रह अवश्य आणि अधिक आस्थेनें करावा. "अमूल्य ग्रंथ!" याचा शब्दशः अर्थ न करतां केवल आदरार्थींच केला जावा.

३ – उत्तान शृंगारपर आणि मतिभ्रंशकर काव्याची गणना अश्लील-वाङ्मयांत व्हावी.

४ – इतिहासात्मक, स्फूर्तिदायक, औद्योगिक, शौर्य – प्रेम – भक्तिसंवर्धक काव्याबरोबर आध्यात्मिककाव्येंही गणलीं जावींत. इतकेंच नव्हें तर अभिरुचिसंवर्धक काव्यनिर्मिति होत जाऊन ती अधिक आदरणीय समजलीं जावींत.

५ – नवीन उत्तम ग्रंथ निर्माण होण्याचें थोडा वेळ राहिलें तरी फारसें वावगें नाहीं, पण वाईट ग्रंथ मात्र न उपजण्याची अधिक काळजी घेणें आवश्यक आहे. ग्रंथाचा वाईटपणा व चांगुलपणा कशावरून व कोणत्या अभिरुचीवरून

ठरवावयाचा ? हा प्रश्न वेगळा आणि जास्त विचारार्ह आहे; पण एकंदरींत बहुजनसमाजाचे नेत्र ज्याकडे लागले आहेत असे अधिकारी जो मार्ग ठरवितील त्याप्रमाणेंच धोरण ठेवून ग्रंथसामुग्री तयार केली पाहिजे.

मी वर लिहिल्या प्रमाणें अविश्रांत श्रमपूर्वक वाङ्मयतप करून ज्यांनीं भाषेला, महाराष्ट्राला ऋणी करून ठेवलें आहे अशा महाभागांची काव्यसंपत्ति संशोधक आणि संग्राहकांच्या कृपेनें जी आज लोकांना लाभली आहे व लाभत आहे तसल्या प्रकारचा एक अमूल्य ठेवा माझ्या पाहाण्यांत आला आहे. त्यासंबंधीं "जें आपणांसी ठावें" या श्रीसमर्थांच्या शिकवणीनुरूप त्रोटक माहिती खालीं देऊन माझ्या कर्तव्यांतून मी अंशतः तरी मोकळा होतों :-

मुक्काम किल्ले कल्याण येथें श्रीशिवराम पूर्णानंद नामक समर्थकालीन एक सत्पुरुष व प्रासादिक कवि होऊन गेले. त्यांचें एक त्रोटक चरित्रही प्रसिद्ध झालें आहे; पण अद्याप त्यांच्या कृतिप्रकाशनासंबंधीं पुष्कळच कार्य व्हावयाचें आहे. यांची काव्यनिष्पत्ति, विद्वत्प्रचुर, प्रौढ, उद्बोधक आणि विद्वन्मान्य अशी ठरून चुकली आहे. स्वामी आपली शिकवण देऊन गेले, तरी महाराष्ट्र भाषा जाणणाऱ्या प्रत्येकावर त्यांच्या ग्रंथप्रकाशनाची व प्रसाराची जबाबदारी येऊन पडते. हें कार्य अद्याप शिल्लक आहे. स्वामींच्या सद्भक्तांनीं कांहीं पुस्तकें प्रसिद्धही केलीं आहेत; पण अद्याप पुष्कळ ग्रंथ-सामुग्री अमुद्रित आहे. यांनीं सटीक अपरोक्षानुभूति, वाक्यवृत्ति, गुरुगीता, भक्तिमार्ग आन्हिक, प्रबोधसुधाकर गीताचंद्रिका, श्रीमच्छंकराचार्यांच्या अनेक ग्रंथावरील मराठी टीका, कांहीं स्वतंत्र काव्यें व ब्रह्मोत्तरखंडांतील कांहीं निवडक पद्यें, आरत्या इत्यादि प्राकृत कविताबद्ध रचना

केली असून यांच्या स्फुट कविताही बऱ्याचशा आहेत. त्या प्रासादिक, नियमबद्ध आणि रसाळ आहेत. देशपरत्वें किंवा त्या वेळीं महाराष्ट्र-व्याकरण आजच्या इतकें कदाचित् रूढ नसेल. नसतां अशा प्रासादिक व अधिकारी व्यक्तींना व्याकरणाचे दोष राहूं न देणें फारसें जड नव्हतें, तरीही माझ्या दृष्टीनें स्वामींच्या समकालीन इतर दाक्षिणप्रांतीय कवींच्या काव्यमानानें शिवराम महाराजांच्या कविता प्रसाद-युक्त, जास्त उद्बोधक व रसपरिपूर्ण आहेत.

याचप्रमाणें आमच्या निजाममहाराष्ट्रांतले अंबाजोगाई (मोमिनाबाद) येथील कविवर्य "दासोपंत" हे प्रचंड काव्यरचनाकार म्हणून प्रसिद्ध आहेत. "गीतार्णव", "गीतार्थ चंद्रिका", "गुरुगीता", स्फुटपद्यें इत्यादिकांच्या स्वरूपांत संख्याबाहुल्यदृष्टीनें सवालक्ष ओव्यांचीं व तितक्याच पद्यांचीं फुलें पंतांनीं शारदादेवीच्या चरणीं वाहिल्याचें प्रसिद्ध आहे; पण समग्र काव्य कांहीं प्रसिद्ध झालें नाहीं! दासोपंताच्या या अर्चनेचें दर्शनमात्र त्यांनीं स्वहस्तें एका पासोडीवर व इतरत्रही पसरून ठेविलेल्या विशुष्क निर्माल्यरूपानें दर्शनेच्छूंच्या दृष्टीला पडलें असूनही अद्याप कोणी त्याचें मुद्रण मनावर न घेतल्यामुळें तें तसेंच पडून राहिलें आहे!! मुळांत अमुद्रित! मग त्याचें वाचन कुठलें? "निर्माल्य" हा शब्द दोन दृष्टीनें वापरला आहे. एकतर ज्या फुलांना वाहून जवळ जवळ सवातीनशें वर्षें झालीं; पण मुद्रणाभावीं वाळत चाललेलें म्हणून! आणि दुसऱ्या दृष्टीनें म्हणजे प्रस्तुत कविवर्यांच्या रचनेवर विफलत्वाचा आरोप किंवा तें विफलत्व प्रसवबाहुल्यामुळें असावें असें विधानही कांहीं महानुभाव करतात त्यांच्या तशा कल्पने-नुरूप यद्यपि निर्माल्यच ठरतें; पण हें निर्माल्य प्रसादरूपानें सदैव बाळगून ठेवण्यासारखें, पूजनीय आणि परम पावन, पवित्र प्रसाद

होय !! एवढेंतरी मला प्रस्तुत प्रसंगीं अशांना विनम्रपणें सुचवावयाचें आहे !!! शिवाय, प्रसवबाहुल्यामुळें त्यांच्या रचनेवर लादलेलें निष्फलत्व त्यांचें समग्र काव्यवाचन झाल्यास किती निराधार आहे हें स्पष्टतया दिसून येईल. काव्याचा एकअष्टमांश भाग जो प्रसिद्ध झाला आहे त्यावरूनही वेदान्तासारख्या परमोच्च, प्रगूढ विषयावर इतक्या विविधतेनें आणि तितक्याच सोप्या भाषेंत काव्यलेखनाचा मान दासोपंतांनाच प्राप्त आहे असेंही कांहीं तज्ज्ञ म्हणतात ! आणि म्हणूनच संतकवींत दासोपंत हे पहिल्या प्रतीचे कवि गणिले जातात. असो.

जाळवणकर नारायणमहाराजांचेंही १ बोधसागर, २ आनन्द-सागर, ३ ज्ञानसागर, ४ विज्ञानसागर विचारमाला इ. यद्यपि हे चार सागर प्रसिद्ध झाले आहेत तरी आणखीही बरेंच कवित्व असावेसें वाटतें ! कारण, यांच्या वाणींत विलक्षण गोडी, काव्यांत सारल्य, रस-परिपाक, अव्याजमनोहर भाषा आणि प्रौढ रचनाकौशल्य हीं प्रामुख्यानें अढळून येतात.

वाङ्मयाच्या विशाल क्षेत्रासंबंधीं विस्तृत विचार अशा लेखांत करतां येणें कठीण आहे, तरी स्वमतदिग्दर्शनापुरते वरील शब्द पुरतील असें वाटतें. कार्यक्षेत्र ज्या प्रकारें विस्तृत होईल त्याप्रमाणें शक्त्यनुसार पण वाङ्मयाभिरुचिवर्धक यत्न करण्यास मनोभावें आम्हीं तयार आहों व प्रत्येक साहित्याभिमानी ही मनोभिराम वाङ्मयसेवा म्हणून स्वसंतोषानें सदैव सिद्ध असावा अशी हार्दिक आकांक्षा बाळगून आहों.

---

प्रभुदरबार, शालीबंडा, हैद्राबाद द.
२३ – ९ – ३७ / १८-१२-४६ गुरुवार

(५)

# " मोटार-मन्वंतर "

## प्रहसन.

वसंतराव वकील :– ( आपल्या घरीं ).

आतां मला जावयाचें आहे व्याख्यानाला – मग कशाला हा नेक्टॉय, कॉलर विलायती ! – हॅटच्या ऐवजीं घातली गांधी-कॅप व खादीचा स्पेशल करवलेला कॉलर नुसता असला म्हणजे झालें. तसें नको – नेक्टॉय पाहिजेच आज – तो आहे महत्त्वाचा आजच्या प्रसंगाला. " मुख्य धर्म " आहे आजच्या व्याख्यानाचा विषय म्हणून जरा विचार पडतो – पण नको, असूंच द्या तो. टांचण तर व्यवस्थित करून ठेविलें आहेच व्याख्यानाचें म्हणा - अरे ! हो ! पण कॉलरला बसविण्याची गिनीगोल्ड टांचणी कोठें सांडली ? केव्हांचा शोधतों आहें तिला ! विषयपरिपूर्ततेच्या टांचणींत सहज दृष्टीस पडलेल्या व आठव-लेल्या एक दोन मासिक किंवा धार्मिक पुस्तकांतून पांच चार वाक्यें दोन चार मिनिटांत घेतलीं चटकन् टिपून कीं संपलें; पण पिनटांचणी-मात्र प्रत्यक्ष झळकावी लागते – पण – पण आतां होती ना येथें कॉलरपीन ? छे बुवा – १५ मिनिटें झालीं – शोधतों आहें सारखा !

दिवाकरपंत :– ( प्रवेश करून, घाईनें ) अहो ! पंधरा मिनिटें उरलीं व्याख्यान सुरवातीला. थिएटरांत शोध घेतला तेव्हां "व्याख्याते येतील अगदीं वेळेवर – तशी सूचनाही पण नुकतीच आली आहे; शिवाय त्यांची पंक्चुयालिटी तर प्रसिद्धच आहे तेव्हां आरंभ करावा कार्यक्रमाला" असा सभासदांत चालला होता ऊहापोह – म्हणून म्हटलं चला पंतांच्याच घरीं - भेटतील वाटेंतच! आणि येथें पाहतों तर अजून चाललयं नेक्‌टॉय, कॉलर !!

वैशंपायन भटजी :– [ लंगडत प्रवेश करून ] (स्वगत) कॉलरा बरा. प्लेग त्याहून चांगला ! शेजारीण ठकूचा कालच झाला काल कॉलऱ्यानें – किती सुखानं जीव सोडला तिनं ! पण नकोरे देवा हें व्याख्यानाचें अमंत्रण ! आमचा पिल्या पडला मोटारीखालीं - गेली ती त्याच्या पाठीवरून आणि बोटावरून माझ्या! ओ! यो! योयो! दुःखाच्याच ठिकाणीं लागते कीं ठेंच शिंची! कार्ट्याच्या भावी व आमच्या विद्यमान कुटुंबाचा कुंकुमप्रभाव तो म्हणूनच वांचलों दोघेंही - नसतां केव्हांची वळली होती गठडी. पडला तो चिपाड्यासारखा लांब खालीं व गेली केसालाही धक्का न लावतां मोटार वरून म्हणून कांहीं सूख मानावयाला नको – नशीब बलवत्तर आमचंच खरं कीं, जिवावर आलेलं गेलं बोटाच्या चिरडण्यावर. [ वसंतरावास पाहून ] (स्वगत) हेच वाटतं व्याख्याते ज्यांच्या व्याख्यानाला म्हणून बळी द्यावयाला रावसाहेबांनीं मला मुद्दाम बोलावलं होतं. ( उघड ) अहो ! वसंतराव वकील साहेब ! आपल्या व्याख्यानाच्या पायगुणाचा प्रभाव आधीं पंधरा मिनिटेंपूर्वींच आला आम्हा उभयतांना. नांवच वसंतराव मग काय पाहावा त्याचा प्रभाव !

वसंत० :– काय ? म्हणतां काय ? अहो ! महानुभाव !

वै०भ० :– तुम्ही वाटतं वसंतराव ? तरीच त्या नांवाचा तसा प्रभाव !

वसंत० :– प्रभाव ! काय लावलीत कावकाव ?

दिवाकर० :– ( स्वगत ) उलट दाक्षिण्यमर्यादेचाही अभाव ! खरें म्हल्यास कूजित सोडून वसंतानेंच ही लावली कावकाव !

वै० भ० :– हो ! प्रभावच खरा ! नाहीं तर काय ? कारण, वसंतापूर्वीच पिकलीं पिवळीं पानें पडावयाला पाहिजे होतीं पण वसंताचं आगमन लाभलं नाहीं म्हणूनच वांचलों कसें बसें अस्माकं आणि ...

वसंत० :– मी चाललों आहें व्याख्यानाला – पुन्हां केव्हांतरी हव्य - कव्य, सण - वार बघून या शोध ठेवून ! असल्या घाईत नाहीं मला वेळ द्यावयाला तुम्हाला मुळींच. ( स्वगत ) हुडकूं तरी कुठें पिन माझी ! ( जाऊं लागतो ).

वै०भ० :– पण खुशाल दुसऱ्यांचीं प्राणं घ्यायला; जिवं मारायला तेवढी आहे भरभक्कम फुरसत !

वसंत० :– [ जातां जातां थांबून ] मी ? आणि तुमचा प्राण ? जीव घेणार ! काय म्हणतां तरी काय ?

वै०भ० :– घेतल्यावर तर कांहींच म्हटलों नसतों - म्हणूंही शकलों नसतों – कोणीही, कसलाही अट्टल बडबड्या, बिलंदर व्याख्याता, बाष्कळ गप्पीदास, टकलीला झेंडू फोडणारा असला तरी तसलासुद्धां ब्र काढूं शकला नसता ...

वसंत० :– ( स्वगत ) चालूं द्यावी याची बडबड अशीच. मी जातों पिन शोधावयाला. ( जातो ).

वैशं० भटजी :– पण आमच्या वाडवडिलांची पुण्याई व सौभाग्यवतीचें सौभाग्यबल, स्वतःचें शुचित्व ! व या कोमल गोजिरवाण्या

६

बाळाचें मातृ-पितृछत्र ! ! आणि आयुष्याची बळकटी या पांचांनीं झगडून यमाच्या दाढेंतून - नव्हें - त्याच्या जभड्यांत एकदाच आतो माणूस उभ्या जन्मांत - पण ही यमाची माय मोटार, वैवस्वतजननी आज काल रस्त्यावर पळांत पांचवेळां पांचपन्नासास पंधरा तऱ्हेनीं भेटते. कोठपर्यंत या पायीं चालणाऱ्या गरिबांची निर्लज्ज आयुर्मर्यादा चिकाटी धरून टिकावी ? कां म्हणून यांनीं आपला कवडी किंमतीचा प्राण मोठ्याशा मोलाच्या मोटारीखालीं मुद्दाम दडपून सभेच्या चालकांचीं अमूल्य मिनिटें मोडावींत ! ! !

दिवाकर० :— अहो ! वसंतराव ! ... वसंतराव ! ... अरा या बरं बाहेर ! ऐका तरी !...

वै० भ०:— ओय ! ओय ! ओय ! काय चिंधड्या उडाल्या या भारवाही बोटांच्या ! हात् शिंच्या ! लाथा खाऊन निर्लज्जपणानंसुद्धां जगावसं वाटतं ना ? मग भोग या यांत्रिकोन्नतीच्या सैतानी कालांतील दैना !

दि०:— (स्वगत) हे भटजी बरेच कातावलेले दिसतात. कांहींतरी प्रसंग नुकताच ओढवला असावा यांच्यावर असें यांचें लंगडणें सांगतें. (उघड मोठ्यानें) अहो ! वसंतराव ! विचारा तरी या विद्वान्यांना।

वै०भ०:— कां उगीच विचारावयाला लागतां त्यांना ! आचार असेल तेथें विचार, तरच विचारण्याची सोय !! ओय ! ओय ! ओय ! मरण बरं या आपदेंतून...प्राणाचा अंत पुरवला प्राणांतिक यातनेहून ...विचार ! आलंय डोंबल—कसाचा विचार ! कसचा आचार ! ! इथून तिथून सबगोलंकार ! ! ! सारखा उपद्व्याप माजवला आहे चहूंकडे. शिंचे स्वस्थ घरीं बसूंही देईनात हरि हरी करीत ! तीनदां आला सकाळ-पासनं रावसाहेबांचा भय्या. " चलो व्यारव्यानको " म्हणून ! व्याख्या-नांत कां वाढतयं कुणी ? ना पक्वान्न - ना - दक्षिणा - ना दान, एकट्याना त्या

वक्त्याचा थैमान ! ! पण करावं काय, महिन्यांतून पांच चार अमंत्रणें असतात ना रावसाहेबांच्या येथील ! त्यांच्या व्याख्यानाचं न ऐकलं म्हणजे त्यांच्यायेथील पक्वान्नांचीं ताटंही मग मागें सरतील म्हणून त्यांची मर्जी सांभाळावी लागते ! नसतां माहीत आहे हे भ्रष्टाकाराचे मूर्तिमंत पुतळे धर्मावर काय व्याख्यान झोडणार तें ! ! साधेल तर धर्माचार करणाऱ्याचीच उलट पाठमात्र झोडणार खास...हांस ! हांस ! लेकाच्या ! ( पिल्यास ) हें कसं चटकन् कळलंरे तुला? ( स्वगत ) या पुढं व्याख्यान म्हटलं कीं पांची प्राण पळून जातील प्राण !... प्राण ! ...

पिल्या:— मायची आण ! मायची आण ! खरं ना? नाहींना जात पुन्ना कहीं? ही ! ही ! ही ! ही ही !

वैं०भ०:— लागला हसायला फिद्दी फिद्दी ! बेट्या ! वांचलास बिलंदर नशीबाचा म्हणून ! नाहींतर......

वसं०:— ( येऊन-स्वगत ) काय कटकट आहे या लेकांची— बाप लेकाची ! (उघड) हें पहा ! पुढल्याच पंधरवड्यांत आहे कायससं श्राद्ध का पक्ष—त्या वेळीं बोलावतां येईल तुम्हाला. सध्यां नको येथें तुमचा धूडगूस.

वै०भ०:— तुमचा धुडगूस चालतो सभेंतून, सार्वजनीक सर्व जागेंतून. भर रस्त्यावरसुद्धां खुशाल...गोरगरीब, गो-ब्राह्मण प्रयोजन नसतांना, अजीर्ण होऊन पोट फुगलें नसतांना, दक्षिणेच्या गर्दीत न चिरडतांना, शिवालयांतील अभिषेकपात्र शिरावर न पडतां भर्रकन् मोटार येऊन, धाडकन् धक्का देऊन, पटकन् पाडून, भुर्रकन् गेली निघून छातीवरून कीं चार पळाच्या आंत चटकन् मरून जुनीं होतात. जरा पाऊल फिरवून मागें पाठ वळली न वळली तोंच येतें वर्षश्राद्ध. लगेच पक्ष सुरूच. तुम्ही पंधरा दिवसाची गोष्ट आज बोलतां ! कोण

पाह्यलंय या मो टा र म न्वं त रां त जगांतलं जगणं – जुने रजपूत वीर युद्ध जुंपलं कीं बायकांचें कुंकू पुसून निघत बाहेर. वांचून आले तर आहेच भरलेला करंडा व कुंकवानं भरून घेणारं–छे! वीसाव्या शतकांतील भाषेंत बोलायचें म्हटलं तर सुयींच्या टोकानं उगीच स्पर्श करून घेणारं – कपाळ. फुटलंच कपाळ तर वीरपत्नी म्हणवून जिथें तिथें सन्मान घेत जगत होत्या, तर आजच्या या करालमुख मोटार-कालांत कोणी उगीच फिरायला म्हणून जरी पडला घरच्या बाहेर टोपी चढवून – तर पुन्हां कुंकू लावण्याची पाळी येते कीं नाहीं कोण सांगावं! म्हणूनच कीं काय, कोण जाणे – यजमानस्वारी पांच वाजतां पडली बाहेर कीं, घरीं बायकांचं चाललं साबणानं साकल्य मुखो-द्वार्चन! असेंही कधीं कधीं दृष्टीस पडतें कीं, फणेर आला समोर कीं, त्यांतील शस्त्रास्त्रें, आयुधें पाहून जर नांव वर काढलें असेल तरच तें वाचून मोठ्या कष्टानें "सौ.(शून्य)श्रीमती" अशीं अक्षरें स्पष्ट दिसत असतांनाही मोठ्या खेदानें आणि जबरीनें म्हणावें लागतें "सौभाग्यवती श्रीमती अमुक अमुक"...

दिवाकर०:-अहो भटजी! मी आलों आहे ऐकायला वसंतरा-वांचं व्याख्यान, आणि आपण चालवलंय येथें हरदासी आख्यान, त्यांतील कथा, आडकथा ...

वै०भ०:–हो! हो! तर बिदागीच मिळवावयाची आहे खाशी. आपल्या धर्मशूर – छे! शार्दूल – धर्मव्याघ्र – वसंतरावांकडून, तर! तर! तर!

दिवा०:–धर्म- शार्दूल? व्याघ्र? ही कुठली काढलीत अडकथें-तील आडवी कथा? ती सौ०ची आडकथातरी संपूं द्या एकदाची!

वै०भ०:–सौ च्या पुढचें गरगरीत शून्यच सांगत आहे "संपली ती कथा केव्हांची" म्हणून–नाहीं तर काय! जबरीनंच म्हणावं लागतं तसं! कारण, कोपऱ्यापर्यंत एकावर एक रंगी बेरंगी भरलेली कांकणं

पाहिलेले हे डोळे! आतां डोळे फाडफाडून पाहिलें तरी कोपऱ्यापर्यंत सहज जाणारी सैल एकच बांगडी, तीही बिचारी रुसून पोलक्याच्या कोपऱ्यांत दडलेली दिसते—वावगं असं नाहींच मी म्हणत—कारण, पुरुषांनीं जेव्हां शस्त्र, अस्त्र, हत्यार बाळगणं सोडलं, नाजुकशी छडी गरगरूं लागली त्यांच्या बोटांत...मग...मग, हत्यारें दडूं लागलीं बायकांच्या ओच्यांत! त्यांतही प्रामुख्यानें फणेऱ्यांत!! अर्थात् कंकणही झळकायला लागलं आतांशा पुरुषांच्याही हातांत!

दि०ः—तुमचें प्रत्येक विधान विचित्रच. तेव्हांचें तसें तर आतांचें हें असें! पुरुषांच्या हातांतील काकणं?

वै०भः— हो हो पुरुषाच्या हातांत कांकण? काकणं नाहींत' आतांशा कोठें एक कांकण, तेंही डाव्या हातापासून प्रघात पाडण्यास सुरवात, करीत आहे. पुढें चालून कांकणं भरण्याची, ते कायससं रिष्ट का अरिष्ट म्हणतां ना तुम्ही! त्याला आम्ही म्हणतों "कालकंकण' आणि तसेंच कोणीही मोठ्या अभिमानानं पुढें करून दाखवतोसुद्धां तें कंकण जेव्हां तेव्हां—आणि म्हणूनच त्या "सौ" च्या पुढें येऊन बसलंय भलं मोठं शून्य! आम्हा गरीब भटजींच्या नांवानें तर खुशाल चिडवतो कोणीही "वेदाच्या नांवानं शून्य! तर शास्त्राच्याही नांवानं आवळ्याएवढं. 'सं' च्या पुढील शून्यमात्र संपन्नतेच्या नांवानें अन्वर्थकत्व दाखवितें. पण तुम्हा गृहस्थांची अं हं 'स्थ' नव्हे "स्त" गृ ह स्त म्हणजे "घरांतच ज्यांचा झाला आहे अस्त" हा बहुव्रीही समास झाला, बरं का! कां? तर जे आहेत्ते महाराज! जन्मोदय बाळंत-खोलींत तर प्रभाव माजघरांत! फार फार माजला तर अस्त अंगणांत—असे 'गृहास्त' अपभ्रंशात्मक म्हणजे 'गृहस्थ' त्यांना तरी कुठें! वे शून्य-शा शून्य—संपन्नताशून्यांची एवढी चाड राहिली आहे मागच्या सारखी या मोटारीच्या कालांत म्हणून तुम्ही आम्हा वैदीकांनाच तेवढी नांवें ठेवावींत? अहो, हा मोटारीचा काल आहे—नव्हें—मोटारीनें

अकालीं होत आहे सर्वांचा सरसगट काल! हें मो टा र म न्वं त र आहे मो टा र म न्वं त र! वैमानिक भावी आपत्तींचे सूचीपत्र म्हणा पाहिजे तर! ही मो टा र म्हणजे नानाविध संकटांचा, आपत्तींचा निधि अशा वैमानिकसंकटमहाकोशाची एक छोटी प्रस्तावना होय – अरे पिल्या! काय चालविली रे गडबड तिकडे? अरे! अरे! हां! हां! तें आण इकडे आण!

पिल्या०:–नाहीं, नाहीं! मायची आण! मायची आण! देवाची शपत! मी कांहीं करीत नाहीं.

वै०भ०:–करीत नाहींस पण मरत आहेसना? नुकताच वांचलास म्हणून वाईट वाटून चालावलीस वाटतं ही नवीन चळवळ चट्कन मरावयाची–जारीनें जोराची ही दुसरी खटपट? ही कांहीं आमच्या कालांतली जुनी उतरंडी नव्हे जी पळांत पांच वेळ चढवितां व उरवितां यावी. या खुर्चीची उतरंडी रचलीस कीं बसलीच समज ती बोकांडीं...

वसंतराव०:–[बाहेर येऊन] (स्वगत) अजून चालली आहे काय वटवट या दोघांची? (उघड) अहो भटजी तुम्ही जातां?...जाऊं – शकतां? कां देऊं कोणी माणूस मदतीला? अरे! ओ बॉय! जॉन! जॉन!

पिल्या०:–मायची आण! मायची आण! देआ शपत काय मजा आहे! मजाच मजा बघा! बाबा! हें काय चमकतंय हो! चमू चमू!

वै०भ०:–थांब! आणूं का छडी आणि लगावूं छमू-छमू-छमू! उतरतोस का नाहीं खालीं, कां धरूं कान?

पिल्या०:–हां! मायची आण! मायची आण! नाहीं नाहीं देआ शपत.

वसं०:–(जॉन आल्यावर) लावून दे बाहेर ही ब्याद, कटकट, या दोघांचीही एकदाची.

वै०भ०:- अहो! अहो!...

वसं०:- एक अक्षर नाहीं यापुढं.

वै०भ०:- अरे! अरं रं रं ररर! अहो! हें तुमचं काम आहे, काम! काम!!

वसं०:- काम? पुन्हां केव्हांतरी आतां नको. एक सेकंदसुद्धां देऊं शकत नाहीं तुम्हाला...पिन! माझी पिन! व्हेअर इज् माय पिन? मस्ट हॅव्ह नाऊ गेटिंग लेट. डॅम दॅट पिन...माझी पिन!

वै०भ०:-तुम्ही काय देतां,मी काय घेतों दिसतच आहे.

वसं०:- जॉन! चलाव जलदी!

वै०:- अहो! ऐका तरी. आम्हींच तुम्हाला द्यायला लागलों. देऊं लागलोंही ... पण...

वसं०:-तें कांहीं नाहीं. मला वेळ नाहीं. चालते व्हा!

दिवा०:- दोनच मिनिटें आहेत साडेपांचाला.

वसं०:- माझी पिन माझी पिन! पिन पिन!! ओ पिन!... ओ पिन! ...

वै०भ०:- अहो! हें पहा तरी. निदान ऐका तरी काय म्हणतों आहे मी व हा पिल्या.

वसं०:- मुळींच नाहीं. खटला बिटला असेल, तर दहाच्या पुढें रात्रीं या. अमंत्रण किंवा दक्षिणेचा प्रश्न असेल, तर पुढच्या पंधरवड्यांत हें एकदा सांगितलेंच आहे! आणि धक्का पाहिजे असेल, तर आतांच्या आतां देईल पहा हा याच दारांत...चलाव यू जॉन! (जॉनकडे वळून) व्हेअर इज माय पिन?

जॉन०:- सर! पिन? सर! आय-सर-डू नो सर. व्हेअर इज सर...सर...

वै०भ०:- सर, सर! अरे! सर! जरा दूर सर. शिवशील ना? अरेच्या! द्यायला लागलों आहें तुम्हाला तें. कायसंसं तेंच तर नव्हें

हं? छे! उलट तुमचा बोटलरच देऊं लागलाय ना आम्हांला धक्का! शिवला शिंर्चा!! अब्रह्मण्य! ... अब्रह्मण्य! भ्रष्टाकार? भ्रष्टाकार! शिवायनमः! शिवायनमः! छे!, छे! लशुणाची घाण...

पि०:-मायची आण! मायची आण! देआ शपत.

दि०:- मिस्टर! जरा ऐका तरी--हे काय म्हणतात भटजी! (स्वगत) काय माणूस नादी!...

वसं०:- नो, नो नो. एक्सक्यूज. माझी पिन पाहिजे आधीं! [घाईनें जातो आंत पुन्हा शोधायला.]

दि०:- अहो भटजी! म्हणतां तरी काय तुम्ही?

वै०भ०:- हें काय शिंचें आहे त्या कारट्याच्या हातांत कोण जाणे! चमकतं खरं चम् चम् चम्! चट्दिशीं टोचून घेईल झालं कोठें तरी! नुकताच वांचला मोटारी खालून. मरेल आतां फिरून! तें टोचलें गेलें, तर रक्त येईल ना भळभळून? नकोरे देवा! जगणं या मोटारीच्या कालांत! अजून ऊर धडधडतं. हाः! हा!!

दि०:- (स्वगत) हे भटजी आज मोटारीवर फारच कातावलेले दिसतात. तेव्हांपासून मी पाहतों टकळी सारखी चालू असल्यानें, ओघा ओघानें विषयांत जरी वरचेवर बदल होत गेला तरी फिरून फिरून येतात भटजी त्याच मोटारीच्या मूळ पदावर. यावरून वाटतें कीं, नुसता अंगठा चिरडण्यावरच भटजी चरफडत नसावा. काहींतरी तसाच जबरदस्त शेक बसला असावा. (उघड) आज तर तुम्ही आल्यापासून तुमच्या तोंडांत मोटार जी घुसली सारखी अजून चालूच आहे ती तिथे?

वै०:- हो! ती एकदा चालली म्हणजे कोण चालावं तिच्या समोर! माणूस तर काय, शार्दूल, व्याघ्रेत्यादि हिंस्र-पशूसुद्धां रान सोडून ठाव मिळेल तिकडे लागले धूम ठोकायला. जुन्या कालांत होते

गुहेंत दडून शूर शिकारीच्या भीतीनं! आतां हिंस्र-पशूकरितां म्हणून शिकारीलाही वाव नाहीं. रानांत, दाट जंगलांतसुद्धां झाला आहे मज्जाव. अरण्यरोदनालाही राहिला नाहींना वाव! मग रानांतल्या जिवांचं कोण विचारतं! सांपडला एकादा बिचारा कीं आहेच त्याच्याकरितां सार्वजनिक सरकारी बागेंतला पिंजरा! वीरही आतां जंगलाच्या ऐवजीं रान समजूनच कीं काय, आजकाल शिरूं लागले धर्माच्या नांवाखालीं. मिळवूंही लागले आतांशा त्या उरल्या सुरल्या वाघ-सिंहाच्या नांवाची पदवी. अशी प्रतीतिही आजकाल पावलोपावलीं पटूं लागली आहे. फुकट फाकट शाब्दिक पदव्या तरी बहाल करण्यांत कां हृदयाचा संकोचितपणा दाखवावा. अनाठायींसुद्धां विशाल हृदयानें पदव्या बहाल होतात. दोन चार पदें गाणाऱ्याला, किरिकिट खेळणाऱ्याला, गुत्ता घेणाऱ्याला, दुकानदाराला, दलाली करणाऱ्यालासुद्धां वाटेल त्याला अशा पदव्या मिळूं लागल्या. मलासुद्धां आतांशा वाटूं लागलं आहे कीं, एक सभा भरवावी पंडित शास्त्र्यांची आणि आमचा एक आहे गरीब सात्विक असा नागोबा गवळी – सात्विक म्हणावा एवढ्याकरितां कीं, पाणी घालेना कां! पण पाण्याहून पातळ दुधाऐवजीं जरा घट्ट आम्हा ब्राह्मणांना – निदान अस्माकंला तरी – देतो. म्हणून आपणही द्यावं झालं धर्मशार्दूल किंवा धर्मव्याघ्र असली एकादी पदवी त्याला! पण कोण सांगवं आयुष्याचं या मो टा र म न्वं त रां त! धर्म या शब्दाला अर्थसुद्धां राहिला नाहींना या कालांत!!

दिवा० (स्वगत) आतांच पहा! हा भलताच विषय भाषणाच्या ओघांत निघाला होता, तरी पुन्हां आलीच मोटारीची जोडणी शेवटीं. (उघड) अहो भटजी! आहेतरी काय? कांकणाची कथा संपत आली न आली तोंच घेतली उडी मोटारींतून वैदिक व गृहस्थांवर. पुन्हा बसलां तींतच...थोडीशी चालली नाहीं तोंच घातली उडी

फिरून अन् ठोकली धूम अरण्यांत - लागलां वाघाच्या, आणि सिंहाच्या पाठीस! ते सांपडेनासे झाले म्हणून धरला आतां पदवीधारक व पदवी-दायकांना हातीं! तरी पण आधीं व शेवटीं आलीच पुन्हां मोटार ती! हें आहेतरी काय?

वै०भ०:— आहे काय! नाहीं काय! डोंबल आहे डोंबल! कपाळ!! दुर्दैव!!! आमचं, तुमचं, देशाचं, महाराष्ट्राचं, सबंध हिंदुस्थानाचं ओढवलं आहे बघा पुरं या मोटारीच्या कालांत! ही मोटार नव्हे, राक्षसीण! ...

वसं०:—( आंतून ) वॉय मोटार स्टार्ट कर रखो! आयाही मैं.

दिवाकर०:— तर मग जाणं झालं व्याख्यानहॉल मध्येंच. बरंय. पंडित मनमोहनजी सुद्धां चांगले वक्ते आहेत — तेव्हां त्यांचं प्रास्ताविक भाषणही ऐकूं. ( जातो. )

वै०भ०—अरे पिल्या! चल गड्या आपणही जाऊं - पण आधीं तें हातांतलं आण! आण.

पि०:—काय बाबा?

वै०भ०:— आपणही जाऊं. अरे हो! आधीं तें हातांतलं दे पाहूं! किंवा ठेव जिथल्या तिथं — नको — आण! आण इकडे आण, आण...!

पि०—मायची आण! मायची आण! वा:! मला सांपडली आहे ती — मग माझी झाली! ( पळतो ).

वैशं०भ० [त्याला धरावयाला म्हणून जातो.] ( जातां जातां ) अरे! नकोरे असा रस्त्यांत जाऊं पुन्हां मरायला! ( जातो ).

# प्रवेश दुसरा

जॉनः– ( स्वगत ) वाटायचं वाटूनशान्‌बी वकील बालिश-टराच्या घरामंदी राह्यलोया–मी अशी गद्धा बघा! चप्पल टाकून बूट चढवल्याचा काय गवसला फायदा? सायेबाच्या मुतपाकखान्यामंदी खायचंबी चंगळ अन्‌ कामामंदीबी कराया गवसतया टंगळ मंगळ. बुटलरवी असत्याती मायंदळ! मंग या बरामनाची चाकरी म्हंजे बगा लयी वंगाळ. त्येच्यामंदीबी बालिशटर वकील म्हंजे सबूद काढाय-चीबी सोय न्हाई. वकीलाकडे येत्याती लोक मायंदळ, त्येच्यामंदी एकादा वळकीचाबी निघतो दास्कळ, अन्‌ मला बगूनशान्‌ वाईच कर-तोय जळफळ. परवां हमच्या गांवच्या देसायाच्या कारबाऱ्यानं वळ-कला जवां अन्‌ ज्यो लागला हसडायला त्येच्या सांबोर हुबाबी न्हाव्वना बगा मला! मी म्हराटदेसचा म्हार; पन्‌ वळकूं नये कुनीबी म्हनूनशान्‌ म्हराटी योक सबूदबी परान गेलातरी काढीत न्हाई बघा–येत न्हई तरी वाकडं तिकडं उडदूच दडपून देतों इंग्रजी मिसळूनशान्‌ अशी–सायेबाच्यिथं न्हाऊनच्या न्हाऊन इंग्रजीबी पडला न्हाईस लेका!! इंग्रजी बोलताबी येत न्हाई अदूगर–मिशनमंदी लेका लिवनं पुसनं

## यशोविलास(१).

सांबोर आलं कीं करीत व्हतास टंगळ मंगळ – या वक्ताला काय त्येचं हळहळ! सायेबाचिथल्या सवद्यामंदीं पैकाबी लयी लाटाया मिळतो – किती महाग आणलं तरी सवंग म्हनतो सायेब–अन् त्येच्यापायीं कंदी कंदी इनामबी देतया – हित आल्यापासनं वकीलसाहेबाचा खाना, मोटारखाना, मुतपाकखाना, दिवाणखाना सारंच लेका! तुझ्या गळ्यामंदी – मुशारा फकस्त ईसचा पंचीस वडलाय हितं – पन काय इक्तच! वर काय हाय अमदनी? सायेबाचिथं अमदनी मिळूनच्या मिळून दिमाख मिरवता येतयं या हिंदूसांबोर देखा! आं!...जन्या लेका! फसलास बग अक्षी हित येऊनशान! अदुगरची मेरी मडम् काय अवा होती अवा! वा वाहवा! लई चालत व्हती चंगळ! अन् हितं? वळकीचा आला कीं, खालीं बगावं लागतंया [आंतून] (बॉय! जॉन! ओ जान! बॉ. आ य....) हाय, हितंच हाय! उगिच कां परान सोडतूयास! वाइच लवंडावं जरा म्हंजे लेकाचा पांच मिनिटबी हुबा न्हऊं देत न्हाई ह्यो! [जातो.]

# प्रवेश तिसरा

वसं०:-( स्वगत ) संबंध लायब्ररी पालथी उलथी केली, कुठें सांडली कोण जाणे कॉलरपिन. डॅम दॅट् पिन.

वै०भ० [पिल्याला खांद्यावर घेवून पळत येतात] ही मोटार नव्हे राक्षसीण होय राक्षसीण! लासीण, खरी खुरी लासीण! समजत-सुद्धां नाहीं या मो टा र म न्वं त रांतील माणसांना कीं, केवढी मोठी महामारी आहे ही! प्लेगोबाची माय. इन्फंजाची आई! मरीआई! झाडून साऱ्या रोगाची खाण...

पि० मायची आण! मायची आण! देआ शपत.

वै०भ० मग कशाला गेलास दुसऱ्यांदा मरायला तिथें? आण पाहूं मुठींतलं तें? [वसंतराव येऊन]

वसं०:- आलां का फिरून जीव खायला इथं? जॉन! ओ जॉन!

पि०:- मायची आण! मायची आण!...

दिवाक०:- [प्रवेश करून] मनमोहनजीनींही आणलं आपलं भाषण संपवीत...पण अजून आमच्या वसंतरावांचं ड्रेस करणं काहीं संपत नाहीं.

वै०भ०:- आमच्या सारखें पायीं चालणारे गोरगरीब, ब्राह्मण, भट या मोटारीखालीं चिरडून सारे पार संपेपर्यंत संपत नाहीं हें मो टा र म न्वं त र! हे कोण तर बारिस्टर! हे रावबहादुर, डाक्टर फाक्टर मोठे वडेलोक! मोटारी खालीं चिरडून टाकतात मात्र बिनदिक्कत, पण एखाद्या घाबरलेल्याला, अर्ध मेलेल्याला पोंचवतात काय कधीं आपल्या मोटारींतून त्याच्या घरीं? नको! नको! म्हणत असतां पुन्हा पळाला हा पिल्या रस्त्यांतून अन् आली तिकडून यमाची माय मोटार. मी तर पाहतांच पडलों थंडगार! घेतला उचलून तों आलीच

मोटार धडकून! समोरच होती एक भली मोठी गार! फार फार बुवा या सुधारणेच्या कालांतील अंधार! म्हणे झालयं ना ड्रेनीच—काय-काय नीच नीच कामं करायला लागली ही नोकरशाही नागरीक सुखां-करितां? असो. आम्हाला काय त्याचं! आम्ही मात्र एक मोटारीच्या धक्क्यानं तरी मरावं किंवा गारींत खितपत पडावं! कुणाला समजावं या गर्दींत कोण आंत पडला म्हणून! वर एकदा बसवलं झांकण डोळे झांकून कीं कोण बघूं लागलायं आंत डोकावून फिरून! केवढीही कसलीही दाटादाटी असो मोटार पाहिली कीं, आधीं "जाव" तिला आणि इतर सर्व गाड्या बग्ग्यांना तेवढा तत्काल 'मज्जाव',! सग-ळ्यांना कसली हो घाई? तसाच अत्यवस्थ रोगी जर असला तरच डाक्टरानं जावं तेवढ्या वेगानं पाहिजे तर किंवा आगीचं बंब!! तेंव्हां-पुरते राहवेत उभे गर्दी सरेतों बाकीचे अगडबंब!!

दिवाकर०:—केलं काय तुमचं एवढं या मोटारीनं! बोट चिरडलं एवढंच ना.?

वै०भ० अहो! सगळं हिंदुस्थान चिरडलं जाऊं लागलं या मोटारीच्या पायीं. सारा देश मिळाला धुळीला! तरी ही जाते सारखी धूळ उडवीत रस्ताभर शंभरदां.

दि०:-कसं-कसं? काय मिळालं धुळीला? सांगा बरं तर! आज हेंच व्याख्यान.

पि०:—मायची आण! मायची आण!

वै०भ०:—चुप शिंचा! पांढऱ्या पायाचा-देईन मुसकाटींत ठेवून. (थंतास) सांगा म्हणजे? सांगूं? एक सांगूं, दहा सांगूं का शंभर-हजार सांगूं उदाहरणं अहो! पावलोपावलीं रस्त्यांतून पटापट जिच्या खालीं मुंग्यासारखीं माणसं मरतात तिथं बिच्याऱ्या घोडे, बैल इत्यादि मूक जनावरांचं कोण विचारतो या मो टा र मन्वंतरांत!

दि०:–मुंग्यासारखीं माणसं? माणूस म्हणतां म्हणतां जनावरंही म्हणूं लागलां! लगेच आतां कीटकही...

वै०अ०:– लाख पटीनं बरीं जनावरें तीं अजून! दिलं हाकलून एकदा कीं, फिरून येत नाहींत तरफडायला सडकेवर; पण माणूस पहा! निर्लज्जपणानं मेला तरी तरफडतोच मोटारीखालीं, देतोच बळी या महाकालीला, देवा! कधीरे डोळे उघडतील यांचे–आणि कळूं लागेल यांना आपळं हित, अहित!

दि०:– ( स्वगत ) खरंच विचारांतीं आढळून येतें कीं, यांत्रिक-सामर्थ्यावरच आजकाल आमचें जीवित्व अवलंबून आहे. घरांतील प्रत्येक वस्तूचें जनकत्व यंत्राकडेच आहे. जुन्या कारागिरांनीं तयार केलेल्या वस्तूंच्या मानानें पाहतां आतांच्या या यांत्रिक साह्यानें अस्तित्वांत आलेली वस्तू पैशाच्या कमी मोबदल्यानीं मिळते असें वाटतें. ती टिकाऊपणांत व किंमतींत जास्त होती, तर ही दिसण्यांत सुंदर व मोहक जास्त! पैशाबरोबर वेळेचाही पण बचाव करते, दृष्टीस आल्हाददायक व सोयीची वाटते. म्हणूनतर काल भुरळ पाडतो! या योगानें तर खेळण्यापासून तों मोटारीपर्यंत यांत्रिक वस्तु, म्हटली कीं गळ्याचा ताईत होऊन बसते. वस्तूंतील सौकर्याच्या दृष्टीनें वर वर वाटतो फायदा! पण तीमुळें गरजेची तृष्णा जी पला पलानें वाढत पुढें पुढें तर ती पावलोपावलीं नडवायला लावते यावरून सूक्ष्म विचार केला, तर पैशाचा फायदा, व सोयी हें आमचें म्हणणें टिकाऊ-पणाच्या दृष्टीनें फोल ठरतें. वेळेचा बचाव म्हणावें तर आधीं काटे-तोल वेळेचा व्यय अंगवळणी पडला पाहिजे. त्यांतही तात्विकदृष्ट्या पाहूं गेल्यास निसर्गानें कार्यांची जी एक गति ठरवून ठेविली आहे तदनुसार वर्तनच मानवी जीविताला श्रेयस्कर होतें. मोटार विमाना-सारख्या तीव्रगतिक यंत्रसाह्यानें वेळेचा बचाव करूं लागलों तर

तीव्रगतीनें ध्येयस्थानाचें अंतर जसेंजसें लवकर छाटले गेलेलें दिसून येतें त्या मानानें ठरावीक हिशेबाच्या परिपूर्ततेंतही मग निसर्गाला मानवी आयुर्मर्यादेंतही छाटाछाटी करावी लागते. वरवर पाहणाऱ्यास मोटारींतील माणूस स्वस्थ बसलासा दिसतो खरा; पण यांत्रिक गतीच्या मानानें शास्त्रीयदृष्ट्या रुधिराभिसरण इत्यादि शारीरिक आंतरक्रिया त्याच वेगानें चालू असतात. अर्थात् वेगाच्या मानानें आयुष्यांत फरक झालाच पाहिजे. द्रव्यदृष्ट्या पाहूं गेल्यासही वाढत्या गरजांच्या मानानें आर्थिक हानीसुद्धां वाढतच असते—हें अलीकडे बोकाळलेल्या मो टा र-म न्वं त रा च्या सहज सिंहावलोकनावरून स्पष्ट दिसून येईल. ( उघड ) अहो! भटजी! विचारूं का एक तुम्हाला? पण, कसला चाललाय एवढा गहन विचार?

वै०भ०:— विचार? कसचा आलायं डोंबल! ते तिकडे दूर हजारों कोसांवर बसून पिळून काढताहेत इकडील झाडून सारे एकूणएक गोड गोड ऊस—आणि हे खुळे नवें नवें यंत्र पाहूनच खूश! ते होताहेत वरचेवर गब्बर आणि हे आधींचे धडधाकट—पण आतांचे चरकांतून निघालेले पांढरे फिक्क सोपट—उलट धोपटायला लागतात आपल्याच जातीला, आश्रितांना, गो-ब्राह्मणांना, ब्राह्मणही इतका निःसत्व कसा झाला कोण जाणें या मोटारीच्या कालांत कीं, कितीही संतापला—शापांचा वर्षाव केला तरी पाण्यांत फेकलेल्या फटाकड्या प्रमाणें बोध. ओं फुस्स होतात. त्या मोटारवाल्यांचं शाप मात्र श्रीमंतांना चांगलं भोंवतं—पुन्हा वर गोडही वाटतं! घोडे गेले, बैल कुचकामी झाले, पागा ओस पडल्या. मग मोतद्दार कोठला? घोडे मेले मग बग्या कोठल्या? गाड्या गेल्या गंगोत्रीला—चणे अजून पिकतात शेतांत—तोबरेही जसेचे तसे लटकलेले आहेत तबेल्यांत—फक्त घोड्यांचामात्र पत्ता नाहीं!! बाकी त्यांच्या चण्याच्या चंदीच्या चौपट खाऊन फस्त करतो म्हणा तो—तो कोण! पेट्रोलसाहेब ना? म्हणे—घोडा फुर्र केला कीं, जिरलं सारं दिवसभर

चरल्याचं, पुन्हा जशी नव्यानें तयारी सुरू करण्याची तस्संच एकदा गर्रर म्हणून मोटार फिरली कीं, चौपट चंदी खाक झालीच चट्दिशिं. तेवढे कोरडे पडले आहेत धूळ खात विचारे. फक्त बैल आणि घोड्यांना तेवढा मज्जाव आहे – हा आहे शापाचा प्रभाव! त्या पेट्रोलसाहेबाच्या शापाचा प्रभाव!! तो कोण फोरड – का कोरड – उगीच उतरंडीच्या घरांतनं आमची ही ओरडा ओरड – रडा रड! – पण त्याच्या मोटारींचे शाप एवढे मोठे मोठे आहेत म्हणे कीं, त्याच्या शाखा शहरोंशहरांत म्हणे पसरल्या आहेत! काय मंत्र त्याला ठाऊक आहे देव जाणे! जिथ्थं तिथ्थं त्याचा शाप जोरांत चालतो. लगेच एवढसं जरा गजबजतं गांव झालं कीं, त्याला बघवत नाहीं तें – बिन अपराध बसलं शापाचं कायमचं ठाणं – आणि लागलं भोंवायला सगळ्याला. ब्राह्मणाचा शाप म्हणजे एकाकाळीं सुरुंगाची दारू होती दारू!! पण ती आतां भिजली, बोध झाली आणि आमच्या सारखे ब्राह्मण त्याच मागील तोऱ्यांत जातात करायला बोध – आणि प्रत्यक्ष भोंवतात शाप या शापवाल्यांचे!

दिवाकर – (स्वगत) हो! खरंच! एक मोटार विकत घ्यायची झाली; तर तिची जी जब्बर किंमत द्यावी लागते तिच्या नुसत्या व्याजावर दोन घोड्यांची चंदी चालू शकेल ... त्या दोन घोड्या करितां दोन साईस व एक कोचमन् या तीन माणसांचं पोट व त्यांच्या पोटांत आणखी ३, ३ — ४, ४ माणसं जगतात तें निराळेंच. मोटारींत पेट्रोल जाळून परदेशी पेट्रोलरूपी अग्नीला ... नव्हें ... वणव्याला आम्ही रक्त आटवून मिळविलेल्या संपत्तीची आहुती देणें म्हणजे काय म्हणावं आमच्या या यांत्रिक सुधारणेला चटावलेल्या शाहण्यांना? आपल्या देशांतील मुक्या जनांवराच्या तळमळणाऱ्या जठराग्नीला तृप्त केलं तर पुण्याचें व एका अंशीं सत्पात्रीं दान केल्याचें फल तरी पदरीं पडतं. गाय, बैल, घोडा घरीं राहील तरच ना गृहस्थाश्रम

सार्थ म्हणवेल! गायीच्या दुधानं शरीराचें रक्षण, बैलाच्या राबण्यानं शेताचं संवर्धन व घोड्याच्या गाडीमुळें १२, १५ माणसांचं पोषण ही पुण्याची चढती पायरी मोडून मो टा र म न्वं त रांतील मोटार गॅरेजच्या खालील गर्तेत गडप होत चाललयं आमच शाहणपण! यांत्रिक साह्यानें कामें सारण्याच्या निसर्गविरुद्ध संवयीमुळें – शारीरिक हालचालीला कमी वाव मिळतो. तितकंच योग्य मंथन कमी झाल्यामुळं शक्तीची वाढ होण्या ऐवजीं मेदवृद्धि होत जाऊन आवश्यक मंथन, प्रसरण, रक्ताभिसरण कमी कमी होत गेल्यानें कमकुवत माणसांचीच अधिक भरती जगांत निदान आमच्या देशांत तरी चालली आहे. काहीं तसलीं माणसें नैसर्गिक शक्तीच्या अभावीं विशिष्ट पेयाच्या अथवा खाद्याच्या सेवनानें कृत्रिम उसने सामर्थ्य अंगीं आणतात – पण तें क्षणिक तात्पुरतें असतें इतकेंच नव्हें, तर मुख्यत: आयुष्याच्या ऱ्हासाला कारणीभूत होतें. या मो टा र म न्वं त रांतील मोटारीच्या राक्षसी वाहक – शक्तीच्या योगानें वेळेचा मात्र बचाव झाल्या सारखं क्षणभर वाटतें; पण खोल विचारांतीं वरच्यावर आयुष्य संपुष्टांत येत चाललें आहे असें कळून आल्याखेरीज राहाणार नाहीं. ( उघड ) आहो! भटजी महाराज! विचारूं का तुम्हाला एक ?

वै०भ०:– हो - हो - खुशाल!

दिवाकर०:– म्हणजे असें – मला वाटतें कीं, नुसत्या बोटाच्या चिरडण्यावरच तुम्हीं कांहीं मोटारीवर चरफडत नाहींत इतकें – कांहींतरी दुसरी मोठी हानी – द्रव्याची म्हणा – जिवाची म्हणा झाली असावी.

वै०भ०:– ( चमकून ) आपण कोणी ज्योतिषी तर नाहींत ? छे! छे! आपण तर गृहस्थ – तेही विद्वान्! पुढें आलेले – तरी पण शोका खातर म्हणून तरी आपण त्या शास्त्राचा उत्तम, सांगोपांग अभ्यास केला आहां असं वाटतं.अहो! किती वर्षापासनं- तप होत आलं एक– खोल

हृदयांत दडवून ठेविलेली गोष्ट आपण ताडलीत ! मग सांगतोंच आपल्याला. हे पहा रावसाहेब ! नव्हें — पंत ! मी आतां दिसतों गरीब; पण हजारोंच्या संख्येनं व्याज, सट्टा, बट्टा करणारा इतका धन — कनकसंपन्न — पण या मोटारीच्या पायीं पहा भणंग भिकारी झालों. पुरा पुरा नागवलों — मोटार भाड्यानं चालविण्यांत भयंकर फायदा दोघां चौघांना झालेला पाहून चार चार हजाराच्या दोन मोटारी मागवल्या. पुरत्या डोळ्यांनीं पाहिल्यासुद्धां नाहींत हो ! त्या — वाटेंतच येतां येतां या वैवस्वतजननी मोटारीचीही जी आई — सगळ्या यांत्रिक राक्षसिणींना ज्याच्या त्याच्या घरांत नेऊन नांदवावयाला लावणारी — झाडून साऱ्या संकटांची माय माउली म्हणजे जी " रेल " तिची टक्कर होऊन तोच तेवढा डबा पडला पुलावरन पाण्यांत ! सारा पैकाही पण बुडाला पाण्याच्या तळांत ! उरलें सुरलेलें दान दक्षिणेचें द्रव्य कंपनीच्या कचेरींत खेट्या घालण्यांत फस्त झालें व झालेलें कर्ज वारण्यांत शेतें विकलीं, घर दार गेलें ... घर? हा: ! ( स्वगत ) अरे वैशंपायना ! कशाला जगलास आपदा भोगायला ! ( उघड ) हो — घर विकलं, दार विकलं, माझ्या दारांत खेटे घालणाऱ्यांच्या दारांत दांत वेंगाडून हात पसरण्याची पाळी आली, तीही आपत्ति सट्कन् गिळिली — पण काय सांगूं पंत ! — माझी दारा ... दारा ! या अभाग्याची प्रथम पत्नि एकदम कोसळलेल्या या अकल्पनीय दारिद्र्यानं झुरणीस लागून ४, ६ महिन्यांत स्वर्ग गाठला तिनं — बायको कसली एक रत्न होतं रत्न —नशिबाला काय यत्न ! असो. सात पिढ्या काढलेल्या गांवावर " परदेशी भीक बरी " या न्यायें दिली तिलांजली - आणि या परगांवीं येऊन दुसरी केली या उत्तरार्धजीवनांतील सहधर्मचारिणी — तीही घरभरणीच्या दुसऱ्या दिवशींच मोटारीखालीं सांपडून जन्माची झाली आहे लंगडी आणि लुली ! डावा हात जरा बचावला तेवढ्यावर फरफटत वागते आहे

कशी तरी घरांतल्या घरांत. जगवतो हरी म्हणून जगतों कसें तरी! स्वयंपाक करावा लागल्यास स्वयं-या हातांनीं-करावा लागतो पंत! तुम्हा गृहस्थांची संकटें मात्र तुम्हीच सोसूं जाणें ...आमचं काय सोडा! कसल्याही आपत्तिकूपांत आम्ही सांपडलों तरी दान दक्षिणेचा जिवंत झरा चालवतो आमचा योग क्षेम. मी आणि या पांढऱ्या पायाच्या पिल्लंभट्टाची जननी जगतों झालें कसें तरी - आहे हरी — आहे चालवणारा योगक्षेम! योग! क्षेम!! पण घरीं बसें पर्यंतच शरीराशीं प्राणाचा योग व था मो टा र म न्वं त रांत जीवित्वाचं क्षेम! जरा बाहेर पडलं कीं घरीं येईपर्यंत जगण्याची आशा? जेम तेम!!

वसंत०:- (येऊन) केव्हांपासनं चालला आहे माझ्या पिनचा शोध; पण नाहीं सांपडत अजून.

दि०:- एवढ्याशा पिनचं काय घेऊन बसलां व्याख्यानाच्या महत्त्वासमोर? अहो! मनमोहनजींनीं...

वसं०:- तीही तशीच-त्याच्याहूनही अधिक महत्त्वाची आहे...

दि०:- म्हणजे?

वसं०:- ती मला मिळाली आहे प्रेझेंट परवांच्या परिषदांत हर एक्सलेन्सी कडून, आणि आजच्या व्याख्यानांत तिचा करावयाचं आहे उल्लेख.

दि०:- आजचा विषय तर धर्म?

वसं०:- छे! फारच बुवा तुम्ही...अगदीं...जुने...अगदीं... अगदींच हिंदू! (घड्याळाकडे पाहून) ओ! हो! हो हो १५ मिनिटें अधिक गेलीं व्यर्थ... (वै०भ० कडे पाहून)... अरे। ही ब्याद अजून एथेंच? बॉय! माझी बॅग ठेविली काय मोटारींत! डियर दिवाकर! एक्स्क्यूज फॉर ट्रूबल ... आपणही शोधा बरं जरा!

तेवढीच मदत होईल...इथें...हो...इथेंच होती...कोठीशी ती!–...

वैशं०भ०:– कां उगीच शोधतां ? हेंच मी केव्हांपासनं त्वंपुरा सागरो...अरे पिल्या! आण!... आण इकडें तें...आण...आण!....

पि०:– नाई...नाई...मायची आण... देवाशपत......

वैसं०:– काय लोचटपणा हा!– बॉय ... आधीं आतांच्या आतां यांना घालवं पाहूं! [रावसाहेबांचा भय्या येतो.]

भय्या:– मालकसाब बैठा है. पंडित मनमोहनजीका भी व्याख्यान भया, आपको तुरंत बुलाया है.

वसं०:– पिन सांपडली तरच सर्व कांहीं ऐकेन – नाहीं तर राह्यलं सारं.

दि०:– मग व्याख्यान?

वसं०:– व्याख्यान राह्यलं तरीही हरकत नाहीं.– आधीं या कट-कटीची जोडी काढवितो – पण यू जॉन!– जॉन!– ब्रूट!– क्या देखता है? भय्याजी! इन् दोनोंको जरा तुमतो भी बाहेर करदो...

भय्या०:– मालकसाबनें तो आद घंटा पीस्तर इन्हें बुलाय लाने कहा था...इसी मू से मैं बुलाया और इनही हातोंसे भीतर करूं? नहीं भय्या!... ऐसा कभू ना होसकेगा. ये तो रावसाहेबका भय्या है. राव-साहेबको चहे तो पूछी आऊं?

वसं०:– नहीं नहीं तुम जाव! रावसाहेबको कहो:–'आउंगा मैं अगर आसका.'

भय्या०:– जैसी इच्छा. (जातो).

वसं०:– ओ बॉय...जॉन... ब्लडी! ब्रूट!– आर यू नॉट माय सर्व्हंट? फिर निकालो ये दोनोंको! अभी निकालो!

जान०:– साब! टंग संबालो! माई मायसेल्फ सर्व्हंट नइ उये–यू बुलाया–सर्व्हंट उवाबी तो अब नाय करेंगा सर्व्हिस! आफ्टर



थिस ! ! 'ब्लडी, ब्रूट' किस्को बोलता है? मायको मॅडम भेजे हाई. ये उन्का इन्सल्ट हाइ — इन्सल्ट !—माइ कव्वीकु नाय आइंगा ऑफ-ट्र थिस. माय चले. हव्वी चले. ( स्वगत ) लेका जन्या ! तुला बड-तीचं सूक फायचं हाय ना ? सर्टिफिकिट बिगर मॅडम वया तुस्नी पायऱ्या नजीक तरी हुवा न्हाउ देईल ? अन् ह्यो बरामन देइल व्हय सर्टिफिकिट ? दिलाय नव्ह का — "ब्लडी — ब्रूट "— गवसली चाकरी फिरूनशान् तर मग व्हइलबी बग छान— न्हाइतर हायच हुत्रा हमास्नी ध्यायला पदरामंदीं श्रृद्धानंदी सबा !—ठरलं त्ये ठरलं— व्हईल त्ये व्हईल ... ! ! ( जाऊं लागतो. )

वसं०:— ओ ! नो नो...मिस्टर जॉन— पार्डन् मी.

जॉन०: ( स्वगत ) एक सबूदबी ऐकत न्हाइ मी — ( जातो.)

वसं०:— पार्डन् मी !. प्रे !. आय नेल्ट डाऊन — एक्स्क्यूज् माय जॉन् — माय ब्रदर !— फॉदर !— एक्स्क्यूज माय फॉल्ट्स — वेग पार्डन् — डोंट लीव्ह मी माय गुड बॉय !— जॉन !— ब्रदर !— फॉदर !—सर !

दि०: - अहो वसंतराव !. जाऊं द्या गेला तर — गेला शेवटीं जातीवर — काय ! त्याच्या पायां काय पडतां ! गुडघे काय टेंकतां ! — त्याच्या समोर ! । तो ढुंकूनही पाहीना....

वसं०:— नाहीं हो !. तुम्हाला ठाऊक नाहीं — तो थोरांचा हस्तक — मॅडम स्ट्रॉंगचा सिलेक्टेड् आहे. — पेट् आहे — आणि माझ्याही पण काळजाचा तुकडा आहे. [ तो गेला त्या मार्गानें जातो .]

दिवाकर०:— हाय ! हाय ! आपण होऊन आलेल्या, इच्छित देणाऱ्या कामधेनूवर काठी व म्हशी सदृश काऊच्या लागला आहे पाठीं ! आणि चालला आहे उघड्या पायांनीं भर रस्त्यावर हा शाहाणा ! काय हें परस्पर विसदृश चित्र ! ! आमच्या आजकालच्या सुशिक्षित

समाजाचें! 'हे आ म चे ध र्मो प दे श क!' – धुरीण, पुढारी, शाहाणे! – यांच्या व्याख्यानास म्हणून निघालों होतों ते आम्हीही पण दीड-शाहाणे!!—चला वैशंपायनभटजी !– आपण सर्वच मिळून जाऊं. "हे आमचे ध र्मो प दे श क !" – परमेश्वरा! बुद्धीचा दाता तूं, दे कांहीं सद्बुद्धि अशाच वेळेला!! तरच देशाची धडगत!

वैशं. भ. – चला तर मग. पण पाहा! फारच जपून चला चोहींकडे सारखी दृष्टि ठेवून पाऊल उचला!! हें आहे "मो टा र-म न्वं त र!" मो टा र म न्वं त र!!

[ सर्वच जातात ].

प्रभुदरबार. शालीबंडा, हैद्रा. द.
श्रा. शु. १३/५१ रविवार.



(६)

# "परोपकारप्रकार."

## [प्रहसन.]

### प्रवेश १ ला.

स्थल—मार्ग. मि० भास्कर व प्रभाकरपंत, आणि वैकुंठशास्त्री.

मि०भास्कर — डियर प्रभाकर! इंग्लंडहून येथें आल्यापासून पाहातों तों कोणी इंग्लंडरिटर्न्डची चेष्टा करण्यांत व बसल्याठिकाणीं माशा मारणेंच महत्कार्य समजण्यांत दंग दिसतो. फार फार झालें, तर धर्माची कथ्याकूट कोठेंही ऐकूं येते. जेथें तेथें धर्मचर्चा! घरीं, दारीं सभेंत, पुराणांत. प्रवचनांत व्याख्यानांत किंवा दैनिक, साप्ताहिक, मासिक इत्यादिकांतही सारखी धर्माचीच ओरडाओरड!! ऑल बॉश... ज्यांना ज्यांना म्हणून पाहावें ते सर्व स्वतःपुरतेंच पाहणारे, तुमचे लीडर झाले तरी हिंदू! निव्वळ हिंदू!! ज्यांना स्वतःचा स्वार्थसुद्धां साधतां येत नाही. तसले **परोपकारप्रकार** काय करणार?

**पद.**

चाल - आद्या सुर-दमना शंकरा (किंचित् फरक करून.)

राग—मालकंस. ताल—त्रिताल.

**स्थायी.**

**परोपकाराची शोभा या ॥ देहमंदिरातें शोभाया ॥ ध्रु० ॥**

**अंतर.**

**कर्मजन्य-भोगहि संपाया ॥ फलत्याग भरभक्कम पाया ॥१॥**
**चिरंजीव सेवक तो व्हावा । हेतु हाच संतत राखावा ॥२॥**
**चिरस्थायि ऐशी जनसेवा । शिका करा मग जनास शिकवा ॥३॥**

एकादा जन्टल्मन् सुधारणेला भूषण समजतो, तर दुसरा शाहाणा त्याला दूषण देतो व जुन्यालाच चिकटून बसतो—डॅम दॅट् नॉन्सेन्स.

प्रभाकर — "नवें तें हवें" म्हणणाऱ्याइतकेच 'जुनें तें सोनें' गणणारेही आहेत आमच्या जनतेंत. राहणारही पण असेच कोणत्याही कालांत. जगांतला कारखाना असाच अव्याहत चालू राहणार. जुन्या लोकांनीं अनुभवलेली सुसंपन्नता — तेव्हांची परिस्थिति निराळी म्हणून त्यांची आवडही निराळीच असणार. तें भाग्य वरचेवर खालावत चाललेल्या आम्हा तरुणांच्या नशीबीं कोठून !

**पद...**चाल — कैसी निकसी चांदनी.

राग - बहार. **स्थायी.** ताल - त्रिताल.

**विश्वाकरितां सर्व हवें ॥ यश एकाचें कांधिंहि नव्हें ॥ध्रु०॥**

**अंतर.**

**सर्व जुनें कांहीं न नवें ॥ संपादक कैसा म्हणवे ? ॥ १ ॥**
**गतायुच्या उपचारासीं ॥ व्यर्थाचि मात्रांच्या राशी ॥ २ ॥**

**सोडुनि या अविचाराशी ॥ साह्य करा जगणाऱ्याशीं ॥ ३ ॥**
**शक्य तेंच घडतें हातें ॥ संस्कृति नच कीं देहातें ॥ ४ ॥**
**बुद्धि पोंचवी ध्येयातें ॥ शक्याधिकही दे यातें ॥ ५ ॥**

हें मतवैचित्र्य, स्वभाववैचित्र्य कोठेंही सारख्या प्रमाणांत आढळून येणार.

वैकुंठ शास्त्री – बरोबर आहे तुमचें म्हणणें. असा विरोध जगाच्या अंतापर्यंत असाच राहाणार आणि अशांतच आहे मजा. धर्माची सुद्धां नाहीं का अशीच होते ओढाताण आजकालच्या आमच्या समाजांत? एक शुचित्व व पावित्र्यालाच देतो महत्त्व, तर दुसरा शुद्धि-संघटनेलाच कैवल्य समजतो. समजो बिचारा! अशानें कांहीं खरें शुचित्व प्राप्त होत नाहीं व तशानें कांहीं असलेलें जात नाहीं! कोणी 'हिंदु' म्हटलं कीं "मेंढरं" म्हणतात. असो. म्हणूं द्या खुशाल! श्रेष्ठ वर्णाचें दुर्लक्ष्य म्हणून गेलेलीं कांहीं मेंढरें पुनश्च आपल्या कळपांत ओढून वळवून घेण्यानें फायदाच आहे तितका – नुकसान तर नाहींना? ठेवीनात बिचारे नांवें कोणी! धर्माची वृद्धि – नसो – निदानीं रक्षण कुणाही मतांना केव्हांही अभिमत असणार. [कैलासदीक्षित येतां येतां शेवटलें वाक्य ऐकून]

कैलास दीक्षित – भ्रष्टाकार! भ्रष्टाकार! सब गोलंकार!! शास्त्री-सुद्धां असें म्हणूं लागले म्हणून तर हाच आजकालचा होऊन बसला आहे जीवनाधार!

वै०शा० – कोण? कैलास दीक्षित! आपणही याच वेळेला कसें इकडे?

कै०दी० – अहो वैकुंठशास्त्री! आपणही आधींच ज्या अर्थी आहां येथें मग कशाला सांगायला हवं कोठें चाललों आम्ही! सांगा बरं पाहूं तुमची कल्पना काय होते ती?

वै०शा० – नैयायिकांची अनुमानप्रमाणसिद्धि अशी निष्पत्ति करवते कीं, प्रत्येकाचीं सदनें निनिराळीं कां असेनात – एकाच विवक्षित-वेळीं ज्याअर्थीं एकाच दिशेकडे भास्कर सा० प्रभाकरपंत, अहं स्वयमेव आणि आपल्यासारखे महानुभावही घरच्या इतर आनुषंगिकांना, आप्तेष्टांना विरहावस्थेचा पाठ सांगून घराकडे पाठ व या विवक्षित स्थलाकडे सन्मुखत्व साधतात त्याअर्थीं जिकडे आम्ही त्रैमूर्ति तिकडेच ही मूर्तिमान् वेदमूर्ति चालली असावी हें खात्रीच्या स्वरूपांत परिणत होत चाललेलें आमुचें अनुमान आहे. होय ना? पण एक शंका अशी उद्भवते कीं, आपण दीक्षित हें जितकें खरें तितकेंच ही संध्येची वेळ असून त्याच ठराविक वेळेला व ठराविक दिशेनें आपण कसें काय बुवा इथें?…

कै०दी० – आपलें अनुमान सत्य आहे. मुद्दाम याच वेळीं बाहेर निघायचें सर्वांनीं म्हणजे सर्वांचें ध्येय एकच असावें. हें निश्चितच! मग शंका जी उद्भवली अपल्यास … आपणही शास्त्री अहांत – मग आपल्या संध्येविषयींही तीच शंका लागू होण्यांत काय आणि किमर्थ संदेह?

वै०शा० – आमचं सोडा! वाटेल त्या अशास्त्रवर्तननिष्कृतीस्तव शास्त्रदृष्ट्या सहज सोडवणूक त्याच शास्त्रांतून मिळवतां येंत आम्हाला. आम्ही मिळवून घेतों मोकळीक कोणत्याही परिस्थितीतून; पण आपल्या-संबंधीं मात्र जेथें आचारच प्रत्यक्ष प्रमाण तेथें आमचा अनुमान कांहीं पाडीत नाहीं बुवा प्रभाव!

प्रभाकर०:– [मि. भास्करच्या रिस्टवॉच मध्यें पाहून] अहो १० मिनिटें उरलीं व्याख्यानाला… उगीच काय रेंगाळत बसलों आम्ही.

भास्कर :— मला रावबहादुरांनीं मुद्दाम स्पेशल चिठ्ठी पाठवली म्हणून जावं लागतं आहे एवढंच. बाकी व्याख्यान—विषयावरून पाहतां....

प्रभाकर :— मलाही पण त्यांचा निरोप आला आहे, थोरा-मोठ्यांचं म्हणणं ऐकलंच पाहिजे. सर्वस्वी व्याख्यान ऐकावयाला म्हणून मुद्दाम आवडीनं निघणारीं माणसं क्वचितच असें मला वाटतें......

भास्कर :— शिवाय व्याख्यानाचा विषय तोच तो! ड्याम ड्राय, "धार्मिकोन्नति" फार झालें तर राष्ट्रीय कार्यसिद्धतेस धर्माची अत्यंता-वश्यकता - ड्याम, नॉन्सेन्स! तरी पण आजच्या व्याख्यानांत संध्येची 'सायंटिफिक मीमांसा' हा जो पोटविषय दर्शविला आहे तो जरा ऑडियन्सला आपल्याकडे ओढीत आहे म्हणून जावें वाटतें. नसतां धर्मोन्नति, सनातनधर्म, धर्माची आवश्यकता याची केंव्हाही कोणत्याही व्याख्यानांतून आहेच ठराविक हजरी हिंदु-आचाराची विचाराची आमची, तुमची सरसगट एकाच काठीनें झोडपण्याची तऱ्हा! घरांतून निघाल्या पासनं सभेंत पोंहचेपर्यंत सुद्धां नाहीं उसंत! जुन्या नव्यांची पूर्वांग उत्तरांग षष्ठि करीत असतांना सहज साधत असलेला हास्य-परिपोष व्याख्याते, पुराणिक, हरिदास खुलवून करीत असतातच.

वै०शा०— हो हो खरंच!

भास्कर०— अशी चेष्टा आणि धर्माचा ऊहापोह — उपद्व्याप म्हणा लागल्यास — छोट्या छोट्या सभेपासून तो महासभेपर्यंत....

प्रभा०— चार चौघांच्या गप्पा - सप्पापासून तों प्रसिद्ध वक्त्याच्या व्याख्यानापर्यंत...

वै०शा०— देवघरापासून तों चव्हाट्यापर्यंत...

कै०दी०— उतरंडीच्या कोन्या कोपऱ्यापासून तों कन्याकुमारी-पर्यंत...

वै०शा०– भले शाबास ! चिमाबाईच्या चुलीपासून चमकशास्त्र्यांच्या चंचीपर्यंत —

कै०दी०– एवढंच कां ? आमच्या शामभट्टाच्या तबेल्यापासून तों इंद्राच्या पीलखान्या पर्यंत...

वै०शा०व कै०शा०– पसरला आहे.

प्रभाकर:– हो, झालं तर आहे असंच !

प्रभाकर०– मग काय नाहींतर ! ही सर्व वडबड, गडबड, ओरडा ओरड व्यर्थ आहे व्यर्थ. एकालाही खरी नाहीं तळमळ.

प्रभाकर — या योगानें उगीच जीवाची मात्र जळफळ.

वै० शा० – कुण्या बेऱ्याला आहे कळकळ.

कै० दी० – नारायण ! नारायण !! कोण ही माझ्या मनांतली मळमळ !

वै शा० – मळमळ ? कसली हो ही फळफळ ?

कै० दी० – संध्येचा काल नसून व्याख्यानाकरितां त्याची उडविलेली तारंबळ.

वै० शा० – हो. खरंच ! मलाही मोठं आश्चर्य वाटत होतं.. तसंच बोलूनही दाखवलं होतं मी आधीं .. संध्येची वेळ झाली असतांना तुम्ही अट्टल संध्याबाज आणि या वेळीं इकडे कसें ? कशी काय लावली व्यवस्था तिची ? अहो ! तुमचं अग्निहोत्र राह्यलं कांहीं अपरिहार्य अडचणीमुळें, किंवा आवश्यक प्रवासामुळें तरी चालवूं शकते दीक्षितपत्नि, पण संध्येची सुद्धां तशी देतां येतें का वरणी ?

कै० दी०-जसं जन्मावं लागतं ज्याला – एक जन्मसाफल्य तरी, नाहींतर मरावं लागतं त्यालाच - तसेंच संध्येचें आहे. ज्याची त्यालाच सारावी लागते ती ! पण तुम्ही कसं काय केलं हें सांगा बरं आधीं ? मग मी सांगेन माझ्या संध्येची लावलेली व्यवस्था.

वै० शा० – अहो ! अशास्त्रीय प्रकारच्या परिमार्जनेबद्दल एकादं अनुकूल शास्त्र काढणं आम्हा शास्त्र्यांच्या हाताचा मळ आहे तो. आम्हाला बारा वाटा मोकळ्या आहेत. वाटेल त्या अशास्त्र वर्तनांतून सपशेल सोडवणूकसुद्धां सहजसाध्य आहे आम्हा शास्त्र्यांना. ब्रह्मकर्म संरक्षणार्थ धर्मनिरतांवर धर्मशास्त्राचा केवढा मोठा हा **परोपकार** !

कै० दी० – कशी काय ती खुबी ? तें ऐकवाच एकदा. माझ्या म्हणण्याचें तेंच होय धोरण.

वै० शा० – खुबी कसली – शास्त्र आहे शास्त्र ! – म्हणजे " प्रायश्चित्तप्रकरण " !

कै० दी० – प्रायश्चित्तप्रकरण ? त्यांत सांगीतलंय होय अशास्त्र आचरण ?

वै० शा० – अशास्त्राचरण करा म्हणून सांगणारं प्रकरण नव्हें तर तसं आचरण यदा कदा घडलं असेल, तर त्यांतून - कशाही स्थितींतून निष्कृति व्हावी. एकदा 'भ्रष्ट' म्हणून लोटला खालीं कीं गेला रसातलाला, कायमचा मुकला तो आपल्या समाजाला अशी होऊं नये स्थिति; एतदर्थ त्या प्रकरणानं दयेचं केवढं मोठं करून ठेवलं आहे आमच्या सारख्याकरितां आपलं पोट कीं, कांहीं का घडेना आहेच तोड त्याच्यावर प्रायश्चित्ताची – पोळीही यामुळेंच आम्हा धर्मशास्त्रवेत्त्यांची पिकते ! यजमानास "तुम्हाला कसा निकाल पाहिजे आहे ?" हें आधीं विचारून घेऊन तदनुकूल वाक्यें लागतों शोधायला – आधीं निकाल मग साक्षी पुरावा – म्हणून होते आमची वाहवा. नाहींतर शास्त्र्याला विचारीत होता कोण आमच्या समाजांत ?

कै० दी० – वा:, खूप शैली आहे बुवा तुमच्या विधानाची व कल्पनेची ! म्हणजे आपला आशय आमचं शास्त्र काय वाटेल तें करावयाला अनुमति देतं असा झाला एका अर्थानं घ्यावयाचा ?

वै० शा० – तसं स्पष्ट म्हणणं नाहीं – प्रांजलपणानं कबूली म्हणून नाहीं – पण, हरकत नाहीं, एवढंसं कांहीं विषेश बिघडलं नाहीं असें हळहळणाऱ्या मनाच्या शांत्यर्थ – त्रिरमलेल्या हृदयाच्या समाधान प्रीत्यर्थ – चालाख व हुशार वृत्तीच्या मतपुष्ट्यर्थ हा अष्ट-पैलू – धर्मशास्त्र दाहीं दिशेकडून दयेची वृष्टि करावयास तयार आहे – इतकं तें दयाळु आहे हें मला सांगावयाचं आहे.

कै० दी० – वाहवा! खूप मजा वा: !

वै० शा०– असं पाहा ! नौकागमन – परदेशगमननिषेध ज्या ग्रंथांतून आढळतं व ज्याबद्दल ओरडाओरड आहे चोहींकडे तसं घडलं असतां त्याचा सहज निष्कृतिप्रकारही त्यांतच सांपडतो. पर-देशगमनच काय तदंतर्गत अपरिहार्य म्हणून घडलेलं अभक्षभक्षण, अपेयपान, कधीं कधीं – याहून असेना कां कांहीं अधिक घाण, कधीं काळीं, प्रसंगविशेषीं अपरिहार्य म्हणून घडलेलं अभक्षेत्यादि करावं लागलं एवढंच नव्हें, तर असे प्रसंग वरचेवर घडून ती संवयीमध्यें परिणत होत होत अंगवळणीं पडली गेली असल्यासही - त्या अपेय-पानादिकांची निष्कृति एकदाच्या चार चौघांमधील प्रायश्चित्तसमा-रंभांतील गुंजभर पंचगव्यप्राशन चटकन् एका पलांत करून टाकते. इतकें सौकर्य ज्यांत आहे त्याची महती काय विचारावी ! तरी पण हे लोक मग कां उगीच धर्माच्या भयानं छाती दडपून घेतात व त्या-पासून उघड उघड दूर पळूं लागतात न जाणों !

कै० दी० –तें घेऊन काय करायचं आहे आपल्याला. तसल्या भ्रष्टाचाराची निष्कृति मी विचारीत नाहीं आपल्याला - माझ्या विचा-रण्याचा हेतू हा आहे कीं, तुम्ही आपल्या संध्येचं कसं काय केलं सध्यां ?

वै० शा० –हेंच तर मी आधीं विचारलं तुम्हाला बुव्वा !

कै० दी० — आसचं काय विचारतां - श्राद्धप्रकरणांत सबंध एक दिवस म्हणजे चोवीस तासाबद्दलच्या अपकर्षाचा जो एक प्रकार आहे त्याचं अनुकरण केलं जरासं आजच्या प्रसंगीं तास दीड तासाबद्दलच्या संध्येच्या परिपूर्ततेंत – करावं काय, इलाज नव्हता रावबहादुरच्या म्हणण्या समोर! तर मग **कालातिकाल दोष परिहारार्थं चतुर्थार्घ्यं दस्तममम** ठोकून दिला सर्वगामी मंत्र हा! शिवाय **'यद्यदाचरति श्रेष्ठः'** या न्यायें तरुण पिढीस अनुकरणार्थ हाही एक ठरतोच **परोपकारप्रकार!**

वै०शा० - हां हां हाच माझाही प्रायश्चित्त प्रकरण सांगण्याचा मतितार्थ – आश्य – त्याच संकल्पांत जरासं वाढवून **"प्रयोगसौकर्यार्थं"** म्हणजे **"कालापकर्षदोषपरिहारार्थं"** त्याचं स्पष्टीकरण म्हणजे माध्याह्नसंध्येच्याच वेळीं दिलं दडपून चारदुनी आठ अर्घ्यें एकदम. प्रातःसंध्या माध्याह्नसंध्येच्या वेळीं करतातना सारेच? मग मी आज जे आहे ते त्याच वेळीं सायंसंध्याही उरकून संध्येचा त्रिवेणीसंगमही घेतला झालं साधून – दुसरं एक असं पाहा! कोणत्याही वस्तूचा – भूमितीच्या भाषेंत म्हणावयाचें म्हणजे गुरुत्वमध्य जसा – तसाच संध्याकालाचा बिंदुमध्य म्हणजे माध्याह्नकाल म्हणून तीन्ही संध्यांचा संगम – हें तर काय तीन तीन दिवसाची संध्या राहिली तरी प्रायश्चित्तप्रकरण देतं ठाव आपल्या दयेच्या पदराखालीं! हाही नव्हें का एक **परोपकारप्रकार?**

प्रभा०— उगीच लेक्चराला उशीर मात्र लावीत आहां तुम्ही. त्यांचं काय ऐकत उभे आहां आ पसरून!

वै०शा० — हें लेक्चर नव्हें - आहेच त्यांत तशी आकर्षणशक्ति आणि मजा! — लेक्चर म्हणजे **"लेखं चरतीति लेक्चरः"** येथें

काय – आलं मनांत कीं गेलं लोकांच्या कानांत चट्कन – असा आहे ताजा सवदा आमचा.

भास्क०– मी उगीच याच्या वादांतील...दोघांतला वाद तर खराच – पण **वादे वादे जायते तत्त्वबोधः** याचाही एक नवीन प्रकाश डोकावूं लागला आहे माझ्या हृदयांत यांच्या योगानं.

प्रभा० – असल्या बाष्कळपणांतून तत्त्वबोध? कसा कसा सांगाच तर मग.

भास्क०– येथें नको १५ मिनिटें संपत आलीं. जाऊं चला व्याख्यानाला. सुरवातीला असेल वेळ, तर सांगतों व्याख्यानाच्या आधींच, नसतां कार्यक्रम संपल्यावर आहेचना वेळ घरीं जाइं तों!

वचंभट विद्यार्थी – [ घाईनें येऊन ] केव्हांपासनं शोधतों आहें गुरुजींना. म्हटलं, ही संध्येची वेळ, गुरुजी प्राण गेल्या बाहेर पडणार नाहींत या वेळीं, मग येथें असलेले हे सप्राण गुरुजी? कीं, निष्प्राण दीक्षित!! हें माझं गुरुजींच्या संध्येचं परीक्षण संदेहावस्थेंत आहे.

कै०दी०– अरे! कां रे तुझी धिंडका इथें फिरून? सांगीतलंना तुला सर्वांना सांगायला कीं, "आज अनध्याय म्हणून या उद्यां"?

वचं०– कामून? आज ना अष्टमी ना प्रतिपदा ना...

कै०दी०– लागला करायला बाष्कलपणा – गद्धा कुठला – बाष्कल!

वचं०– हां हां! तसं म्हणूं नका गुरुजी! बाष्कलास तसं कांहीं बरं? अहो! बाष्कलास वेदानेंही आदरला आहे. अशा भर रस्त्या-वर त्याचा अन् असा अनादर!

कै०दी०– तर तर तर! मोठेच आले आहेतना मास्तर आदर शिकवावयाला! म्हणे 'वेदांनीं असल्या बाष्कलाला आदरला आहे.'

बचं०— अहो बाष्कलाला तर काय — अजून तो सजीव प्राणी तरी आहे — निर्जीव कोहोळ इत्यादि भाजीपाल्यांनासुद्धां आदरला आहे वेदानं. ऐकाच तर मग "**कोहळं तर्पयामि, कौशीतकं तर्पयामि पैंग्यं० महा पैंग्यं० सुयज्ञं० सांख्यायनं० ऐतरेयं०महैतरेयं०शाकलं**०आणि दहाव्या नंबरचे अस्माकं **बाष्कलं तर्पयामि**." केवढं आमच्या वेदानं मोठं पोट केलं आहे आपलं कीं, एकाचीही निंदा नाहीं, निर्भिस्सना नाहीं, क्षमा, दया, शांति, आमच्या वेदांत कोणालाही अज्जाव नाहीं. फार झालें तर त्याला दुसऱ्याकडून तीही दुसऱ्या जन्मीं शिक्षा मिळते इतकेंच. केवल बोलण्याचें धाडस मात्र वेद करतो. स्वतः कांहीं शीक्षा देत नाहीं. सांगू कां तसलं एखादं वचन ? ऐकाच तर ! **योवश्शिवत मोरसः तस्य भाजयते हनः** लोकांना वाटतं मोरस साखरेंतील अपवित्रता या वीसाव्या शतकांत आम्हांस समजली — म्हणून त्याचा निषेध आम्हीं केला जुन्या काळांत होता कुठं मोरस आणि चहा ? पण आमच्या वेदांत, श्रुतींत, स्मृतींत काय एक नाहीं ? वेद म्हणतो "योवश्शिवत मोरस:" जो मोरसाला शिवतो "तस्य" त्याची "भाजयते हनः" हनुवटी भाजली जाते. कारण, पातळ पितळी बशींतल्या गरम गरम चहावांचून हनुवटी भाजत नाहीं व मोरस साखरेवांचून चहा चांगला होत नाहीं, चहा बशीवांचून चांगलासा पीतां येत नाहीं. मृत्तिकाभाजन — शास्त्रचरिताला संमत नाहीं म्हणून पितळी बशी घ्यावी लागते. ती घेतली असतां हनुवटी भाजल्याविना राहत नाहीं. वेदांतसुद्धां चाहाचं — नांव आढळेलही पण अजून पाऊण संथा बाकी राहिली आहेना घ्यावयाची ? श्रुतींत असें असेलसें ऐकून आहें पण, आठवत नाहीं तें, वचन. सध्यां स्मृतींत राहिली ती स्मृति मात्र आहे अजून चांगली स्मृतींत. म्हणूनही दाखवतों पाहिजे असल्यास — "**सर्वस्य चाहं**" अहा ! हा हा ! काय सांगू हो महति,

थोरवी आमच्या स्मृतींतली ! अहो ! नुसता चहाच नव्हे — तर " हृदि-सन्निविष्टो " तो चुलीवर, शेगडीवर होणारा प्राचीन कालचा चहा नसून स्टोव्ह वरला! अर्वाचीन '.ष्टो ' सुद्धां आहे त्यांत. तोही उगाच टाकून ठेवलेला आहे कोन्या-कोपऱ्यांत कोठें तरी-असा नव्हे. इतका आमच्या स्मृतिमाउलीचा लाडका होऊन बसला आहे कीं, ती सारखी या लाडोबाला उरावर बाळगत्ये! 'उरावर'!! हा आहे आशय स्मृतींतला. **हृदिसन्निविष्टो — मत्तस्मृतिर्ज्ञोम** —

वैं०शा०— पुरे पुरे आपलें आगाध ज्ञान — शिष्योत्तमाच्या अकलेच्या तमांतले तारे —

कें०दी० — चुप! पुरे झाला बाष्कळपणा हा. तुझं व्याख्यान ऐकायला नाहीं निघालों आम्ही संध्यासुद्धां सोडून !

बचं०— मग चला तर कोणाचं व्याख्यान आणि कोठें होणार तिकडे.

वैं०शा०— चला तर. चलाच लवकर

[ घाई घाईनें जातात. ]

# द्वितीय प्रवेश.

स्थल – व्याख्यान - हॉल.

दिनकर० :– आमचे सुप्रसिद्ध, सर्वश्रुत व्याख्याते, धर्मबृहस्पति सूर्याजीपंतांचें व्याख्यान ऐकण्याला आपण सर्वांनीं शुभागमन करून सभेस शोभा आणिली, तेव्हां आपली उत्कंठा तिकडे लागली असणें साहजीकच आहे. अजूनही त्यांच्या आगमनाची आशा करावयाला जागा आहे. पंधरा मिनिटाचा अवकाश म्हणजे कांहीं विशेष नाहीं. आहेच सर्वांना कमी अधिक करण्याचा अधिकार. म्हणून मार्गप्रतिक्षेला अजून वाव आहे तोंपर्यंत विषयप्रवेशापुरतें प्रास्ताविक भाषण करण्याची रावबहादुरांची आज्ञा म्हणून मी उभा आहें. "धर्म" हा सर्व उन्नतीचा मुख्य आधार, तद्वत् देशोन्नतीचें अधिष्ठान आहे. देहाला जसा प्राण तसा देशाला धर्म आणि देशाचा उत्कर्ष हा त्या देशाच्या तरुणपीढी-वर सर्वस्वी अवलंबून आहे. वृद्ध हे सल्ला देण्यापलीकडे कांहीं करूं शकत नाहींत. त्यांची शिथिल होत चाललेलीं इंद्रियें तडफ दाख-विण्यांत दुर्बळ आहेत. ती पिढी जवळजवळ निकामी होत आलेली अर्थात् कमी संस्कारक्षम असते. तरुण हेच कायते देशाचे आधार-स्तंभ होत. ते स्तंभासारखे स्वस्थ असतील – मुखस्तंभ असतील - तर कार्याची आशाच नको – अगडबंब असावेत असाही पण माझा आशय नाहीं – मध्यस्थितींतील कार्यकारी असावेत आणि त्यांच्या कार्यांत सातत्य असावें इतकेंच माझें म्हणणें आहे. परंतु आपल्या देशांतील सध्याच्या तरुणांत ती तडफ तितकी दिसून येत नाहीं – आणि अस-लेली अपुरी वाटते. कांहीं तरुण चैनीच्या तर कांहीं फॅशनच्या आहारीं पडून आचार विचारांत त्यांच्याच अनुकरणानें शारीरिकदृष्ट्या व मान-सिकदृष्ट्या दुर्बल झाले आहेत हें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. कांहींन

देशभक्ति व देशकार्य याची कल्पनाही नसते, तर कांहीं पाश्चात्यांच्या नकली व बेगडी संस्कृतीला भुलून - त्यांचेंच तेवढें, सर्वकांहीं सर्व बाजूनें चांगलें – असें समजून स्वधर्माला व स्वदेशकार्याला पारखे झालेले दिसतात. कांहीं यद्यपि शिक्षणाच्या अत्युच्च शिखरावर पोंहचलेले असले; परंतु कालमानानुरूप भोंवत असलेल्या सध्याच्या बेकारीमुळें हताश होऊन " किं कर्म किमकर्मेति " या संमोहावस्थेंत बसलेले, व्यामूढ दशेंत घुटमळत असलेले आणि बाकीचे बिचारे अज्ञानंधकारांत बुडून देशकार्यमार्गासच पारखे झालेले असे आहेत !

[ एक शिपाइ येऊन रावबहादुरांच्या हातांत एक एन्व्हलप देतो. रावब० वाचून पाहून तें पत्र दिनकररावांना देण्यास सांगतात. तें वाचून ] व्याख्यात्यांनीं मोठी दिलगिरी दर्शविली आहे यांत. ते लिहितात कीं – "तशाच कांहीं अपरिहार्य अडणीमुळें सभेस हजर होतां येत नाहीं" [ रावब०चा प्रॅव्हेट सेक्रेटरी दिनकररावांच्या कानाशीं लागतो. तें ऐकून. ] याबद्दल सभासदांची अत्यंत नम्रपणें रावब०कडून क्षमा मागावी अशी आज्ञा त्यांच्या प्रॅव्हेटसेक्रेटरींनीं नुकती ऐकविली आहे. वेळ बराच होत आला, तेव्हां व्याख्यात्याकडून व रावब०कडून, तसेंच मी माझ्या स्वतःकडूनही झालेला प्रकार अक्षम्य तरी आपण आपल्या दयेच्या पांघरुणाखालीं यास क्षम्य ठरवाल अशी आशा धरून माझें भाषण संपवतों.

एक श्रोता :– लवकर सुटलों. व्याख्यान ठरवून व्याख्यात्याचें न येणें-निदानीं या प्रसंगीं तरी-हाही एक **परोकारप्रकारच** म्हणावा !

सर्व उठतात. ]

# तृतीय प्रवेश.

[ सभा संपल्यावर हॉलच्या बाहेर. ]

भास्कर — नॉन्सेन्स ! निवळ हिंदू ! जंगली नाहीं तर !! व्याख्यान देण्याचं ठरवून आपला वर्ड आपणच पिटाळून लावावा म्हणजे व्हॉट्स धिस ? आणि हे लोक म्हणे हिंदुस्थानाला सेल्फ गव्हर्न्मेंट मिळवून देणार ! ब्रूट्स् नाहींतर ! प्रभा ! कम अ लॉंग, वुइ शॅल हॅव्ह सम् ड्रिंक- प्रभा ! प्रभा ! काय सांगू रे तुला ! खरा स्वर्ग विलायतेंत आहे ! काय तें त्यांचं कार्य करण्याचं कौशल्य !! तास अर्ध्या तासाचाच काय, मिनिटा- मिनिटांचा प्रोग्राम अगदीं कसा अप टु डेट आणि पाळणाराही तसाच पंक्चुअल्, भाषण टु दि पॉइंट ! व्यवस्था ? सिस्टिमॅटिक ! अशांना फॉलो करावयाचें सोडून आमचे लीडर्स त्यांना डिसऑनेस्ट म्हणून कार्य स्पॉइल करतात. प्रभा ! माय फ्रेंड !! आज तुझ्याकरितां म्हणून मी येथें आलों, आणि आज आमच्या क्लबांतलि मिस दुलारीच्या लेक्चरचा चान्स गमावला. तुमच्या व्याख्यानाचा विषय काय ? तर रिलिजन् म्हणजे 'आफ्टर डेथ रीजन्' ! आणि आजची प्रोव्हिजन् काय ? तर त्याच्यावर स्व्यांड होणारी पॅट्रिऑटिझम् !

प्रभा— भास्कर ! काय ! हे तुझे विचार ! माणसाला कावीळ झाली म्हणजे डोळे पिवळे होऊन सर्वच पिवळें दिसतें; पण तुझ्या डोळ्यांना पाश्चात्यसंस्कृतीची भोंवळ आल्यानें तुला सर्वच काळेंकुट्ट दिसावयाला लागलें आहे. भास्करभाऊ ! आमच्यांत दोष नाहींत असें कोण म्हणतो ? पण, पण — नुसत्या दोषांच्याच कोळशांची उगाळणी करण्यानें ते कसें नाहींसें व्हावेत ? दुसरा एकादा रंग का त्यांतून सांपडणार ? प्रत्यक्ष कार्य करावयास पाहिजे आणि तेंही तुझ्या सार- ख्याच सुबुद्ध माणसानें करावयास पाहिजे. ज्याला दोष दिसतील

तोच त्यांचें निराकरण करूं शकतो. फक्त दोष पाहण्यांत प्रेमदृष्टि पाहिजे. भास्कर! आमचे दोष तुला दिसतात, तर ते दूर करण्याची तूं का खटपट करीत नाहींस? तुला सांगतों – मातृभूमीचा उद्धार व्हावयाचा तर तो तुझ्यासारख्या हिऱ्याकडूनच होणारा आहे. तूं हिरा आहेस देशभक्तीच्या कोंदणांत बसलास कीं तूंच भास्कर खराखुरा तेजस्वी होशील. पण...

भास्कर— कायरे! आज कांहीं झोकली बीकली आहेस कीं काय? म्हणे देशभक्ति, देशकार्य, स्वार्थत्याग करा, आणि तो कोणांसाठीं? तर या अशा रानटी लोकांकरितां! वा: स्प्लेंडिड्, खासे! तुझे देशबांधव का तीं माणसेंतरी आहेत? निवळ ॲनिमल्स! आणि त्यांच्याकरितां म्हणे सॅक्रिफ़िस करा, मला तर कोणी यांचाच सॅक्रिफ़िस करणारा निघाला तर बरें वाटेल.

प्रभा— असले प्रभावसंपन्न पण स्वदेशप्रीती पार झुगारून देणारेच बहुतेक पुत्र आजकाल ही हिंदमाता प्रसवत आहे हें कांहीं देशाचें कमी दुर्दैव नव्हे. तुझ्या म्हणण्याप्रमाणें जनावरेंच हीं! असेंही धरून चालूं – खरेंच! ज्यांना स्वहित ठाऊक नाहीं, देशोद्धाराची जाणीव नाहीं जनावरेंच तीं! उच्च शिक्षण नाहीं, संस्कृतीचा गंध नाहीं हें अक्षरश: जितकें खरें तितकेंच आपल्या मातृभूमीचे दोष पाहणें हेंही पण सत्पुत्राचें शील नव्हे. जरा विचार करशील, तर सहज तुझ्या ध्यानांत ही गोष्ट चटकन येईल. फक्त मनाचा जो एक विपरीत ग्रह आधींच होऊन बसला आहे तो तेवढा काढून टाक म्हणजे ताबडतोब जनावरास माणूस कसें करावें ही गुरुकिल्ली तत्काल त्याच हृदयांतून सांपडेल. आज तुझ्यासारख्या प्रतिभासंपन्न, विद्यासंपन्न सत्पुत्राला ज्या मातृभूमीनें जन्म दिला तेथें उच्च शिक्षणाला वाव नसल्यानें अर्थहीन गोरगरीब व्यर्थ होतात व दैवदुर्विपाकाच्या तडाख्यांतून

तुझ्यासारखे बोटावर मोजण्याइतके प्राक्तनवान् श्री व धीसंपन्न लाभले असूनही देशाची अवनति अजून चालू असावी म्हणजे यांत कर्तव्य-पराङ्मुखतेची जबाबदारी संपन्नस्थितींतील विद्यमान विद्वानांवर नाहीं काय? तुझ्यासारखे चार देशोद्धाराच्या कार्यांत पुढाकार घेतील तर काय एक अशक्य आहे?

भास्कर— [ स्वगत ] ( काय म्हणतो आहे हा? मी झाडून साऱ्या देशबांधवांवर मागें पुढें कांहींएक न पाहतां, मुळींच न कचरतां ॲनिमल ब्रूट, स्टुपिड इत्यादि शेलक्या – सदोदित – अकारणीसुद्धां जिभेवर नाचणाऱ्या अपशब्दांचा भडिमार करून दिला तरी यत्किंचित् न रागावतां शांतपणानं माझ्याच पदरीं थोरवी बांधतो! इंग्लंडमध्यें इतकी सहनशीलता मुद्दाम ओढून आणलेली अशी फक्त प्रीस्ट अथवा पोप किंवा मिश्नरी लोकांत तेवढी दिसून येते. )

प्रभा— भास्करभाऊ! तुझें हें मौन मला अधिक तळमळाव-याला लावीत आहे. माझ्या एकदम कबूली उत्तरानें देशजनतेवरील तुझा रोष वाढत आहे कीं त्यांच्या त्या असंस्कृतीनें जडलेल्या दोषा-बद्दल तुझें हृदय दयेनें पाझरत आहे? अकालीं मौनानें दोन्ही विरोधा-त्मक विधानें संभवनीय होऊं शकतात.

भास्कर— नव्हे रे! माय डियर! मी जरा मार्गावर येत चाललों आहें. कुणीतरी मला आंतून – अगदीं हृदयाच्या तळांतून सन्मार्ग-दर्शक किरण माझ्यावर फेकीत आहे, मी किंचित् तिथेंच कुठेंतरी घुटमळूं लागलों आहें. जरा मला अधिक विचार करूं दे.

प्रभाकर— [ स्वगत ] ( काय! समजूं तरी काय मी आपल्या मनांत! माझ्या म्हणण्यांत कांहीं तथ्यांश आहे, माझें म्हणणें पटूं लागलें असें म्हणूं किंवा एकदा पाश्चात्यसंस्कृतींत मुरलेला आपल्याकडे वळेल ही कल्पनाच मुळीं व्यर्थ आणि वेडेपणाची गणूं? खरें पाहूं

गेल्यास पळापळानें खालावत चाललेल्या आमच्या जनतेंत असले विद्यासंपन्न, श्रीमान्य, समाजमान्य व राजमान्य सर्वबाजूंनीं सर्वमान्य होतील, तर जनता बडबडीचें क्षेत्र अल्पावकाशांत ओलांडून यांचें वाक्य म्हणजे वेदवाक्य मानून, कार्यदक्षतेच्या शिखरावर पोंचेल. तेव्हां आमची कॉंग्रेसमुखानें मागीतलेली मागणी जी दरवर्षी बिनचुक जणूं ठरावीकपणें राष्ट्रचालकांकडून पिटाळून लावण्यांत येते तींत एकदम इतका बदल होऊन जाईल कीं, आमचें म्हणणें सहजपणें केव्हांही मान्यच होत राहील. हे दयार्णव जगज्जीवना परमेश्वरा! होईल काय भाग्योदय असा आमच्या महाराष्ट्राचा!!!)

भास्कर-- माझ्या मौनाला हुसकावून लावण्याच्या यत्नांत गढलेला तूं माझ्या प्रमाणें स्वतःच विचारांत गढून गेला आहेस? 'मौन सोड' म्हणणाराच मौन स्वीकारीत आहे-आहे काय हा प्रकार?

प्रभाकर-- माझ्याही निराशेच्या खोल तमावर्ते हृदयाच्या खबदडींतून तसाच एक आशेचा किरण अस्पष्ट फिरकूं लागला आहे. म्हणून मीही त्या किरणाकडेच पाहात राहाण्यांत गुंग झालों आहें.

भास्कर-- [ स्वगत ] (याला आणि माझ्यासारख्या अल्लड तरुणाकडून आशेचा किरण सांपडावा! हा मला तसल्या अधिकाराला योग्यसुद्धां समजूं लागला कीं काय? मला अद्याप जगाचा अनुभव तो काय आणि किती! अत्यंत महत्त्वाच्या देशकार्याचीं सर्व सूत्रें माझ्या-सारख्याच्या स्वाधीन करून देण्याइतकें विशालहृदय याचें-माझ्या बालमित्राचें असावें-आणि मी इतका विद्यासंपन्न असून देशबांध-वांना ॲनिमल्स म्हणण्याइतकी क्षुद्रता दाखवावी! त्यांना माणूस म्हणण्या इतकीही माणुसकी माझ्या संकुचित हृदयांत नसावी!! आणि हा माझा बालमित्र उच्च पदवीधर नसतांही हृदय तेवढें अत्युच्च मिळवून बसला आहे! असल्या व्यक्ति धन्य होत!! त्रिवार धन्य होत!!!)

(७)

# धर्म-रूढी-बंधन.

## प्रहसन.

वसंतराव वकील :— ओ हो! जगन्नाथराव! कुठें होती स्वारी आपली! मोठ्या लटपटी करून विश्वतो प्रयत्नानें वकिली डावपेच लढवून तुम्हाला जामिनीवर सोडविलें - पण काय 'गरज सरो वैद्य मरो' या जपाच्या पुरश्चरणास बसलां होतां वाटतें? अहो देशमुखसाहेब! प्रसंग कसला बिकट! पण आज सहा दिवसांत तुमचें दर्शनसुद्धां नाहीं. आणखी सहाच दिवसांनी तारीखपेशी आहे!

जगन्नाथराव देशमुख :— वकीलसाहेब! काय करूं हो! तीन दिवसाची सबंध राहिलेली स्नानसंध्या संपविण्यास व तत्प्रीत्यर्थ कालातिकालदोषपरिहारार्थ प्रायश्चित्त म्हणून जपदशांश हवन, हवन-दशांश मार्जन, तद्दशांश तर्पण आणि कर्मसांगताप्रीत्यर्थ ब्राह्मण-संतर्पण इत्यादिकानें बाकी सारून नित्याह्निकापर्यंत येण्यास सहज सहा दिवस लागले. आतां सांगा यापुढें काय काय करावयाचें तें. आजपासूनमात्र दिवसांतून सहा तास मी पूर्ण मोकळा आहें —

वसंत॰:— कां बरें! स्नानसंध्येपुरती जेलरकडून तुम्हाला मोकळीक देवविली होतीना?

जगन्नाथः– त्या भ्रष्टाकारांत कसली होते स्नानसंध्या! नुसती त्रिकालसंध्या साधण्याची मारामार, मग इतर आह्निक कोठलें? आचमन, मार्जन, दिग्वंदन करतांना शिपायांनीं जी माझी चेष्टा चालविली होती ती पाहून इतर–आह्निकाप्रमाणें संध्यासुद्धां सोडून फावल्यावेळीं पुनः करतां यावी अशी सोय धर्मशास्त्रकारांनीं शास्त्रांत ठेविली-नाहीं म्हणून उर्मट शिपाया इतकाच मला त्या वेळीं त्यांचा राग आला. पण, करतों काय! ब्रह्मत्वरक्षणार्थ कसलीही चेष्टा होत असली तरी ती निमुटपणें सहन करून कशीबशी संध्या सारावी लागली. काय दिवस आले हो हे!!

पद. चाल–धाव सदया देवराया प्रणत हृदया पालना।

**कोणि त्राता नाहिं, नुरला ब्राह्मणाचा काल हा ॥ ध्रु० ॥**
**भाग्यदिन तो काल होता ॥ प्राप्त हें दुर्भाग्य आतां**
**काल झाला आज त्याचा ॥ काल कोठिल हो उद्याचा ॥१॥**
**शुद्धता, ओजस्विता ती ॥ मलिनता, ही भ्रष्टता**
**तो दर्प, ती संपन्नता! ॥ कांहींच नुरली मान्यता ॥२॥**
**वंदि विष्णू ब्रम्हचरणां ॥ मिरविली पदलांछना**
**लाथ मिळते आज त्यांना ॥ हीन जातीची पाहाना ॥३॥**
**सोय नुरली भाग्य जातां ॥ कांहिं वदण्याची आतां**
**दैन्यभोगें दीनचित्तां ॥ क्षणहि कोठिल शांतता ॥४॥**
**साध्य सिद्धचा सकल होत्या ॥ तुकविले सुर ज्यास माथा**
**जन्मतः यशवंत तो आजि ॥ त्रस्त अपयश भोगितां ॥५॥**

वसंतराव :– हें तर खरेंच, पण मी म्हणतों जशी संध्या संपविली तसेंच पोथी, जप, आह्निक इत्यादिही कां संपविलें नाहीं? नजरकैदेंत कसलेंही काम कोणी घेत नाहीं. तर मग उलट वर्षसहा महिन्यांतील चुकूनमाकून राहिलेले सारें आह्निक जप, पाठ इत्यादि खुशाल

उरकून घेतां आलें असतें. अधिक तर काय, अगाऊ स्नानसंध्याही शिल्लक टाकतां येण्यासारखी सारखी फुरसतच फुरसत होती!

जगन्नाथ० :– काय वसंतराव! तुम्हीसुद्धां चेष्टा करावीना? अगदीं आवश्यक अशी नुसती संध्या संपविण्यांतच जीव मेटाकुटीला येत होता. कारण, मी आचमन टाकीत असतां "असला धट्टाकट्टा, भला दांडगा दिसतो; पण मरणोन्मुखाप्रमाणें पळी पळीभर पाणी काय-म्हणून घेतो हो हा?" अशी चेष्टा त्या शिपायांनीं चालविली. मी मुद्रा करीत असतांना एक सोबती दुसऱ्यास हळूच टोचून म्हणतो "पाह्यलंस, संध्या करितां करितां मासोळी, कासव, कावळा, वाघाचा डोळा वगैरे लहानपणचे पोरखेळ खेळूं लागला. वेडा तर नाहीं हा!" काय सांगूं वकील साहेब! दिग्वंदन करीत असतां एक म्हणाला "वेड्या! कैद्यांना आणि या लोखंडी गजांना नमस्कार केल्यानें कुठें का सुटका होते?" एक म्हणतो – काय हिंदूंच्या धार्मिक, वेडगळ कल्पना! मूर्तितर असो घरच्या अंगणाची, दाराची, भर रस्त्यावरील उंबरठ्याची सुद्धां हे मूर्ख हळदीकुंकवांनीं पूजा करतात." त्याचा दुसरा सोबती एकदम उसळून म्हणाला "हो, हो! अगदीं खरं. स्वतः तीन तीन दिवस स्नान न केलें तरी उंबरठ्यासमात्र नित्य स्नान घाल-तात. एकानें या ब्राह्मणांच्या चालीरीतीवर (चालीवरिल) एक पद त्या चालीस 'चाल – "चवचाल" असें नांव देऊन रचिलें आहे तें मीं ऐकतां ऐकतांनाच पेन्सिलीनें उतरूनही घेतलें आहे. वस्तुतः 'चंद्र-कान्त राजाची कन्या' या चालीवरील पद आहे; पण तो नांव देतो' 'चंद्रमुखी राणीचा बाळ्या.' "ऐका तर मग त्या बाळ्याचे गुण' असें म्हणून हसत, खिदळत त्यानें तें पद हातवारे करून म्हटलें व ती चिट्ठीही माझ्या अंगावर टाकिली. ऐकवूं का तुम्हाला? अरे हो! माझी चाळशी...!!

वसंत.—बघूं! आणा इकडे. मीच वाचतों तें. मी तर चाळशीला चोवीस तासांतून पांच चार मिनिटेंही विसंबत नाहीं! अं ऽ! काय? "जें बडबडणें तें असें असे". वाः मथळाही झकास दिला आहे! ऐका तर मग:—

**काल म्हणे या कालीं ब्राह्मणजातीला आंघोळ नको।**
**त्यास यदी हरताळ लागला पूजादिक मग घोळ नको॥१॥**
**कर्म नको मुळिं, पाणी तरि कां भडभड अंगावरति वृथा।**
**संध्या आह्निक खूळ गणावें अशी पडलि आहेच प्रथा॥२॥**
**स्नान नको, संध्याहि नको, जप-जाप्य नको, ब्राह्मण्य नको।**
**गीता ती होती कीं नव्हती-नकोच तेंहि अरण्य नको॥३॥**
**बेल-फुलांचा नकोच कचरा, सारा ती अधिं देवपुजा**
**थरमासांतुनि चहा भरूनि ह्या धावत झणिं ऑफिसांत जा**
**भात, चपाती, भजी, लोणचें डब्यांत ह्या भरुनी, मग तें-।**
**प्रशांत बघुनी वेळ हळुहळू गट्ट करा बसुनी तेथें॥५॥**
**क्षणांत उलटें सुलटें करणें जानव्यास तो त्रास नको।**
**ब्रह्मयज्ञ कीं पोरखेळ हा? पोरेंही हसतिल खो खो!॥६॥**
**वैश्वदेव तो देव कसाहो? "विस्तव" हेंही कळूं नये!।**
**काय म्हणावें अशा खुळ्यांना अन्न जाळिती धर्मभयें!!॥७**
**देवालाही "डुकडुक माकड"! खुळसट हा नैवेद्य कसा?।**
**अकलेचे तारे तुटले हे, ब्राह्मणहो! बस उगीच बसा॥८॥**
**वैश्वदेव, नैवेद्य कशाला? हॉटेलें झालींत खुलीं।**
**अतिथी अभ्यागत गत झाले, पडलीं तीं कारणें लुलीं॥९॥**
**त्रिकाल आह्निक करिति खुळे परि इतुकेंही नच कळे कुणा**
**त्रिकाल शेव्हिंग, सूट, बूट ह्या प्रगतीच्या आहेत खुणा॥१०**

शिशा काढणें, निदानिं दाढी तरि अपुल्या हस्तें करणें।
बम्हवृंदें या मंगलकार्या चुकल्यानें झालेच उणे ॥११॥
स्मार्त, भागवत, वैष्णव सारे एका मालेचेच मणी !
कुणीकडे जग चालतसे, हे कुठें भटकती रानिं वनीं! ॥१२॥
शैव म्हणावि जो तयास आज्ञा "शेव्ह" म्हणुनि प्रत्यक्ष असे
त्रिकाल शेव्हिंग् जया घडतसे देवचि तो भूलोकिं वसे॥ १३
स्मश्रु वाढल्या शेव्ह शब्द जणुं 'शेम् शेम्' हें उच्च रवें -।
ऐकवितो तरि लाज न ये-ज्या धर्मखूळ वाटे बरवें ॥१४॥
केस वाढती तोंडावरती बुजुनि जातसे मनुजपणा।
सवड सांपडे या ब्रम्ह्यांना आठआठ दिवसांतहि ना ॥१५॥
श्रावण कोणी म्हणे, भाद्रपद, कोणी चातुर्मास म्हणे।
ज्योतिषग्रंथहि अशा क्षुद्र गोष्टीवर माजवितात रणें ॥१६॥
शेंडी, जानव महा भयंकर, महा घातकी हे दोन्ही
मुख्य चिन्ह विप्राचें म्हटल्या कुणिहि हेंच दाखवी झणीं॥
शेंडी जातां शत्रुकरीं त्या विप्राची भरलीच पुरी।
आउं न दे जानवें जराही धरुनि ठेवण्या साह्य करी ॥१८॥
शूर, आजित व्हावा ब्राह्मण तरि हे दोन्ही अधिं दूर करा।
नातरि धर्म उराशीं धरुनी खुशाल कोठेंतरी मरा ॥१९॥
शिवाशिव तरी शिव शिव! कसली घोडचूक परि ध्यानिं नये
ब्राह्मण ठरला द्वेष्य जनीं यामुळेंच! हेंही कळूं नये? ॥२०
कर्म ओढवें तरीच म्हणवें " ब्रह्मकर्म सांडिल्या कसें?"।
ब्राह्मण? छे! हीं ब्रह्मपिशाचें हटें करुनि घेतींच हसें॥२१॥
अन्न, पेय वाटेल तयांचें चालावें अशि संवय करा!।
प्रसंग पडतां बोटीशीं मग ब्राह्मणधर्मा केविं धरा ? ॥२२॥
अभक्षभक्षण म्हणूं नये! तें जीवनरक्षण हेंच खरें।
बोटीवर चढतांच नवें जग, दीड बोट कीं स्वर्ग उरे! ॥२३॥

सर्टिफिकेट हा आतांचा मनु जगद्धितास्तव झटताहे।
सार्वभौम दुर्दैवी ब्राह्मण तरीच नच इकडे पाहे ॥२४॥
कुल, जाती, धर्मशास्त्र, रूढी कळलेंना तें वेड कसें?
सावध व्हा आतांतरि झणिं 'जें बडबडणें तें असें असे' ॥२५

जग० :– खरेंच, अगदीं असेंच वसंतराव! आह्निकांतील अत्यावश्यक संध्येसुद्धां आजकाल लोक वेडेचार समजायला लागले. मी अधरायैदिशे अनंतायच नमः म्हणत असतां खो खो हसत, ऐकूं येण्याइतक्या मोठ्यानें ते दोघे म्हणूं लागले कीं, "आतां तर वेडेपणाची कमाल झाली बुवा! आपल्याच पायांकडे हात जोडून आपले आपणच पायां पडत आहे. मूर्ख कुठला!"

वसंत० – मूर्खांनीं मूर्ख म्हटल्यानें कोणी मूर्ख थोडाच होऊं शकतो! मतस्वातंत्र्याची प्रत्येक मनुष्यास मुभा आहे. धर्माची पूर्ण माहिती न मिळवितां, सारासारविचार न करतां मूर्ख म्हणणें म्हणजे तो मुर्खपणा ऐकून घेणाऱ्याचा नसून म्हणणाऱ्याचाच असतो-तरीपण-देसाई साहेब! पोथीचा पाठ किंवा जपाची माळ ओढीत बसायचं असत खुशाल-त्यात कांहीं शरीराची विकृति करावी लागत नाहीं कांहीं नाहीं!

जगन्ना० – तशा वेळीं कसलें सुचतें जपजाप्य! अहो! नुसती पंचायतनाची पूजासुद्धां करूं देईनात ते दैत्य! संपुष्टांत सतरासतरांदा वांकवांकून पाहूं लागले. एकानें तर चटकन् जेलरास बोलावून आणलें. तो तत्काल चाबूकच घेऊन आला-घाईघाईनें एकदम वाघाप्रमाणें मजवर त्यानें झडप घातली आणि दोघांचौघांनीं चोहींकडून झोंबाझोंबी करून आधीं संपुष्ट हस्तगत करून घेतलें. झालें, देवाच्या पूजेऐवजीं माझीच यथास्थित पूजा झाली. मीं संपुष्ट सोडलें नसतें तर चोहींकडून
९

चामड्याच्या चाबकानें त्या चोरांनीं माझ्या चामड्याची चांगली चम-चमित चटणी केली असती.

**वसंत०** – मग पुढें काय झालें ?

**जग०** –पुढें काय ! संपुष्टच गेलें, अर्थात् आपोआप सर्व आह्निक संपुष्टांत आलें. मग मीही पोथीचा पाठ सोडून त्यांच्याच नांवानें पठण करीत पाठोपाठ धावलों. हो ! पूजाच नाहीं, मग पुढें करावयाचें तें काय ! पाठ नसो–पोटाचें आन्हिक तरी सारूं म्हटल्यास तीर्थावांचून पाण्याचा थेंबही तोंडांत जाऊं द्यावयाचा नाहीं हा माझा नियम आहे.

**वसंतराव** – तर मग पूजा झाल्याशिवाय आपण आचमनच करीत नसाल ?

**जग०** — ( हसून ) अहो ! आचमनाशिवाय आधीं आह्निकास आरंभच होत नसतो ! आचमन म्हणजे आचमनच ! ! तें कांहीं पाणी पिणें नव्हे–मसुराची एक डाळ बुडण्या इतकें पाणी–हें आहे आचमनाचें प्रमाण ! तुमचा तो विषय नव्हे. धर्माचे कायदे निराळे व तुमचे कायदेकानून निराळे.

**वसंतराव**– आतांचा हा असल्या कायद्याकानूनचाच काल आहे. केव्हां केव्हां, किती किती चुळा कशा कशा भराव्यात असले निरर्थक धर्मशास्त्रांतील कायदे पाठ करण्याचा काल नाहीं. “ असल्या समजूतीची आतां हकालपट्टी करावी” असें एका सुप्रसिद्ध महात्म्याच्या व्याख्यानांत आलें आहे.

**पद. चाल** – सत्य वदे वचनाला नाथा–

**शांति सुखा मिळवाया आतां ॥ विसरूं नका हो या मधु-**
**वचनां ॥ध्रु॥**
**राष्ट्रिय ऐक्य घडाया राष्ट्रिय-॥ उत्सव व्हाव्या हो नाना॥**
**विसरूं नका हो या मधु०**

परदेशाचें गमनतत्त्व हें ॥ मनीं कुलीतिहि झणि आणा ॥२॥
विसरूं नका हो०
जनतेमध्यें प्रेमें वागा ॥ प्रेमाचि शिकवा सकलांना ॥३॥
विसरूं नका हो या मधु०
मानव जाती एकाचि कीं ती? ॥ भूतदयेतें मुख्य गणा ॥४॥
विसरूं नका हो या मधु०
विश्व तोषवा विश्वनियंता- ॥ तोषवील तो निज भक्तांना ॥
विसरूं नका हो या मधु०

जगन्नाथराव— कोणी कांहींही म्हणो, कसलाही उपदेश करो, आम्ही आपल्या घराण्यांत वाडवडीलांपासून चालत आलेली चाल-रीत, आचार-विचार, केव्हांही सोडणार नाहीं. आमचे वडील तीर्थावांचून अन्नग्रहण करीत नव्हते, तोच बाणा आम्हीही चालू ठेवला आहे; पण परवांपासूनच्या तीन चार दिवसांत संपुष्टाच्या अभावीं जी पाळी आली तशी माझ्या साऱ्या कारकिर्दीत, उभ्या जन्मांत आलेली मला आठवत नाहीं. संपुष्ट परत मिळविण्यास प्रयत्नाची पराकाष्ठा केली, त्या आशेनें दोनशें रुपये खर्च केले, पण ते परत मिळण्याऐवजीं त्या संपुष्टावर मजबूत शिक्का मोर्तब करून सरकारी जनरल हॉस्पिटलच्या मुख्य डॉक्टराकडे पाठविल्याचीही गुप्त हकीकत मात्र कळली.

वसंतरा० — डॉक्टरकडे काय म्हणून?

जगन्ना० —त्याचें कारण असें सहज समजण्यासारखें नव्हतें. माझा विश्वतो प्रयत्न म्हणूनच इतकी ती गुप्त बातमी, तरीसुद्धां मिळ-विली. अहो! "दाम करी काम!" पाण्यासारखा पैसा खर्च केल्यावर अगदीं खोलच खोल —पाण्याच्याही खालीं पुरून ठेवलेला पैसा पाह-ण्यास सांपडेल. संपुष्टाची बिशात ती काय! याचें कारण असें समजलें कीं, त्या छोटेखानी पंचायतनांतील शालिग्रामास खाऊन जीव देण्या-करितां म्हणून अफूची गोळी पूजेच्या मिषानें मी आणविली असेल

असा त्याला संशय येऊन, ती टणक आहे का मऊ इतकेंसुद्धां न पाहतां वर मजबूत कपडा शिवून जेलरच्या शिक्का मोर्तबासहित परीक्षा करण्यास्तव त्या मूर्खानें डॉक्टराकडे पाठविलें आहे. इतकी बारीकसारीकसुद्धां माहिती मिळवितां आली. प्रसंगविशेषीं पूजा करतां आली नाहीं किंवा तीर्थावांचून अन्नग्रहण झालें असल्यास तत्प्रीत्यर्थ धर्मशास्त्रांत प्रायश्चित्त सांगितलें आहे; पण तशी संध्या कांहीं चुकवितां येत नाहीं. म्हणून वाटेल तशी चेष्टा झाली तरी ती चुकूं दिली नाहीं. याहून अधिक माझी चेष्टा मी सहन केली असती; पण पंचायतन-संपुष्टाची चालविलेली विडंबना मला असह्यनीय झाली म्हणून दुप्पट प्रायश्चित्त घेऊन आज कोठें मोकळा झालों.

वसंत० -- राहिलेंच होतें त्या अर्थी आणखी चार दिवसांनीं तें पुरें करतां आलें असतें. धार्मिक प्रायश्चित्ताऐवजीं एका निरपराध्यास सोवळेपणाच्या संतापांत मरणांतिक जखम आपल्या हातांनीं केल्यानें कोर्टाच्या प्रायश्चित्त प्रकरणासंबधीं किती तरी आपल्याला कामें करतां आलीं असतीं. अशावेळीं तर आह्निकाच्या काळजीपेक्षां जानबाच्या जखमेची काळजी, तशीच त्याची शुश्रुषा केली असती, शोडषोपचार-पूजे ऐवजीं औषधोपचार केला असता, तर एव्हांशी तो बराही झाला असता. संपुष्ट सोडविण्यांत २०० रु. व्यर्थ गमावलां तेच जानबास दिले असते तर योग्य औषधोपचारानें त्याचे संपुष्टांत येत चाललेले प्राण वांचले असते. त्या जेलरच्या पायां पडण्याऐवजीं एकदा जरी जानबाच्या घरीं आपण आपले पाय लावले असते, तर त्यास ते उपकार अनंत वाटून बिचारा राजीनामासुद्धां देण्यास तयार झाला असता! आणि इतकें झालें असतें, तर पेटत चाललेलें हें प्रकरण सहज कोर्टांतून काढून घेतां आलें असतें.

जग० - काय, जानबाची शुश्रुषा ! आणि ती ब्राह्मणानें कशी करावयाची ?

वसंत० - जेलरच्या पायां पडलां तितकें कांहीं हें कठिण नव्हतें ? जेलर हाही जानबाच्याच जातीचा ना ?

जग० — छट्. तो महार नसून साहेब आहे साहेब ! साहेब राज्य-कर्ते म्हणून त्यास महाराजसुद्धां म्हणतां येईल. आज तो २०० रु. चा एक प्रतिष्ठित ऑफिसर आहे !

वसंत० —समजा, जानबालाही जर हे २०० रुपये या महिन्यांत दिले आणि कांहीं महिने या प्रमाणें चालू ठेवले तर तुमच्याच व्याख्या-न्वयें तेवढे महिने तरी तो प्रतिष्ठित ठरतोच. शिवाय, तुमच्या सार-ख्या देशमुखांना ही कांहीं डोईजड बाब नाहीं - जमीनीची वसूलवास-लात करण्यास जाहागीरीवर नेमलेल्या दोन - चार निरक्षर नायबांना शें - दोनशें रुपये दरमहा देतच असतां ना आपण ? तर...

जग० — वा: वा: खूप ! साहेबी डिनरचें कार्ड आलें तरी सायं आह्निक सुटतें म्हणून तसला मानही टाळणारा हा करारी जमीनदार आपण होऊन महारवाड्यांत जाण्या इतका मूर्ख नाहीं. आणि म्हणे दरमहा दोनशें रुपये असल्या चांडाळास चालू ठेवा. वाः उत्तम सल्ला दिला आपण ! अहो ज्याची सावली पडण्यानें ब्रह्मत्व भ्रष्ट होतें असल्या नष्ट चांडाळाकडे आमच्यासारख्या श्रेष्ठ ब्राह्मणानें - त्यांत पुनः अत्यंत शुद्ध, जुन्या बालबोध घराण्यांतील थोरा मोठ्या जमीनदारानें —त्या भिकारड्याच्या घाणेरड्या घरांत जावें आणि भ्रष्ट व्हावें ?

वसंत० —दया करण्याकरितांच थोर लोक न बोलावतां दीन दुब-ळ्याच्या तसल्या तर काय - त्याहून भिकार झोपडींत आपण होऊन जात असतात. कसलाही गलिच्छ शूद्र, अतिशूद्र अगदीं चांडाळ असला तरी तो आपलाच हिंदबंधूना ? अठरापगड जाती हिंदूंतच

मोडतात. कोणास कोणी तुच्छ लेखल्यास द्वेष वाढतो. एक हिंदु दुसऱ्या एका हिंदूच्याच घरांत नुसता जाऊन आला तरी त्याच्यांत कशी काय भ्रष्टता येते?

जग० – सांसर्गिक दोष ओंवल्यावांचून राहत नाहीं. प्रत्यक्ष पोटचा मुलगा असला तरी तो ओंवळ्यांत असतांना सोंवळ्यांत असलेला पितासुद्धां त्याला शिवून घेत नाहीं! गलिच्छ वातावरणांत नुसतें जाऊन आलें तरी शुचिता नष्ट होते, मग प्रत्यक्ष शिवाशिव झाल्यावर?

वसंत० – या कालांत सांसर्गिकदोष दोष मानल्यास एकसुद्धां ब्राह्मण शुद्ध राहिला नाहीं असें अगदीं निर्विवादपणें ठरतें.

जग० – तें कसें?

वसंत० – भ्रष्टाच्या पंक्तीस बसल्यानेंही भ्रष्टता येते ना? तर मग कोण शुद्ध उरले सांगा बरें? आपल्या आप्तांपैकीं एकादा जरी रेफ्रेश्मेंट-मध्यें नित्य चापून येणारा, सर्वांना पूर्ण माहित असलेला असा असला तरी खुशाल तो पंक्तीस बसूं शकतो आणि तुमच्यासारखे कर्मठ कसलीही तक्रार घेत नाहींत. एकादा अक्षरस्थ, प्रतिष्ठित विद्वान्, शास्त्री, बुवा किंवा प्रसिद्धीला व समाजमान्यतेला लालचावलेला व्याख्याता अथवा लेखक धडधडीत अतिशूद्राच्या पंक्तीस उघड उघड चार-चौघांत (हजारों जन संमर्दांतील सहभोजनांतून) येथेच्छ ताव मारून आलेला असूनही त्याच्या पंक्तिलाभास तुम्ही महल्लाभ समजतां याला म्हणावें तरी काय!

जगन्नाथ० – ज्याचें पाप त्याला. ज्याचा तो आपल्या कृतकर्माचा जाबदार! आम्ही फक्त शेंडी आणि जानवें पाहावें. विशेष खोलयांत विनाकारण जावेंच कां!

वसंत० – जुन्या घराण्यांतील शुद्ध कर्मठ आणि श्रेष्ठ म्हणवणाऱ्यांनासुद्धां प्रसंग पाहून असलें दुटप्पी, मतलबी, वर्तन ठेवावें

लागतें आणि ते ठेवतातही. जगांतील सर्व कांहीं कालमानानुरूप बदल-तेच! हा निसर्गधर्म आहे!! हाच न्याय राष्ट्राला, समाजालाही लागू आहे!!! एकूणएक देशांतील सर्वच स्थिति आज अजिबात पालटली! चाली, रीती बदलल्या, सरकार बदलले, भाषा बदलली, पिढ्यान् पिढ्या चालत आलेला तद्देशीयांचा रंगही पालटून गेला, सर्व पारडें बदललें! अशा परिस्थितींत वैदिक-कालांतल्या कर्म-बाळानें अजूनही आईबापाच्या करांगुलीच्या आधारें माजघरांतील फरफटण्यांतच समाधान मानावें? वयोमानानुरूप वाढत जाऊन स्वतंत्रपणें स्वतःच्या पायांवर चालावयास लागून, घरकोंबडेपणा सोडून चारचौघांत मिळून मिसळून वागूं नये काय? जुन्या चालीरीतीस चिकटून राहण्याच्या घातुक संवयीमुळें - होणारे असो; पण — असलेले मित्रही अशानें आपण गमावून बसलों! जे आपली अनन्यभावें सेवा करीत - जे अतिशूद्र बिचारे मोठमोठीं कष्टाचीं कामें मोठ्या भक्तीनें करीत त्यांच्याशीं भूतकालीन दृष्टीनेंच पाहा—ण्याच्या प्रवृत्तीमुळें हिडिस्फिडिस् करून शिवाशिवीच्या खुळसट कल्पनेनें कालच्या आपल्या निस्सीम भक्तांना, सेवकांना आपल्याच वर्तनानें उलट आज द्वेषी बनवून सोडतों. जातिभेदामुळें झालेल्या व पदोपदीं वाढत चाललेल्या हिंदराष्ट्रीय हानीचीही नुसती कल्पनासुद्धां डोकें भणाणून सोडते. जे ब्राह्मण देवाहूनही पूज्य मानले जात होते तेच आतां सूड आणि द्वेषाचा विषय होऊन बसले! कोण ही आम्हा ब्राह्मणांची दुर्दशा! व ती केली कुणीं? आपलीच जीभ, आपलेच दांत!! इतर कोणासही नांवें ठेवण्यांत अर्थ नाहीं. — ( थोडें थांबून ) — कां जगन्नाथराव! स्वस्थ बसलां?

जगन्ना० — हो! सदूसद्विवेकबुद्धीस जरा चालना दिली, तर तुमचें म्हणणें अक्षरशः खरें आहे हें खास. मनास पूर्ण पटतें! पण पटलेलें शरीरानें कृतींत उतरविण्यांत रूढी आडवी येते!! हें **धर्म-रूढी-बंधन** प्रदीर्घ संस्कारयोगें दुर्निवार्य झालें आहे!!! अधिकाधिक शुद्धता

म्हणून स्पर्शास्पर्शविचार नसल्याच विशिष्ट अधिकारी, सर्वसंगपरित्यागी तपस्व्यांना शोभतो. निर्जन वनांतल्या गिरिकंदरांत शहराचें वारेंही येत नसलेल्या अशा एकांतांत वास्तव्य करणाऱ्याचाच तो अधिकार! आमच्यासारख्या नगरकीटकांनीं — शहरांतच ज्यांचें जीवन असतें असल्यांनीं — सर्वाहून अगदीं निराळें सदैव सोंवळें राहण्याचें व्रत स्वीकारिलें, तर तें चालणार तरी कसें? तपस्व्यांचे कष्ट तर सोसवत नाहींत! पण त्यांच्या थोरपणाच्या मान्यतेचा लोभ कांहीं सोडवेना म्हणून खालच्या जातीला तुच्छ लेखण्याची ऐट तेवढी धरून बसलों! चहाप्रमाणें आधीं आधीं पडशाचें औषध म्हणून घेतां घेतां पक्की संवय - अथवा खोड म्हणा - जडली. तीच दीर्घ संवय आतां रोग म्हणून रोमरोम भिनली आणि तिनें कायमचें ठाणें घातलें. प्रत्यहीं त्याचे दुष्परिणाम अनुभवास येत असूनही जडलेली खोड कांहीं सुटत नाहीं - अशी स्थिति झाली आहे खास. खरोखर! त्या बिचाऱ्या जानबानें माझें असें काय भयंकर नुकसान केलें होतें कीं, त्या अंवळी पोर्णिमेच्या दिवशीं वनभोजनाच्या वेळीं सोंवळ्यांत वाळत टाकलेल्या धोतरावर विद्रित जानबाचा हात न जाणून पडला असतां संतापाच्या भरांत भरलेला तांब्या तसाच मी त्यावर भिरकाविला त्यामुळें डोकीला केवढी भयंकर जखम झाली!

वसंतराव :— नुसती जखमच काय! मरणांतिक अवस्था झाली. त्याच्या जगण्याची क्वचितच आशा आहे.

जगन्ना० — अरेरे! खरेंच कीं काय? जर का तो मेला, मग पुढची दुर्गति!......

वसंत० — दुर्गति कसली? जन्मभर सोसलेल्या हालअपेष्टांतून, अठरा विसवे दारिद्र्यातून व त्याहून असहनीय अशा वरिष्ठ जातीच्या अमानुष छळांतून सुटेल बिचारा एकदाचा!

जगन्नाथ० – तो सुटेल, पण त्याचा अंत झाल्यावर अंतकाळपर्यंत कारागृहांत मला खितपत पडावें लागेलना! त्याबद्दल काय ठरविलं आपण? अहो वसंतराव! – आमचे तुम्ही बालमित्र– इतक्या विकोपाला गोष्ट गेली तरी तुम्ही आपले निश्चिंतच! आश्चर्य आहे बुवा! माझ्या अब्रूचें, अनेक सत्कार्यांनें मिळविलेल्या लौकिकाचें व आज पंचेचाळीस वर्षें जपलेल्या या जीवाचें कांहींच नाहींना वाटत तुम्हाला? इतका का मी क्षुद्र आणि पापी चांडाळ झालों! परमेश्वरसाक्ष! मज कडून कसलेंही पापाचरण आजपर्यंत जाणून बुजून घडलेलें नाहीं. साऱ्या जन्मांत झालेली चूक काय ती हीच एक.

वसंतराव :– ही? बारीकसारीक चूक नसून अगा मोठा पहारीलाही लाजविणारा खिळा आहे खिळा!

जगन्ना० – झाली खरी ती घोडचूक. आतां कांहीं करा, वाटेल तितके पैसे खर्च करा; पण मला वांचवा. अहो, आमच्या वाडवडिलांनीं मिळविलेली केवढी कीर्ति? व मीही आजन्म तींत भर टाकीत असल्याचा माझा केवढा लौकिक? पण हाय दुर्दैवा!!

वसंत० – 'वांचवा, वांचवा' असें म्हणणें कशाला? मी वांचविण्याची खटपट मनापासून करीतच आहें; पण तुम्ही वांचण्याचें मात्र मनावरसुद्धां घेत नाहीं.

जगन्ना० – सांगा, सांगा, काय वाटेल तें करण्यास सांगा. जानवाच्याच काय, त्याच्या घरच्या एकूणएकासमोर झुका मागतों, पायांसुद्धां पडतों; त्यांत लाज कसली? सर्वांत परमेश्वर आहेच, जानवाला वांचवा म्हणजे मी वांचलोंच! जर का तो मेला, तर पुढचे धिंडवडे काढून घेण्यापेक्षां शालिग्रामाच्या चौपट अफूची गोळी घशाखालीं खरोखर सोडून मिळवितों सुटका एकदाची!!!

वसंतराव :– छे, छे, प्रत्यक्ष विष घेण्याचें कांहीं कारण नाहीं. फक्त विषाहूनही कटु अशा तुच्छतेचे शब्द मात्र रोज गिळण्यास, या

निरुपद्रवी अतिशूद्रांस कधींही ऐकवूं नका व त्यांची छिथू करूं नका. एकाद्याचें हृदय दुखविणें म्हणजेही हिंसाच होय असें आपला श्रेष्ठ सनातनधर्म सांगतो; पण असल्याच विषारी फुत्काऱ्यानें व वरिष्ठ जातीकडून पदोपदीं होत असलेल्या निर्भित्सनेनें लाखों शूद्र, अतिशूद्र, बाटून परधर्मीय बनले. तितके लाख हिंदबंधु आम्ही विनाकारण गमावून बसलोंना? आधींच्या मूर्तिपूजकांना, भक्तांना पर्यायानें आम्हींच ना मूर्तिभंजक बनविलों? भविष्यकालांतील वाढणारी शताधिक संख्या आज शतपटीनें कमी केली! उरलेल्यांचीही तशीच दैना चालू ठेवल्यामुळें संकटकालीं धावून मदत करणारेच नित्य नवीं संकटें उपस्थित करूं लागले. पूर्वीचे जीवाला जीव देणारे आमचे दासानुदास शूद्र आज जीव घेण्याकरितां टपून बसण्याइतके द्वेषी बनले. मांडीला मांडी लावून बसणारे वैश्य आज आमचा विश्वास धरीनासे झाले. जीवश्च-कंठश्च मित्र म्हणविलेले क्षत्रियसुद्धां विश्वासघातानें गळा दाबण्याच्या विचारास लागले — अधिक तर काय - गोब्राह्मणप्रतिपालक हें ज्यांनीं स्वसंतोषानें, स्वाभिमानपूर्वक ब्रीद धारण केलें त्यांच्याच वंशजांनीं आज आपलें वचन असत्य करून, उलट शक्यतों छल करण्याचा विडा उचलला. वरचेवर अधिकाधिक असाहाय्य होत चाललेल्या दुबळ्या ब्रह्मसमाजास मुद्दाम ब्रह्मद्वेषी मिळवून छलकसमाजाचें धुरीणत्व स्वीकारूं लागले. आम्ही आमची वागणूक सौम्यपणाची आणि तशीच जीभ तेवढी ताब्यांत ठेविली असती तर अशी पाळी आज कधींही येतीना!

जगन्ना० — अहाहा! तुमचें हें कळकळीचें सत्य भाषण आणि त्याचा प्रत्येक शब्द तप्त कढईतील तेलाप्रमाणें माझ्या कानांत शिरत आहे. मागील ऐश्वर्य आणि आमच्या गढीवरील जुन्या महाद्वाराचें तें बाळपणांतलें दृश्य आठवूं लागलों, तर हातभर लांबीचे व वीतभर

रुढीचें कौपीन व ती फाटकी काळी कामळी पांघरलेले पण लोखंडा-प्रमाणें टणक दंडाच्या पौलादी पंज्यांत तीक्ष्ण कोयता व एक बरचा घेऊन कृतांतसदृशालाही दारांत फटकूं न देणारे — पण आमच्या समोर पाळीव, इमानी कुत्र्याप्रमाणें दीनवदन करून अदबीनें, अत्यंत सलगीनें "जोहार मायबाप" करणारे — कितीतरी वेसकार, मजकुरी रात्रंदिवस आनंदाच्या लकेऱ्या मारीत पहारा करीत असलेला देखावा मनश्चक्षूसमोर उभा राहिला आहे! तुम्ही म्हटल्याप्रमाणें खरोखरच एक एक कमी होत होत आतां एकच कायतो म्हातारा वेसकार उरला आहे. ते लोक गेले म्हणून गरज कांहीं गेली नाहीं. वाडा आणि पिकाच्या रक्षणार्थ तितकेच पण परकीय शिपायी ठेवावे लागलेच. ते बिचारे फक्त पोटावारी पडून होते आणि पोरा-बाळांचें उष्टें खाऊन आशीर्वाद देत होते, तर या शिपायांना १२, १५ रुपये पगार देऊनही यांच्यात ती कृतज्ञता व तो अभिमान, उत्साह चुकूनही दृष्टीस पडत नाहीं. असो. मागील आठवण अधिकच चित्त उद्विग्न करीत आहे. माझे ते पूर्वींचे सर्व विचार पार बदलून गेले. माझें हृदयाकाश निरभ्र आणि निर्मल बनलें आहे. जानबाकडे जाऊन कडकडून भेटण्यास मी अत्यंत उत्सुक झालों आहें. चला वकील साहेब! चला!!

वसंतराव:—वा:! काय आश्चर्यकारक आणि अकल्पनीय स्थित्यंतर हें!!! अहो देशमुखसाहेब! थांबा, थांबा, ते पाहा आमचे कृष्णराव कारकूनच इकडे येत आहेत आधींच त्यांना मीं जानबाकडे पाठविलें होते. तुमच्या दसपट या प्रकरणाची मला काळजी आहे हें कांहीं निराळें सांगणें नको. जानबाची प्रकृति तीन दिवसापूर्वीं निराशाजनक दिसली म्हणून दवाखान्यांतून त्यास डॉक्टरानें जेव्हां घरीं परत केलें, तेव्हां प्रभाकरपंत दादासाहेबांनीं — प्रत्यक्ष ते आपले पाठचे भाऊ त्यांना माझ्या शतपट काळजी असावयाचीच! त्यांनीं — माझ्या

सूचनेनें वरून १०० रु. तत्काल दिले होते. दादासाहेब व मी उभयतां त्याच्या येथें गेलों. ती शंभराची नोट पाहतांच त्या बिचाऱ्यास इतका आनंद झाला कीं हर्षवायूनें सन्निपात होतो कीं काय अशी भीति वाटूं लागली; पण जवळच बसलेला त्याचा एक जातभाई म्हणाला कीं, "माझ्या जवळ अशी अशी जडीबूटी आहे कीं या जखमेची काय बिशाद! कसल्या कसल्या भयंकर जखमा मी दोन दिवसांत नीट केल्या आहेत. कांहीं काळजी करूं नका. आजच्या तिसऱ्या दिवशीं पाहा हा उठून बसलेला दिसेल." आणि खरोखर — त्यानें म्हटल्या-प्रमाणें झालेंही!

कृष्णराव:–(प्रवेश करून) रावसाहेब! हा पहा जानबाचा राजी-नामा! आज तो घरांतल्याघरांत हिंडूं फिरूंही लागला आहे.

जगन्नाथराव:– अहाहा! काय हा अकल्पनीय आनंद! वसंत-राव! तुमचे अनंत उपकार आहेत. जानबाच्या उपकारभारानें तर मी जन्माचा लवून गेलों आहें. या पुढें जन्मभर असाच सर्व हिंद बांधवांसमोर सदोदित नम्रच राहीन.

सर्व :– हे जगच्चालक, दयानिधि परमेश्वरा! सर्व हिंदबांधवांना आणि भगिनींना अशीच सद्बुद्धि दे!!!

पद (चाल. खरा तो प्रेमा.)

देईंगा ईशा सन्मति हिंदजनां ॥ ध्रु० ॥
जागीं आम्हि वाढवुं प्रेम असें ना –
आठवे द्वेष कुणां ॥१॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्रा. द.
श्रा. शु. ८ शके १८४९
७–८–१९२७ इ. शनिवार.

(८)

# नाट्य छटा.

## " वेडा "

सोडा! सोडा!! मला सोडा!!! काढा हा माझ्या भोंवतालचा वेढा! मी वेडा का वेडावणार वेडा?. काय वाटेल तितकें, कसेंही, कितीहि, खुशाल ओरडा...नाहींच मुळीं मी वेडा...उगीच एकाद्या शहाण्यासुरत्याला म्हणावे वेडा? मला वेडा म्हणणारेच वेडे...तर मग मी नाहीं बुवा वेडा ! माझा अण्णाच खरा वेडा! पण अण्णा तर म्हणवितो शहाणा! ज्याला वाटतें मी शहाणा तोच तर खरा खुरा वेडा!! तर मग मी होतों बापडा पुन्हा वेडा! मी एक वेडा!! माझा अण्णा दुसरा वेडा! अरे पण–एकाचे जर दोन झाले वेडे–मग, मी वेडा खरा...का तो खरा? हाऽत्याच्या! आतां काय करा? जऽऽर! तर मग ... या तर समोर–मला आणि त्याला वेडा म्हणणारे कोण कोण ते? तुम्हीं ठरवलेला एकच वेडा होता आधीं, तर आतां झाले दोन वेडे!! आम्ही वेडे, आमचे चार वेडे...तर मग...ज्याला आतां या घटकेला म्हणावयाचें असेल आम्हांला वेडे!! त्यांनीं चट्कन काढावे चार चार पेढे. आतां आहों दोनच आम्ही...पहा बुवा तुमचें तुम्ही...जर का यांत आला असाच कुणी तिसरा–मग तुमचें तें पेढे चुकविणें विसरा!

जर का आलाच, तर?. पट्टा काढावे लागतील वेत्रिक् सहा, सरसहा-हो! दोन वेडे ठरले कीं, तिसरा झालाच आपोआप शहाणा...दोन शहाण्यांच्या भांडणांत आला तिसरा कीं तो ठरतोच दोघानांही वेडा आणि ठरतो आपणच काय तो शहाणा! मग तसा त्याला तुम्ही म्हणा, कीं ना म्हणा! कुणी म्हणतील...आ पसरून बसल्या जागीं... काय ऐकावें याचें-हा आणि याचा अण्णा दोघेही वेडे पीर!" वेडे? अन् तेही – पीर?. वेडा पुरवला बुवा एकदाचा; पण...नको तें होणें वेडेपीर ..पीर बनला कीं, लागला फडफडायला तशांचा फडफडाट. मुलांच्या ओरडण्याचा गोंगाट, उगीचच्या उगीच गर्दी दाट! कोठेंही असतोच म्हणा वेड्याचा तसला थाट!! त्यांतही जर पीर होऊन जरा रस्त्यावर निघाला कीं, जमले पांच, पन्नास साठ...भोंवताली व लागले करायला धूला-याली–असेंसें होऊन बसेल! शहाणा असला तरी साध्या गोंगाटानेंसुद्धां सहज वेडा बनेल! मग, तसल्या ताशांच्या मोठ्या गोंगाटांत मोठाच वेडा बनेल!! तेव्हां मग शहाण्याचें खरें सूख कळेल!!! तर मग मी वेडा होऊं. का फिरून?...का...राहूं तसाच शहाणा?...आईनें माझें लग्न केल्यास...मग तर कोणी म्हण-णार नाहींना वेडा?. कारण, वेड्याचं लग्न होत नसतं अशी सांगीतली आहे खूण माझ्या मावशीनं!. मग?...ऐकाव्यात अशाच चार चौघांच्या–नव्हे स्वतःच्या तेवढ्या हिताच्या गोष्टी! तरच कोणी होईलना शहाणा! उगीच वडबडण्यानं,...नुसती वडवड ऐकण्यानं-सुद्धां...हो, हो! तर! मोठ मोठे शहाणे देखील घरच्या दोनच बायकां-च्या बडबडीनं त्यांचं भांडण ऐकण्यांत, तांडण पाहण्यांत खरोखर वेडे होऊन बसतात! एक बायकोसुद्धां भंडावून सोडते म्हणे आणि म्हणतात दोन पाय पळूंसुद्धां शकत नाहींत तिच्या समोरून! मग? दोन बायकांचा नवरा म्हणजे...म्हणजे...चा आ र पाया... असूद्या...पण–हो! लग्न म्हणजे एक विघ्नच झालें म्हणावयाचें!!

लग्न? हें आहे तरी काय लचांड!!! दोन पायांचा...त्याला... म्हणतात माणूस—तोच एका बायकोशीं लग्न करून रहातो खूश. दोन दोन पायांच्या दोन बायकांचा एक नवरा...म्हणजे झालाचना तो बे दुनी? चार पायांचा!! तर मग, लग्न हें आहे काय? असावं काय? विघ्न का लचांड? हो! कुणी एकानं भिंतीवर लिहिलं होतं एक वाक्य कोळशानं...आहे अजून म ग पाठ...काय बुवा तें? हो! "ए वाईफ् इज् ए नाईफ् इन अवर लाईफ्"! नकोच ती लग्नाची कटकट व केल्यानंतर भोगावी लागणारी बायकोची...चारी प्रहराची...वट वट!! आधीं तर शहाणे शहाणे म्हणवणविणाऱ्यांचें होईना लग्न—( म्हैसूर बेंगळूर हुडकल्या वांचून! ) हें कंसांत म्हटलें दरें!— तिथें आम्हा वेड्यांची काय लागावी गणती! घरीं नसते एक पणती...दिवा लावायाला...आणि लागतात तसले शहाणे दिवटी पाजळायाला!! म्हणे...कुठें चालला? तर, "वधू हुडकायला!"...लग्नाची मुलगी मिळविण्याला मुलीच्या बापाच्या दारीं धरणें घेऊन बसणें—नव्हे, तो जुना, टाकाऊ शब्द! टाकावयालाच पाहिजे!! नवा जिवंत म्हणजे सत्याग्रह करावयाचा साधा उपाय—सोडून चांगले शहाणे, समजूतदारसुद्धां पदरीं पैसे बांधून घेऊन बेंगळूर इतक्या दूरदूर, उन्हातान्हांत उगीच वणवण कां फिरतात कोण जाणे! घर बसल्यां निराहार केल्यानें किंवा दारा-पुढची नुसती जमीन धरून बसल्यानें काय वाटेल तें मिळवितां येण्यासारखा सत्याग्रहाचा तोडगा जवळ असतांना सुखासुखी ओढे-फाडी कां? म्हणून...आपण नाहीं बुवा होत शहाणे! आणि होईन तरी कसा? आमचा दादाच झाला आहे आधीं अर्धा शहाणा ... चार इयत्ता कशा तरी सारल्या होत्या मराठींतून मागल्या मराठी मास्तरांनीं सारल्या त्या तेवढ्याच तिथल्या तिथें थबकल्या —पुढें कुठली इयत्ता... आतां राहिली नाहीं मराठी! म्हणून मग...शेंडीपासून शिकावी लागते

## यशोविलास(२).

फारसी किंवा उर्दू! आणि शेंडीच नसते म्हणे तिला!!! तितकी नाहीं आमच्या दादांत चिकाटी...म्हणून बसलाय झालं व्यायामशाळेंत काठी बोथाटी फिरवीत! आलेलंही सगळं गेलं!! तेल गेलं तूप गेलं — हातीं धुपाटणें उरलं—तेथें माझा,--या तिसऱ्या धाकट्या भावाचा काय पाड!!! हें दादाचं विस्कटलेलं झाड कसं काय वाकावं! शिवाय, आम्हांला आज मिळत असलेलं शिक्षण शिकवतं काय? तर झाडाच्या बारीकशा छानदार काड्या कशा कराव्यात तें!!! म्हणूनच वाटतं दादाचा व माझा रस्ताच! रास्त! अज्ञाच म्हणवूं या शहाणा! असले सुदाम — शहाणे म्हणवून घेण्यापेक्षां बदाम पिस्ते फस्त करून आपल्या पायावर आपण उभें राहण्यापुरती शक्ति राखून ठेवूं अंगांत तरी त्रिभुवन जिंकलं!!! शक्तींत सर्व काहीं आलं! जाऊं झालं व्यायामशाळेला!!

बोल बजरंगबली की जय!!!

---

प्रभुदरबार आलीबंडा हैद्राबाद द.
श्रावण वद्य २ शके १८५१
२२ अगस्ट १९२९ इ. गुरुवार.

# ( ९ )

# " विक्षिप्त "

## [ नाट्यछटा. ]

[ पायांत बूट, स्काऊटच्या अर्ध विजारींतून घोट्यापर्यंत आणि वर दिसत असलेल्या धोतराच्या निऱ्या, डोकीवर हॅट, हातांत बंची, आंत जाकीट, कोट त्यावर गुंड्या न घालतां उघडी अशी घोळदार शेरवानी, हॅटच्या आंत गांधीटोपी. हॅट, बूट आणि शेरवानी काढिली कीं, खादीच्या देशी पोषाखांत दिसून येणारा मुलगा. ]

मी एक तुमच्यांतलाच – गरीब म्हणून... सगळ्यांच्या आवडी-प्रमाणं, निमुटपणानं – गरिबीनं वागणारा म्हणून लागले सांगायला कुणी कसें, कुणी कसें... मीही वेडा... वागूं लागलों शिकवितील तसें तसें... हो ! सुधारलेला पोषाख चढवला तुमच्याचना चिथावणीनं ? वर वर, तरी जुने ठेवूं लागले मला दूरवर – म्हणून गरीबीचा, खादीचा – आपल्या देशाचा पोषाख करूं लागलों, तर पुढें फडकलेले माझ्याशीं फटकून राहूं लागले हें पाहून केला दोन्ही पोषाखांचा स्वीकार ! तर चारचौवे चहूंदिशीं तोंड फिरवून नाकें मुरडूं लागले. कोणी तर तोंडावरसुद्धां "काय चालवलं हे वेडे वेडे चार" असें म्हणूं लागले. जुन्या कालांत अक्षरशत्रूंनाच म्हणत असत वेडा म्हणून –

१०

लिहितां वाचतां न येणं शोभतंही अक्षरशत्रूला; पण या नव्या कालांत पुष्कळ शिकून, विलायतच्या पांचचार वाऱ्या करून, पांच पन्नास हॅट फाडून, शेंदोनशें बूट झिजवून मिळवावा लागतो मग आधींचा व आपल्यांतलाच शहाणपणा! सुधारणेची मख्खी कळली आणि लागली दहावीस वेळां जिथें तिथें ठोकर कीं, प्रत्यक्ष लकडीवांचून मकडी वळतेच आपोआप! आधींचा तोरा मिरवणारा नंतर जरी गरीब झाला, तरी त्या बिचाऱ्याला खुशाल म्हणतात वेडा! हें सर्व पाहून, "व्यक्ति तितक्या प्रकृति" म्हणून त्यांची आवड ध्यानांत आणून जुन्या व नव्या दोन्ही पोषाखांचा असा खासा उपयोग आतांशा करूं लागलों. तरीपण जनता मला वेडा म्हणावयाची म्हणतेच अजूनसुद्धां — म्हणून आजही केला आहे विचित्र पोषाख मुद्धा! स्वभावानें गरीब, तरमग कसा म्हणवेल तो वेडा? म्हणून तर असला माणूस म्हणवतो वेडा!!! वागावं तरी कसं वागणाऱ्यानं! बड्यांची हाव धरणाऱ्यानं!! शहाणं म्हणवून घ्यावयाचं असेल तर तो सपशेल फसेल! मी तर विक्षिप्त जाणून बुजून ठरलेला — वाटल्यास वेडाही म्हणा खुशाल मला; पण असं जरा पाहा — जनावरंच बघा...भूक लागली कीं, घालतात झडप — पक्षीही टिपतात टपटप — मीसुद्धां भूक लागली कीं, धरतों स्वयंपाक घर...आई म्हणते "घर घेतों म्हणे डोकीवर" पण मोठ्या मिशा आलेल्यांना पहावें, तर भुकेनें ते मरतातसुद्धां उपाशी पटापट! कितीतरी! किती वेळां तरी!! पण भूक लागली आहे म्हणून हातपाय हलवावेत हेंदेखील त्यांना समजत नाहीं! का उमजत नाहीं!! कीं, समजून उमजून, चांगली कळूनसुद्धां वळत नाहीं? "कळतें पण वळत नाहीं" हेंच खरें असावें! असले लोक म्हणजे उगीच श्वास सोडणारीं जिवंत माणसं म्हणवतात झालं — नाहीं, तेवढंही नाहीं ... श्वासतरी सारखं कुठं सोडीत मरतात! थंड निश्वास सोडीत जगतात!!

लिहितां वाचतां न येणं शोभतं वेड्याला; पण सर्वकांहीं येत असून, हात असून कांहीं एक न करणं, बोलता तेवढं येतंय म्हणून नुसती बडबड करणं तीही वर्षांतून एकदोनदां उन्हाळ्यांतून किंवा पावसाळ्यांतील गणेशोत्सवांतून...तर मग निवडूं ह्या शहाण्यांनाच वेडा कोण तें! गरीब लोक नुसत्या अन्नानंच नव्हें—पाण्यानंसुद्धां मरतात, मोटारीनं मरतात! कोणी पेट्रोलनं जळतात पट्‌दिशीं, तर कोणी विजेनं मरतात खट्‌दिशीं—अं ऽ—नुसत्या झटक्यासरशीं मरतात झट्‌दिशा; पण आपण मरतों हेंसुद्धां कळत नाहीं एकादिवशीं!! मग आतां असं म्हणावं लागेल कीं, ज्याला आपण विनाकारण पटापटा मरतों हेंदेखील समजत नाहीं तोच खरा खरा वेडा! अट्टल वेडा!! तर मग टाकूं का त्याच्या अंगावर हा कपडा? सुदामदेव शहाण्यापेक्षां धडधाकट पुरवला वेडा—मग? शहाण्याशहाण्यांतच चालू द्यावं झालं खडाजंगी झगडा! ठरूं दे तर खरं एकदाचं कोण शहाणा आणि कोण वेडा तें!! परवां झाली एक मजा—झाला असेल एक आठवडा—मीं खायला आणला पैशाचा चिवडा, चिवडावाल्यानं बांधला त्याचा पुडा, आलों घेऊन माडावर चढत धडधडा आणि केला फस्त सबंध तेवढाचा तेवढा चिवडा; पण चावीत चावीत पुड्यावरील छापील मजकूर वाचीत होतों मधून मधून ... चावतां चावतां, वाचतां वाचतां समजलं कीं, महात्माजींच्या मोटारीखालीं म्हणे माणूस मेला—तें होतें चिटोरें नागरीकाचें...जाऊं द्या आम्हाला काय! आम्ही तर जाणूनबुजून वेडे!! त्यांत आणखी मुलं!!! ह्यः ह्य ह्य ह्य ऽ! हास! हास! मना! हास, खुशाऽल हास. कोणालाही हास!! कोण विचारतो कुणाला!!! आहे तर खरं..."लहानतोंडीं मोठा घास" उगीच का चिवडा चिवडा? हा एक वेडा, तो एक बडा, तर त्याहून दुसरा? बड्याहून बडा!! उगीच बड्या बड्यांच्या गोष्टींत गरीब दुबळ्यांचा चुथडा!!! म्हणूनही चालला बघा हा वेडा!

[ जातां जातां परतून – शेरवानी, हॅट, बूट काढून पुन्हा ]

गेला तो वेडा...उच्च शिखरास पोंचलेल्या सुधारलेल्या पोषाखांतला म्हणून म्हणवला गेलेला–"वेडा" म्हणा लागेल तर–मी तर जाणून बुजून वेडा...पण–पण... तुमचाच एक देशबंधू! देशवेडा!! वेडा भाबडा!! नागडा!!! गरिबीमुळं या साध्या पोषाखांत म्हणून का म्हणतां वेडा? म्हणा तर म्हणा खुशाल वेडा! वेडाच असतो सदा-सर्वदा खुशाल! शिवाय, वेड्यालाच असतो आपल्या वेड्या, भाबड्या गरीब देशबंधूंकडे जिव्हाळ्याचा ओढा! [जातां जातां थबकून] वेडा नसून वेडा म्हणवावयाचं म्हणनूनही मिळालामात्र नाहीं पेढा...चला तर मग राजेश्रीयाविराजित! तडक माजघरांतल्या खोलींत. खाऊचें कपाट आधीं उघडा...दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहात भोंवळ येऊन कोलमडून पडेपर्यंत वाट पाहात बसण्यापेक्षां आतांतरी आपल्या पायांवर ज्याचं त्यानं उभं राहवं!! तरच मग बस्तान जमेल! नाहींच जमलं कांहीं, तर सत्यग्रह करावा! तरीही नाहीं जमल्यास?... (डोकें खाजवून) नाहीं जमल्याऽऽस...सुरू केलेला सत्याग्रह संपवून अत्याग्रह सुरू करावा!! हामात्र नुसता सुरू करूनच नव्हे, तर पुराच करून बघावा–तरच जोरदार जम बसेल आणि जमेलही सारें!!! हसा रे! हसा रे मुलांनो!! आणि...तुम्हीही सारे!

प्रभुदरबार, शालीबंडा, हैद्राबाद द.
श्रावण वद्य १ शके १८५१.
२१ ऑगस्ट १९२९ इ. बुधवार.

# ( १० )

# वेडा का शहाणा ?

## [ नाट्यछटा. ]

( अर्धभाग स्वच्छ द्वितीयार्ध शाईनें भरलेल्या कपड्याच्या वेषांत )

मी ! मग कोण ! ! वेडा का शहाणा ? वेडा कां म्हणेणात कोणी ! का दोन्हींच्या दोन्ही ? माझ्या अंगांतील कपडाही म्हणतो बघा— 'दोन्हींच्या दोन्ही' म्हणून. उजवींतून आवाज येतो शहाण्याचा, तर डावीबाजू वडबडते "वेडा, वेडा, वेडा." माझे अजोबासुद्धां. पण कधीं-मधीं म्हणतात 'मन्याबापू म्हणजे शुद्ध, वेडा.' वेड्याला शुद्ध हें काय आहे शेपूट आणखीं बुवा ! छे, सब झूट ! मग मी शहाणा— कधींकधीं काकाही म्हणतातना—'मुलगा दाणा पण दाणा.'—मग काय, वेडा का शहाणा ? का—वेडा ना शहाणा ! ! दोन्हीही नकोत... मी राहतों या दोहोंहून दोन दोन कोस दूर...अगदीं अलग, निराळा; पण अज्जी म्हणते दादास—"बाळा ! सांगूं तरी आतां कितीवेळां— सोडीत जाऊं नकोस बापूला असा बाहेर म्हणून." तर मग...कामून ? मी काय आतां लहान आहें होय ? अगदीं कुक्कुला बाळ तो— आतांशा कसा छान बोलतों, व्याऽख्यानसुद्धां देतों—परवांच बाबांनीं मला पाट करवलं ना एक तसंच गोडसं...हो खरंच...मग मी झालोंच ना शहाणा—नको—चालूं द्या शहाण्याशहाण्यांत आणि वेड्यावेड्यांतच आपापसांतील शहाणपणाचा धिंगाणा. हो ना ? शहाणा म्हणवला एकदा कीं, लागतो तो वेडा होण्याच्या मार्गाला व वेडा म्हणून का एकदाचा

ठरला आणि त्याचा तसा डंका पिटला, तरच तो येऊं लागतो रस्त्याला ...अरे, हो! आईच म्हणतेना वरचेवर 'वेडा बापू, वेडाबापू' त्याचं कसं काय करायचं मग? आमचे बचंभटजीही मला बवलांच म्हणतात बघा – नाक कापूं? का कान कापूं? आईचें ऐकून ऐकून शेजारची ठकुकाकूही म्हणूं लागल्या आतांशा 'वेडा बापू.' परकर-का पटकर-नेसून फिरणारी एवढीशी पोर मायीसुद्धां म्हणूं लागली 'वेडा रे वेडा'... वेडी हो वेडी! खरोखर वेडी ... आधीं तर मायी ही पोर एवढी टीच भर!! तीही बोवडी – बापडी, वेडी-भावडी – हो! भावडीच... मायीची मावशीसुद्धां तिला मायी न म्हणतां हांक मारतांना म्हणते 'बावडी, बावडी!' ...वेडी ती वेडी वर पिजारा पहा केवढा... मला म्हणते "वेडा, वेडा"! उलट मी तिला "वेडी" म्हटल्यास म्हणते "मी नाहीं मुळींच वेडी" कां? तर म्हणते "मोठ्यांत वेडा असला कीं, तो पळतोच रस्त्याला, तर कुणी उकरीत बसतो उकिरडा. घरांत फिरणाऱ्याला कोणी म्हणत नाहीं वेडा; पण मी लहान म्हणून कां बोलून घ्यावींत वाटेल तशीं बोलणीं? बोलूनही घेईन, जर कुणी मला आणून देतील वरचेवर नवीं नवीं खेळणीं!" हो, तर मग – मलाही पण जो उठतो तो फुकटं फाकट म्हणतोमात्र वेडा; पण घालतो का कोणी तोंडात पेढा? वेडा म्हटलं कीं, म्हणणाऱ्यानं दिलाच पाहिजे पेढा...तो माझाच हक्क आहे! नाहीं का हें? पेढा नाही तर? नाऽहीं तऽर! मी म्हातारा! बऽर! पोक्त म्हातारा, का अल्लड वेडा? वेडा का पोक्त शहाणा? शहाणा का वेडा? वेडा का शहाणा?

---

प्रभुदरबार, शालीबंडा, हैद्राबाद द.
श्रा० व० २ शके १८५१
२२ ऑगस्ट १९२९ इ. गुरुवार.

॥ श्री सद्गुरु माणिकप्रभु प्रसन्न. ॥

# तृतीय खंड.

## उमलत्या

## कलिकांकरितां—

## व्याख्यानें

## व

## लेख.

---

### व्याख्यान.






### लेख.

# (११) उद्योगाचें दैवी भांडवल.

[ व्याख्यान. ]

प्रिय बंधु-भगिनींनो !

मी आज "उद्योगाचें दैवी भांडवल" काय ? आणि तें पुरेसें कोठें असतें हें सांगणार आहें. आधींतर आपल्यास हंसू येईल; पण माझें सांगणें ऐकिल्यानंतर दिसून येईल कीं, आपलें आपल्याजवळच होतें ज्याला शोधून काढण्याची खटपटमात्र खूप आणि तितकीच विनाकारण होती. कसें तें पाहा ! थोड्या वेळांत -- इतकेंच काय, एका वेळांत दोनदोन कामें आणि तीं चटचट करीत राहणें आम्हा बालकांहूनही आमच्या चिमुकल्या भावंडांना अधिक साधलें आहे ! ! इतकी कीं, जशीं कांहीं जन्मापासून तीं तशीं त्यांच्या अंगवळणींच पडलेलीं आहेत ! ! ! थोर मोठेमोठे, पुष्कळ पुष्कळ शिकलेले पाहतों, तर 'हें म्हणजे मोठेंच कठीण आणि पुष्कळ श्रमानें कदाचित् मिळवितां येईल' असें ते व्याख्यानांतून वरचेवर, कितीतरी प्रकारानें घोळून घोळून मनांत ठसविण्याची खटपट करतात !

## यशोविलास(३).

सुख-दुःख, चांगलें-वाईट आणि कायसेसें "प्रिय, अप्रिय" – कशाला एवढा अगडबंब शब्द! आपला सोपा 'आवडता, नावडता' हा शब्द कसा झकास आहे!! आतां पाहा बरें — आम्ही बालवर्ग असल्या आवडीनिवडीला कधीं कांहीं भीक तरी घालतों का? जन्मून कोठें एक वाढदिवस झालेल्या चिम्नाबाबू किंवा चिमूताईनें (बोट दाखवून) "तें" आणि चिमुकल्या तोंडानें "दे" म्हणून एकाद्या वस्तूचा हट्ट घेतला आणि आईनें ती वस्तु न देतां दुसरीच दिली, तरी काय म्हणतात त्याला ("द्वंद्व") तें चटसारें विसरून स्वारी मोठ्या खुशींत येते, दणदण नाचावयासही लागते आणि म्हणे मोठ्याला हें मोठेंच जड जातें! उलट बघा बघावा तो "बाल हट्ट, राज हट्ट" या म्हणीनें जिथें तिथें आम्हा बालकांच्या हट्टाचाच बोकाळलेला दिसतो!! तरी बरेंच, राजाच्या पाटाला आमचा पाट या म्हणीनें जोडला! याहून अधिक बरें तें काय असणार?

आमची खुशी, आमचा आनंद-कांहींही कोणी म्हणो कायम तो कायमच! स्वतःला आनंद मिळावितां नाहीं आला म्हणूनच कीं काय, —माणूस कसाही थकला भागलेला, दगदगीनें कितीहीं त्रासलेला असो– "मुलांबाळांना पाहतांच मात्र मोटा आनंद होतो बुवा!" असें मोठे मोठे "मी मी" म्हणणारे थोरही आनंदानें, मोकळें मन करून म्हणत असलेले आणि म्हटल्याप्रमाणें आम्हाला पाहून आनंदितही होत असलेले रोजच प्रत्यक्ष पाहतोंना आम्ही! मग आम्ही मूळचेच आनंदी! आम्हाला सदाकदा खेळत, नाचत, बागडत राहणेंच आवडतें! म्हणूनच आम्ही आमचा सारा दिवस आनंदांत आणि रात्र गाढ झोपेंत घालवतों. थोर थोड्या कामानेंही थकतात, काळजी थोडी अधिक झाल्यास रात्रभर जागतात किंवा रात्र तळमळत काढतात. आम्हाला काळजी कशी ती शिवतसुद्धां नाहीं कसें याचेंच राहून राहून आश्चर्य

वाटतें! आम्ही घरभर सारा दिवस हजारों खेपा घालतों, धावतों, पळतों शंभरवेळां जिना चढतों, उतरतों, सदाकदा सारखा धिंगाणा घालीत राहतों, तरी "हुश्श" म्हणून पडून राहण्यासारखा थकवा कसा तो आम्हाला ठाऊकच नसतो. धावून धावून दम आला तर दोन, चार मिनिटें थांबलों कीं, पळाला थकवा आपोआपच!! "मुलें विनाकारण कितीखेपा घालतात, महा चपळ बुवा! एका कामाला दहा येरझारा सहज घालतील. कंटाळा कसा येत नाहीं त्यांना?" असें वाडवडील कितीदां तरी आश्चर्यानें म्हणत असलेले दिसतात; पण त्यांच्याप्रमाणें आम्हांलाही आश्चर्य वाटतें तें यावें कीं, हे जरूरी कारण म्हणून एकदा कोठेसें जाऊन आले कीं, अगदीं आरामखुर्चीवर अंग टाकून देण्याइतकें थकतात कसें!! तेंच आम्हा बालकांकडे पाहा! वडील माणसं कांहींही काम सांगोत त्याकरितां आम्ही धावत जातों आणि पळत येतों. पुनः दुसऱ्या कामाला तितकेच तयार!! त्याच एका कामाला आम्ही दोघें तिघें असूं, तर मग चुरशीनें अधिक धावपळ करून जास्तींत जास्त लवकर तें काम करूं. काम झालें किंवा नाहीं झालें तरी त्याचें कांही आम्हांस तितकें वाटत नाहीं, तर सोबत्यानें तें काम मला करूं दिलें नाहीं किंवा मनाप्रमाणें करण्यांत अडथळा आणला याचामात्र राग येतो. काम बिघडल्यास मुळींच वाईट वाटत नाहीं असें नाहीं! केव्हां केव्हां थोडेसें वाटतेंही; पण थोड्या वेळानें तें चट्सारें विसरून जाण्यांतही आम्हांस कांहींच वाटत नाहीं! आणि मोठ्यांनामात्र हें मोठेंच जड वाटतें!! एकादें बिघडलेलें काम वर्षानुवर्षे ते विसरूं शकत नाहींत. कांहींची काळजी तर इतकी वाढते कीं त्यामुळें त्यांचें काळीजच दडपून जातें. काळजी कसलीही आणि कशाचीही न बाळगतां सांगीतलें तें करीत राहाण्यांत आम्हांला हुरूप येतो. सांगीतलेलें साधल्यास काम साधल्याचें, न साधल्याचें कांहीं

एक आमच्या गांवींही नसतें! याचें कारण काय, तर कशांतूनही आम्ही मौज हुडकीत असतों! म्हणूनच कोणतेंही काम मौजेनें करतों.

कांहींतरी सारखें करीत राहण्यांतच आम्हाला मनापासून मजा वाटते. कोणी कांहीं न सांगीतल्यासही सुचेल तें, साधेल तसें तसें सारखें करीत सुटतों आणि त्यांतच मौज मानतों. याबद्दल "काय उद्योग चालवलाय तुम्ही?" अशा हेटाळणीच्या स्वरांत कधीं वाड–वडील आम्हाला विचारतात, तर कधीं कोणी त्रासलेले "हा उपद्व्याप कोणी सांगीतला करायला!" असेंही दरडावून प्रश्न करतात. आमच्या दृष्टीनें हे दोन्ही प्रश्न आम्हाला सारखेच! यांतून जो बोध आम्हाला होतो तो इतकाच कीं, आमचें हें करणें यांना पसंत नाहीं तेव्हां "नाहीं तर नाहीं! हें सोडूं, दुसरें कांही करू लागूं!! त्यांत काय एवढेसें!!!" असें मनाला सांगून चटकन् तसेंच मन लावून लागतोंही तिसऱ्या कामाला; पण स्वस्थ कांहीं बसवत नाहीं आमच्यानें! मला वाटतें कोणाच्यानेंही क्षणभरसुद्धां कांहीं न करतां बसवतच नाहीं. कांहीं ना कांहीं करीत राहिलें पाहिजेच!! मग आम्हांला "स्वस्थ बसा! लहान मुलांनीं गप्प बसावें" असें जें थोर वरचेवर बजावीत असतात त्याचा अर्थमात्र आमच्या ध्यानांत येत नाहीं. सांगतात म्हणून तसें वागण्याचा यत्न करावयास लागलों असें क्षणभर भासवतों; पण तें कांहीं आम्हाला तरी निदान साधत नाहीं, तरी मनाची समजूत घालण्याकरितां तशा प्रसंगीं आम्ही मनांतल्या मनांत एक प्रश्न योजून ठेवतों कीं, "थोर – खूप खूप थोर झाले, तरीपण त्यांना आधीं एकदा लहान व्हावें लागलेंच ना!" उघडपणें कधीं असा प्रश्न विचारीत नसलों तरी उत्तराशिवाय हा सदैव शिल्लक राहिलेला प्रश्न आमच्या मनाची समाधानीमात्र करतो.

माझ्या बालबंधूंनो! "उद्योगाचें दैवी भांडवल" हे थोर जितके दूरदूर हुडकीत फिरतात तितके ते त्यापासून दूरदूरच होत राहतात! आणि देवाच्या दयेनें तें आम्हाला आयतेंच मिळालेलें असतं. माझ्या बालबुद्धीला तर असें वाटतें कीं, आपोआप मिळालेलें घालवून फिरून तेंच मिळविण्यांत नवीन काय मिळविल्यासारखें झालें? असेंही विचारावयाचें कितीदांतरी वाटतें; पण कोणाचेंही मन मोडणें मोठ्याप्रमाणें आमच्याहीपण मनाला बरें वाटत नाहीं. ही बुद्धि कोणी न शिकवितां आधींच आमच्यांत बसत असते. बोलूनमात्र दाखवूं शकत नाहीं एवढाच काय तो आमच्यांत कमीपणा म्हणा किंवा आणखी कांहीं म्हणा; पण याच्याही पुढें मला असेंसुद्धां म्हणावेंसें वाटतें कीं, बोलून दाखविण्यापेक्षां मुकाट्यानें तसें वागत राहणेंच सर्वांत चांगलें. थोरा-मोठ्यांनीं सांगीतलेलें मागें पुढें न पाहतां निमुटपणें — म्हणजे रेंगाळत नव्हे, तर — ताज्या दमानें, जीवाभावानें, आनंदांत भराभर करीत राहण्यांतच आम्हा बालकांना मौज वाटते ना? हीच संवय अशीच जपून चालू ठेविली तर देवानें आम्हांला देऊन पाठविलेल्या या उद्योगाच्या दैवी-भांडवलावर कितीतरी वाढता व्यापार आणि त्या व्यापाराचा व्यापही केवढा मोठा होईल! याची लांबलचक यादी किंवा भला मोठा नकाशा मोठ्यांनींच काढावा. तें काम आम्हा लहानमुलांचें नाहीं. कांहींतरी करीत राहणें हेंच आमचें काम! मग तें कामाचें काम असो वा नसो त्या भानगडींत आम्ही लहान मुलें कधींच पडत नसतों. कारण, जें काम म्हणून आम्ही करूं लागतों तें जीव लावून सारखें करीत सुटणेंच आम्हांला ठाऊक काय. केलें व यानंतर करणार काय हें सांगत बसण्याचें, (म्हणजेच-"दुसऱ्यास शिकवावयाचें" असेंही यास म्हणतां येईल लागल्यास — नुसत्या कोरड्या शब्दांतून व्यर्थ वेळ घालवावयाचें) आम्हांला साधत नाहीं.

आम्ही जें कांहीं व जसेंकांहीं करतों त्याबद्दल वाडवडील किंवा सौद-त्यापैकीं — दुसरेच कोणी केव्हां तरी जें जें कांहीं सांगत असतात तें तें ऐकून आम्ही त्यास कधीं शाबासकी म्हणतों किंवा पाठ थोपटणें समजतों, तर कधीं चहाडी किंवा कागाळी असेही नांव देतों. कांहींही म्हटलों किंवा समजलों तरी मनांतल्या मनांत! बोलून दाखविण्याची पाळी होतां होईल तों दूर ढकलीत राहतों. —

इतकें बोलून बोलल्याप्रमाणें किंवा झालें तेवढें करीत राह-ण्याच्या खटपटीस लागावें म्हणून मी माझें भाषण आतां संपविण्याची परवानगी मागतों.

प्रभुदरबार शालीबंडा, हैद्राबाद. द.<br>
भाद्र. शु. १३—१८५३ गुरुवार.

# (१२) "ब्रह्मचर्य"

[ व्याख्यान ]

---

बंधु-भगिनींनो !

"ब्रह्मचर्य" मानवी जीवनास आवश्यक, तसेंच आयुष्याच्या अभिवृद्धीसही कारणीभूत आहे असें प्राचीन व अर्वाचीन कालांतले सर्वच थोर एकवाक्यतेनें सांगत आले आहेत. विद्यासंपादनाचा काल ब्रह्मचर्यस्थितींतच अनुकूल असतो, याबद्दलही कोणालाच वाद नाहीं. यद्यपि जगांत अनेक पंथ आहेत, प्रत्येक पंथांत विविधता दिसून येत असली, धर्मान्वयें चालीरीतींतही फरक दिसत असला, राष्ट्रीय विविधते-मुळें त्याला देशान्वयें आपादमस्तक पेहरावांत इतर राष्ट्रांच्या दृष्टीनें विसदृशता दिसून आली तरी विद्यार्थिदशेचें पोषणमात्र या ब्रह्मचर्या-नेंच केलें आहे हें कोणताही पंथ, कसलाही धर्म व कोणतेंही राष्ट्र मोकळ्या मनानें केव्हांही म्हणत आलें व आजसुद्धां कबूल करीत आहे.

"ब्रह्मचर्य आवश्यक आहे" यांत एकवाक्यता सार्वत्रिक दिसून येते त्याअर्थी हें ब्रह्मचर्य म्हणजे एक महत्त्वाचें जीवनतत्त्व नव्हे का? यांत विद्येला चालना मिळते, इतकेंच नसून शक्ति, सामर्थ्य व शौर्य या सर्वांची पूर्णताही यांतच साठविलेली आहे हेंही तितकेंच निर्विवाद होय.

ब्रह्मचर्य ज्या देहांत नांदत आहे त्या देहनगरींत कसल्याही रोगाचें वारेंसुद्धां फिरकत नाहीं! आणि याच्या अभावीं रोगांचा झंजावात तेथें बोकाळलेला व भयंकर नासधूस करीत असलेला प्रत्यहीं पाहण्यांत येतो. ब्रह्मचर्याचे नियम यत्किंचितही न चुकतां जो पाळीत असेल तो सर्वांहून सुदृढ व बलवान् असलाच पाहिजे! शरीर निर्बल असेल, तर मनही दुर्बल होतें!! रोगी माणूस चिरडखोर बनतो याचें कारण म्हणजे देहदौर्बल्य!!! शरीरयष्टि सुदृढ करण्याचा उपाय व्यायाम हा जसा ठरला आहे, तसेंच मनःशक्ति वाढविण्यास विद्या व सद्विचार मुख्य आहे! या दोहोंचें संरक्षण ब्रह्मचर्य-परिपालनांत होतच असतें!! आणि हे दोन्ही समान असतील तरच जीविताचें साफल्य होय!!! शरीरसंपत्ति व मानसिकसंपत्ति या ब्रह्मचर्याच्या भक्कम तिजोरींत अव्याहत जपून राहते। इतक्या सर्व सद्गुणांच्या मानानें यद्यपि जगाच्या बाजारांत याची किंमत फार मोठी आहे व तसें कोणीही पूर्ण मान्य करतो, तरी त्याचे गिऱ्हाइकमात्र फार थोडे आहेत असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें! नवीन वस्तु सुधारणा म्हणून जेव्हां जगाच्या बाजारांत येते तेव्हां गिऱ्हाइकांच्या झुंडीच्या झुंडी तिच्या मागें लोटतात; पण ब्रह्मचर्याची सर्वजण किंमत करीत असूनही मोठी किंमत म्हणूनच कीं काय, दुरून पाहूनच मान डोलाविण्यापलीकडे त्यासंबंधीं विशेष आस्था दिसून येत नाहीं. अधिक उपयुक्त वस्तु अधिक किंमतीची असली, तरी एकदा ती किंमत देऊन घेतल्यावर जन्माची आपल्या घरीं राहते व अनेक—पण विहित—गरजा पूर्ण तऱ्हेनें पुरवीत असूनही तिकडे लक्ष्य पुरविलें जात नाहीं असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं!

जें अयोग्य तें केल्यास शिक्षा व योग्य तें न केल्यास उपदेश, अशी निर्बंधपरंपरा अजून चालू आहे. परिणाम या दृष्टीनें

शिक्षेचा उपयोग होत असलेला जसा दिसून येतो तसा ब्रह्मचर्या-संबंधीं योग्य तें न केल्यास नुसत्या उपदेशावरच कोणीही भागवीत असल्यामुळें तो उपदेश तितका परिणामकारक होत नाहीं. सक्तीचें शिक्षण जसें कोठें कोठें चालू झालें आहे, तसेंच ब्रह्मचर्य सक्तीनें पाळावयास लावण्याचा प्रकार जोपर्यंत चालू होणार नाहीं तोपर्यंत ब्रह्मचर्य हा विषय व्याख्यांतून बोलण्याचा नसून आचरणांत आणा-वयाचा आहे हें कसें पटावें?

ब्रह्मचर्याची महति वाढत्या वयानुसार वाढणारी आहे! आणि तेव्हांचेंच ब्रह्मचर्य खरें! तशी परिस्थिति प्राप्त करून देणें हें महनीय व्यक्तींचें कार्य, कर्तव्य व अधिकार होय. सबब माझ्यासारख्या मुलानें अशा महत्त्वाच्या विषयावर विशेष काय बोलावें म्हणून हें भाषण एवढ्यावरच संपवून मी आपणा सर्वत्रांची रजा घेतों.

प्रभुदरबार. शालीबंडा, हैद्रा. द.
भाद्र. शु. ३ शके १८५३ सोमवार.

# (१३) "मुलींचीं कर्तव्यें"

प्रिय भगिनि–बंधूंनो!

"मुलींचीं कर्तव्यें" काय हें माझ्यासारख्या मुलीनेंच सांगा-वयाचें म्हणजे आधीं आपणांस जरा आश्चर्य वाटेल, पण असें पहा! प्रत्येक माणूस आपापल्या बुद्धीप्रमाणें "आपलें कर्तव्य काय? आणि तें कसें पार पाडावें" याचा विचार ज्याचा तोच ठरवीत असतो आणि असें झालें तरच त्याप्रमाणें वागण्यास सोपेंही पण जातें! तेव्हां मुलींचीं कर्तव्यें काय" याचा विचार आम्ही मुलींनींच केलेला बरा नव्हे का?

रोजच्या अनुभवावरून पाहतां आईच्या हाताखालीं चट्‌चट् कामें करणें, तिच्या प्रत्येक कामास हातभार लावणें, एवढेंच आमचें कर्तव्य असावें असें वाटतें. त्यावरून आई वरचीं कामें करीत असतांना तिच्या मागोमाग माजघरांत, स्वयंपाक करीत असतांना तिला लागेल तें आणून देण्यास सैंपाकघरांत, आणि जेवणीं होऊन कामधाम संप-ल्यावर घरकुलांत फुरसतीनें लुटुपुटु खेळण्यांत आम्ही आपला काल हसत-खेळत घालवितों आणि हेंच आपलें—त्याचप्रमाणें आवडीचें—कर्तव्य असें समजतों; पण विचार करून पाहतां यापेक्षां अधिक काहींतरी करावयास पाहिजे असें केव्हां केव्हां वाटतें.

पुराणांतून ऐकिलेल्या मागल्या कालांत म्हणजे ऋषिकालांत कंदमूल फलाहार असल्यामुळें सैंपाकाचें काम विशेष नसावें म्हणून मुलींच्या आया तपानुष्ठानास लागणारें पूजासाहित्य पुरविण्याकरितां झटत होत्या, तर मुली आश्रम स्वच्छ ठेवण्यांत व आश्रमाची फुल-बाग फुलविण्यांत आनंद मानीत असत. यानंतर म्हणजे इतिहास-कालांत ब्राह्मणांस क्षत्रियकर्मे करण्याचा काल आला तेव्हां स्त्रियांदेखील निशाण मारणें, फेकपट्टा वगैरे युद्धकर्मे शिकून तरवार वापरूं लागल्या आणि प्रसंग पडल्यास लढाया मारून विजयही मिळवूं लागल्या! म्हणून मुलींही घोड्यावर बसणें, निशाण मारणें, कवाईत करणें इत्यादि शिकण्यास – घरकुल्यानंतर – घरचें अंगणही सोडून दूर मैदा-नांत जाऊं लागल्या. त्यानंतर पुरुषांना वैश्यवृत्ति स्वीकारावी लागली तेव्हां स्त्रियांनीं पैसा, दाणागोटा आणि घर राखण्याचें काम आपल्या-कडे घेतलें. त्यानंतरच्या पडत्या कालांत जेव्हां पुरुषांना नोकरी चाकरी करण्याचे दिवस आले, व्यापार परक्यांच्या हातीं गेला, घरीं बसल्या अंगमेहनतीनें कलाकौशल्यतरी वाढवावें म्हटल्यास तिथेंही वाव मिळे-नासा झाला, तेव्हां घरची सगळी व्यवस्था स्त्रियांकडे आली! त्यामुळें सैंपाकाबरोबर भाजीपाला इत्यादि वस्तूंच्या ने-आणीचा, देवघेवीचा हिशेबठिशेब ठेवण्यास आणि फावल्या वेळीं साधेल तेवढें कलाकौशल्य वाढविण्यास, त्यांना आपल्या नेहमींच्या पाकसाहित्याखेरीज पुरुषाच्या साहित्याशींही संबंध आणणें जरूर वाटूं लागलें! आणि म्हणून स्त्रियांच्या चांगल्या दिवसांत कला म्हणून मौजेखातर शिकलेल्या कलाकौशल्याचा उपयोग पुढें वाईट दिवसांत, अगदीं नडेल तेव्हां संसार-खर्चास हातभार लावण्यांतही होऊं लागला!! अशावेळीं आम्हा मुलींच्याही हातांत सुई-दोरा खेळूं लागला, बुकें आलीं, मुलां-प्रमाणें आम्हींही पाढे पाठ करूं लागलों, गणीत शिकलों.

एकूण काय, आईला मदत करणें हें आमचें पहिलें कर्तव्य! आणि त्याप्रमाणें त्या त्या स्थितींत आम्ही आपल्याकडून यथाशक्ति झटलोंही पण!! आतां आमच्या या धडपडीनें थोडी-फार तरी मदत होते, होऊं शकते कीं नाहीं ही गोष्ट निराळी! कारण, कशीदा काढण्याचें किंवा एकादी वेलबुटी काढण्याचें काम आई करीत असतांना तें आम्हा मुलींना चटकन् थोडेंच साधणार! आणि साधत नाहीं म्हणून मुलींची जात स्वस्थ तरी थोडींच बसणार!! कांहीं ना कांहीं खटपट, लुडबूड आम्ही आपल्या समजूतीप्रमाणें करीत राहणारच्च! निदान बोटांना सुया तरी वरचेवर बोचून घेत राहूं!!! हें झालें तरी अगदींच व्यर्थ कांहीं जात नसून या अशानें कामें योग्य रीतीनें करण्यास ज्या गोष्टीची काळजी घेणें जरूरी असते तिचें अगाऊ शिक्षण मिळाल्या-सारखें नाहीं का होत? असो.

आतां आपणांस आजकालच्या कालमानानुरूप काय करणें उचित दिसतें हें पाहूं! पुरुष जेव्हां सार्वत्रिकरीत्या जरीचे कपडे वापरीत असत तेव्हां आम्ही त्यावर मोत्यांच्या झालरी वगैरे विणीत असूं. पुढें जरीचा कपडा जाऊन रेशमी वस्त्रें आलीं तेव्हां रेशमावर जरीचें काम आम्हीं करूं लागलों. त्यानंतर सुती कपडे आले तेव्हां त्यावर रेशमाचा कशीदा काढणें चांगलें वाटूं लागलें! असो. आणि आज तर सर्वजण खादी वापरण्यांतच भूषण मानीत आहेत, तर मग आम्हीही आज फावल्या वेळांत चरख्यावर सूत काढणें हेंच आपलें कर्तव्य आहे असें समजूं.

वेळ फार झाला नाहीं का? तर मग थांबत्येंच मी आतां!

प्रभुदरबार. शालीबंडा, हैद्राबाद. द.
भाद्र. शु १० श. १८४४
१ सप्टें. १९२२ शुक्रवार.

# (१४) थोरांचीं चारित्रें

प्रिय बंधु भगिनींनो

ज्यांना थोर व्हावयाचें असेल त्यांनीं थोरांचें चरित्र कित्या-प्रमाणें नेहमीं डोळ्यांसमोर ठेवून आपल्या प्रत्येक कृतीला तसें वळण घेण्याची संवय लावावी. पोरांपासून थोरांपर्यंत एकूण एकाला थोर म्हणवून घेण्याची इच्छामात्र खूप जोराची असते; पण थोर होण्याचीं साधनें कांहीं लहानसहान नसतात व जीं असतात किती कठीण असतात व तीं अंगवळणी कशीं पाडून घ्यावींत इकडेमात्र लक्ष्य असावें तितकें दिसून येत नाहीं. हावमात्र असते; पण धाव तशी त्यांच्यांत नसते—म्हणून "लहान तोंडीं मोठा घास" अशा एका म्हणीनें अनेकांकडून त्यांचा उपहास होत असतो. ज्यांना थोर होण्याची खरोखरच मनापासून तळमळ लागलेली असते त्यांनीं तो तो मार्ग आधींपासूनच उत्तम चोखाळून ठेवलेला असतो व नित्य नियमानें, मोठ्या प्रयत्नानें त्याची पावलोपावलीं पूर्ण काळजी घेऊन त्याप्रमाणें ते प्रत्यक्ष वर्तन चालू ठेवतात. ज्यांनीं आवश्यक साधनांचा सरळ व मोठा राजमार्ग स्वीकारिला त्यांनींच पूर्णपणें थोरपणा मिळ-वला, इतकेंच करून भागलें नाहीं, तर वेळोवेळीं ध्येयस्थलीं थोड्या वेळांत अचूक पोंचतां यावें म्हणून त्यांना मिळणाऱ्या अनेक वळ-णाच्या लहानसहान पायवाटा, बोळदेखील न सोडतां अनेकवेळां

ते सर्व मार्ग पायाखालीं घालण्याची त्यांनीं खबरदारीही घेतली. थोर होऊं इच्छिणाऱ्यांना आधीं त्या त्या मार्गांतील खाचा खळग्यांची व आडवळणांची संपूर्ण माहिती मिळवून प्रसंगविशेषीं दुःख आणि संकटांच्या अनेक ठेंचा खाऊन चांगलें कणखर व्हावें लागलें. केव्हांही, कशाही अडचणींत हिरमुसलें होण्याचा प्रसंग येऊं न देण्याइतकें हृदयाला स्वतःचे आणि इतरांच्याही अनुभवाचे धडे अहोरात्र शिकवावे लागले.

थोर कुणाला व्हावेंसें वाटत नाहीं? मुलांनातर "केव्हांचें एकदा थोर होऊं असें झालेलें असतें. समजो किंवा न समजो, तशी वागणूक पुढें चालून आपल्याकडून घडो किंवा न घडो; पण पहिल्यापासूनच प्रत्येक उपदेश आदरानें ऐकून घेण्याची जशी संवय आम्ही आमच्या मनाला लावून ठेवतों, तें मन किती वेळांतरी म्हणत असतें कीं, "हाच उपदेश दुसऱ्यांना करण्यांत तुझा पोरपणा आडवा येत आहे, एकदाचा थोर हो म्हणजे झालें—सर्व वाटा आपोआप मोकळ्या होतील." लगेच अशी एक शंका डोकावते कीं, थोर होण्यास जितकें वय पाहिजे तें इतक्या लवकर, बाजारांतल्या वस्तूप्रमाणें पाहिजे तेव्हां कसें प्राप्त होईल! पण असेंही ऐकण्यांत व पाहण्यांतही येतें कीं, जे थोर आहेत त्यांना वयाची ही आडकाठी मान्य नाहीं. नुसत्या बुद्धीवरूनही थोर म्हणण्याची त्यांची मोकळ्या मनानें तयारी असते. तरमग या बुद्धीच्या साधनाला वयाप्रमाणें स्थल, काल याचीसुद्धां अडवणूक कशाला? कारण, आम्हा मुलांना परमेश्वराकडून अनुकरणप्रिय हृदय जन्मापासून मिळालेलें असतें. अनुकरण तर करावयाचें; पण तें कोणत्या प्रकारचें? जोकरसारखें अनुकरण नव्हे! पारव्याचा उडतांना टाळ्यासारखा आवाज ऐकूं येतो म्हणून जोकरदेखील काम करतां करतां स्वतःच टाळ्या वाजवीत राहतो!! टाळ्या दुसऱ्यांनीं वाजविल्या पाहिजेत !!!

केवल वयानें कोणी पुष्कळ जरी थोर असला तरी त्याच्याकडून तशीं कार्यें घडल्यावांचून कोणीही त्याला थोर म्हणत नाहीं. तशी कृति घडण्यायोग्य हृदय बनविण्यास थोरांच्या चरित्राचा कित्ता हाच योग्य यत्नाचा ओ ना मा असतो. यालाच "अ नु क र ण" म्हणतात. तें अनुकरणप्रिय हृदय जगाचा जो आईबाप, प्रभु त्यानें जन्मतःच आपल्या लेकरांना देऊन ठेविलेलें आहे. लहान अर्भक शिशु होतें. शिशु बालक होतो, बालक लहान-मुलगा म्हणवतां म्हणवतां थोर-मुलगा होतो. थोरांचें चरित्र अहोरात्र डोळ्यासमोर ठेऊं तरच आम्हांस तसें अनुकरण करतां येईल. तसें केल्यास पूर्वीचा पोर थोड्याच अवकाशांत थोर म्हणवूं लागेल. एकदा थोर म्हणवूं लागल्यावर पोरकटपणाचा तिटकारा त्यास येऊं लागतो व तो तसाच वाढत जाऊन पोरच खरा थोर बनतो! त्याची खूण म्हणजे अशी कीं, जो स्वतः थोर होण्यासाठीं ज्या ज्या प्रकारची खटपट त्यानें आपल्याबद्दल जशी जीव लावून केली तशीच ती सर्व यापुढें इतरांना थोर करण्याकडे जीवाभावानें करूं लागतो तो खरा थोर!! इतरांस शिकविण्यांत शिकविणाऱ्याचीही विद्या जशी वाढत राहते तसेंच या प्रकारच्या यत्नानेंही साहजीकपणें आधींचा थोरपणा वाढत वाढत थोराहून थोर तो स्वतः होऊन बसतो!!! हा थोरांच्या नुसत्या चरित्राचा महिमा आहे - स्वतः जो खरोखरीच स्वतःच्या बलावर थोर होतो त्याची थोरवी गाण्यांत तर थोर थोरसुद्धां थकतात! मग माझ्यासारख्या पोरानें थोरांच्या चरित्रावर विशेष काय बोलावें!! म्हणून हें भाषण एवढ्यावरच संपवून मी आपल्या सर्व थोरांची रजा घेतों.

---

प्रभुदरबार. शालीबंडा, हैद्राबाद. द.
२४ सप्टें. १९३१ इ. गुरुवार.

# (१५) स्वच्छता.

[ लेख ].

स्वच्छता ही सर्वांना सारखी आवडणारी आणि प्रत्येकास हवी असलेली अशी जिव्हाळ्याची गोष्ट आहे. जवळजवळ हा एक नैसर्गिक मुख्य मानवधर्म आहे असें म्हटल्यासही हरकत नाहीं. हा स्वाभाविक धर्म कोणी कोणास न शिकवितां, आग्रहपूर्वक वरचेवर न सांगतां प्रत्येक व्यक्तीच्या हृदयांत खोल रुजून बसला आहे. आणि हीच स्वच्छता सदोदित पाळण्यानें पुढें पावित्र्य ठरते. म्हणूनच प्रत्येक माणूस आपापल्यापरीनें या एकांत दोन कार्यें साधण्याची शक्य तितकी काळजी घेत असतो.

स्वच्छतेस जर आपण बीज म्हणूं, तर ती शरीरवृक्षांतून प्रकट झाली पाहिजे. त्याचीं फुलें म्हटल्यास चेहऱ्यावरील प्रसन्नता, मनांतील शांतता व अशा मानवाच्या प्रत्येक वागणुकींतला नीटनेटकेपणा, सर्व बाजूंनीं घेतलेल्या काळजीमुळें लिहिण्यांत, बोलण्यांत, त्याच्या प्रत्येक कृतींत जी एक असाधारणता प्राप्त होते तीच त्याची सर्वांगसुंदरता होय! यायोगानें त्याची प्रत्येक कृति सर्वशः आदरानें बघितली जाते-म्हणूनच अनुकरणीयही ठरते व पुढें आन्तरस्वच्छतेकडे वळल्यास

श्रेष्ठतर असा तोच स्वतः सर्व जगाचा आदर्श ठरतो!! ही त्याची श्रेष्ठता व परिपक्वता स्वच्छतेच्या मूळ बीजाचें रसाळ व मधुर फल नव्हें काय?

स्वच्छतेच्या वरील नुसत्या व्याख्येवरून सहज कोणाच्याही ध्यानांत येईल कीं, इतकी श्रेष्ठ व महत्त्वाची गोष्ट, पण व्यवहारांत अगदीं साधी, कोणीही कुणाला सांगावयाची, शिकवावयाची समजली जाते! वयानें जरा कोणी अधिक असला कीं, तो आपल्याहून कमी वयाच्या माणसाला स्वच्छतेचा उपदेश करीत सुटतोच! वडील दादा आपल्याहून एकाच वर्षानें लहान असलेल्या भावास – अधिक तर काय, जरा कोठें चालतां येऊं लागलेला मुलगा रांगत असलेल्या मुलास – "हां, हात पूस, तोंड पूस, ओल्यांत जाऊं नकोस! घाणींत हात भरून घेऊं नकोस" वगैरे वगैरे तोंडानें उपदेशपाठ देत, पण हातानें आपणच कपडा घेऊन त्या बाळाचे हात व तोंड पुशीत असतांना आपण कितीदां तरी पाहतों! यावरून कोणी कोणास न शिकवितां, न सांगतां स्वच्छतेची आवड जन्मतःच प्रत्येकांत असते आणि याला अनुसरूनच धर्मशास्त्रांतर्गत (सोंवळें, ओंवळें) स्पर्शास्पर्श-विचारसुद्धां शास्त्रकर्त्यांनीं अत्यंत विचारपूर्वक ठरविला आहे हेंही आतां येथें निराळें सांगणें नको. तरमग बीजापासून फलापर्यंतचें वरील रूपक प्रत्येकास कां लागू होत नाहीं? तसेंच प्रत्येक मनुष्य श्रेष्ठ व आदरणीय कां ठरू नये! हा प्रश्न ओघानें येतो; पण हा आक्षेपात्मक प्रश्न जितका सहज व जितक्या जोरानें येऊन थडकतो तितक्याच सहज रीतीनें याचें सोपपत्तिक उत्तर प्रश्नाप्रमाणें एका वाक्यांत ताबडतोब तेथल्यातेथें ठोकून देऊन चटकन् मोकळें होतां येण्यासारखें नाहीं. यद्यपि एकादें उत्तर देतांच आलें तरी तें बीजरूपाचेंच राहील; पण केव्हांही सांगोपांग व पूर्ण कांही ठरणार नाहीं. बीज लवकर

मोड आणतें; पण तेंच प्रत्यक्ष फलरूप होण्यास त्याच्या दसपट, शतपट कालावधि लागते! मोड म्हणजे कांही सबंध वृक्ष नव्हे! प्रश्न हें मोड होय, तर त्याचें उत्तर हें फल होय. फल हातीं द्यावें म्हटल्यास प्रश्नाप्रमाणें उत्तराचें नुसतें मोड दाखवून कार्यभाग होत नाहीं. मोडाचा मजबूत बुंधा व्हावा, त्याला खांद्या, फांद्या—पुन्हा प्रत्येक फांदीला निरनिराळ्या पुष्कळ डाहळ्या फुटाव्या, प्रत्येक डाहळीस अनेक पानें फुटावीं, फुलें फुलावीं तेव्हां कोठें फळाची भाषा! फळानंतरमात्र वृक्ष पूर्ण झाला! त्याला खरें श्रेष्ठत्व प्राप्त झालें!! त्यापासून फळें मिळविण्याची पक्की खातरी झाली. लेखाचीही पण हीच स्थिति असते. ज्यांत सांगोपांग, इतकी भरभक्कम माहिती दिलेली असते कीं, पुन्हा प्रश्नच उद्भवूं शकत नाहीं अशाप्रकारचें लिखाणच 'पूर्ण लेख' या नांवाला पूर्णपणें प्राप्त होतें. अशा दृष्टीनें पाहूं गेल्यास नुसती "स्वच्छता" हा एकच शब्द विषय म्हणून घेतला व त्याचें व्यवस्थित विवेचन करूं गेलों, तर त्यावर एक ग्रंथच लिहितां येईल. असे शेंकडों ग्रंथ शेंकडों विद्वान् कालाच्या अनंत गतींत लिहीत आले व अजूनही लिहीत राहतील, तरी तो पुरा ठरेल कीं नाहीं याची शंकाच आहे. म्हणून, स्वच्छतेच्या अंतर्गत ज्या अनेक बाबी आहेत त्यांतून—अगदीं एक म्हणजे—निदानीं नुसतें आपले "हात स्वच्छ ठेवणें" ही एकच गोष्ट विद्यार्थी-मुलांच्या निमित्तानें पण सर्वांच्याच हिताची व अत्यंतावश्यक कशी आहे हें या लेखांतून दाखवावें म्हणतों. कारण, "स्वच्छता" म्हटली कीं, त्यांत सकाळीं उठल्यापासून रात्रौ झोपेपर्यंत जीं जीं कांहीं कामें करावयाचीं त्या साऱ्यांत त्यांची त्यांची सारखी काळजी घेण्यामध्यें सदोदित डोळ्यांत तेल घालून जपत राहणें वगैरे बाबींचा अंतर्भाव होतो. तेव्हां, यथापूर्व नित्यक्रमचक्र अत्यल्पही न बिघडूं देतां चालू ठेवणें म्हटल्यास आधीं ज्यायोगें आपलें शरीर सुदृढ व निरोगी

बनून, ज्यामुळें आपला अभ्युदय व उत्तरोत्तर उत्कर्ष होत राहील अशी वागणूक आपण आंखली पाहिजे. याची परिपूर्तता करण्यास शक्य-तितकी स्वच्छता प्रत्येक कामांत बाळगली पाहिजे — जास्त तर काय, प्रत्येक श्वासोच्छ्वाससुद्धां काळजीपूर्वक, भोंवतालच्या स्वच्छ-तेची परिस्थिति पाहून करावयास पाहिजे असें आरोग्यशास्त्र आप-ल्यास बजावून सांगतें. तसेंच आपल्या नित्याच्या संवयीकडे बारीक नजरेनें लक्ष्य पुरवून वरचेवर त्यांत अधिक सुधारणा घडवून आणणें तितकेंच आवश्यक आहे; परंतु आपणांस नित्याच्या संवयी इतक्या कांहीं क्षुद्र वाटतात कीं, तिकडे कोणाचें नुसतें लक्ष्यसुद्धां जात नाहीं! असल्या क्षुद्र चुका ज्यांकडे आपण वेळींच लक्ष्य दिल्यास विशेष श्रम न पडतां सहज टाळतां येतात; पण आपल्याच हातून प्रत्यहीं न कळत कशा घडतात व आज अत्यंत क्षुद्र वाटणारी चूक पुढें किती भयंकर व हानिकारक ठरते एवढें जरी ध्यानांत आलें, तरी पुष्कळ आपण मिळविलें.

" नेहमीं हात स्वच्छ ठेवणें " ही त्यांतली एक अत्यंत साधी व सहज पाळतां येण्यासारखी गोष्ट नाहीं काय ?

हवेंत लक्षावधि सूक्ष्म जंतू इतस्ततः नेहमीं फिरत असतात. आमच्या प्रत्येक बोटाच्या बारीक बारीक शेंकडों रेघांच्या खाचांत असे हजारों जंतू अडकतात आणि त्यामुळें सहज जरी आपळें बोट आपण क्षणभर दातांत किंवा ओठांत धरून ठेविलें, तरी ते जंतू तसेच्या तसे सहज आपल्या पोटांत जातात.

पुष्कळांची अशी समजूत असते कीं, जेवतांना फक्त हात तेवढे धुतले म्हणजे झालें; पण तेवढ्यानें भागत नाहीं. पाणी, दूध, कॉफ़ी इत्यादि पेयें किंवा विडा, सुपारी, लवंगसुद्धां तोंडांत टाकतांना जेव्हां जेव्हां म्हणून बोटांशीं आणि तोंडाशीं संबंध येतो तेव्हां तेव्हां हात

पाण्यानें स्वच्छ धुवून टॉव्हेलसारख्या खरबरीत कपड्यानें स्वच्छ पुसून घेतल्यावर खाणें, पिणें किंवा दातांत कांहीं अडकलेलें काढणें इत्यादिकां-कडे तसल्या हाताच्या बोटांचा उपयोग करावा. या एकाच गोष्टीवरून उघडा हात सर्वांहून अधिक स्वच्छ कां ठेवावा व तसें न ठेविल्यानें काय हानि आहे एवढें जरी कोणी लक्ष्यांत घेतलें, तरी सहजच त्यांना ही गोष्ट समजून येईल कीं, तशाच जरूरीशिवाय तोंडांत बोट सहसा घालूं नये.

सबंध शरीर सदोदित स्वच्छ ठेवणें जितकें अत्युत्तम तितकेंच अधिक कष्टाचेंही आहे; पण नुसता हात – निदानीं हातांचीं बोटें तरी नेहमीं स्वच्छ ठेवणें ही नेहमींच आपल्या हातांतली गोष्ट असून-देखील कोण इकडे इतकें लक्ष्य देतो? ज्याबद्दलची आधीं आणि सर्वांत अधिक काळजी घ्यावयाची तिची इतकी भयंकर हेळसांड प्रत्यहीं होत असते कीं, तिच्यामुळें अनंत जंतू अनेक वेळां पोटांत गेल्यानें ते सगळे एका ठिकाणीं जमा होऊन रोगाचा केवढा मोठा कारखाना तिथें सुरू करतात – त्याची नुसती कल्पनाच अंग थरारून सोडते! त्यामुळें होणाऱ्या शारीरिक हानीची म्हणजे कोणता रोग किती झपाट्यानें उद्भवतो व तो तितक्यावरच थांबत नसून पुढील पिढीसही किती भोंवतो याची शास्त्रीयदृष्ट्या नुसती रूपरेषा रेखाटूं गेल्यासही एक भयंकर चित्र डोळ्यासमोर उभें राहील इतकी ती भडक रंगाची होणार आहे! म्हणून तो शारीरक – शास्त्रीय पुस्तकाचा भाग पुस्तकांतच राहूं देऊन नुसतीं बोटें तेवढीं स्वच्छ ठेवण्याची एक बाजूही – पुरती नव्हे, तर त्याची अर्धी बाजू मांडण्यांतच हा लांब वाढत चालला असा वाटणारा लेख आंखडता घेतों. त्याबरोबर येथें हेंही सांगून ठेवणें आवश्यक आहे कीं, एकादी अगदीं साधी, नित्याच्या सरावांतली गोष्ट घेतली, तरी ( भरमसाटपणें भराभर पानें भरण्याच्या

भरीस पडणें तर असूं द्या ) विचारपूर्वक तिची साधारणपणें मांडणी करावी म्हटल्यासही किती कुचंबणा होते हें – "स्वच्छता" या त्र्यक्षरी शब्दाबद्दल त्याच्या अल्पांशाचा अर्धभागदेखील सांगीतला गेला नाहीं तों लेख कसा वाढत चालला यावरून – स्पष्ट आहे.

पुष्कळांची अशी संवय असते कीं, ते लिहितां लिहितां किंवा बोलतांनासुद्धां – जरासा विचार कारावयाचा असला तरी – दातांच्या पकडींत बोट धरून किती वेळतरी बसतात. याहून ढोबळ व भयंकर चूक बघूं गेल्यास पुस्तक चाळण्याच्या भरांत ( ती चूक म्हणून केंव्हां-तरी चुकून होत नसून कित्येकांना अशी संवयच झालेली असते कीं, ) प्रत्येक पानाबरोबर त्यांची तर्जनी बिनचूक तितक्या वेळेस जिभेशीं खुशाल खेळत असते ही होय. मुलांचें तर विचारणेंच नको ! सदा-कदा अंगोठा चोकीत असलेलीं, वरचेवर दातांनीं नखें कुरतडणारीं व सदैव बोटांशीं आणि दातांशींच खेळणारीं कितीतरी मुलें आपण प्रत्यहीं पाहतों !

चांगले चांगले सुशिक्षित, विद्वान्, लेखक, बहुश्रुत, पंडितांनाही या साध्या गोष्टीचा हा भयंकर परिणाम माहीत असूनदेखिल तोंडा-जवळ न धुतां नेलेलें बोट दातांनीं धरून ठेवण्याची संवयच झाल्या-मुळें त्यांच्यासुद्धां ही अगदीं साधी गोष्ट ध्यानांत राहात नाहीं ! !

सर्वेश: स्वच्छता राखण्याची शास्त्रीयरीत्या अत्यंत परिश्रमानें काळजी घेत राहून भोंवतालची सबंध परिस्थिति सुधारली असल्यास असल्या क्षुद्र चुकीचा परिणाम तितका वाईट होत नसावा; पण अंगवळणी पडलेली पाहिली संवय सुधारणें अति कठीण होऊन बसते हें निर्विवाद होय. तरी बिघडलेलें सर्व कांहीं नंतर सुधारून घेणें सर्वां-नाच शक्य नसल्यामुळें, निदानीं हात तरी नेहमी स्वच्छ ठेवावेत.

हेंही साधत नसल्यास तोंडाजवळ बोट तरी नेहमीं जाऊं न देण्याची काळजी घ्यावी.

वरील विवेचनावरून वरचेवर हात धूत बसण्याची गोष्टही बाजूला ठेविली, तरी किमानपक्षीं कारण नसतां, उगीचच्या उगी तोंडाजवळ बोट खेळविण्यानें त्याचा दुरुपयोग किती होत असतो हें जरी ध्यानांत आलें, तरी सुधारण्याच्या आशेला जागा झाली व एवढ्यानेंही या लेखाचें सार्थक झालें असें मी समजेन.



प्रभुदरबार. शालीबंडा, हैद्राबाद द.
आश्विन वद्य ५ शके १८५५.
४ अक्टोबर १९३३ इ. बुधवार.

( १६ ) हा

## आ म चा
## " भ क्त का र्य क ल्प द्रु म ! "

[ लेख. ]

**भक्तकार्यकल्पद्रुम** - प्रभूच्या कृपेनें खऱ्या प्रभूचा खरा भक्त अहोरात्र प्रभुस्मरणांत मग्न राहाण्याचें भाग्य अनुभवतो. आजचा दिवस तर प्रभुदर्शनभाग्याचा! " जें सुख स्वर्गि नाहिं वैकुंठीं " तें प्रत्यक्ष आमच्या या लोकीं अनुभवण्याचा!! याहूनही महद्भाग्य म्हणजे प्रभुनामसंकीर्तनानें सुखदुःखादि द्वंद्वविनिर्मुक्तस्थितींत अवचनीय, बुद्ध्यंवगम्य असा त्रिभुवनानंद आपलासा करून घेण्याचा आहे!!!

" भक्त - कार्य - कल्पद्रुम " या शब्दत्रयांत त्रिभुवन सांठवलेलें आहे. व्यावहारिकदृष्ट्या हा कल्पद्रुम स्वकृपया भक्ताला कार्यसंसक्त करतो. कर्तृत्वशक्ति ही तर पुरुषार्थाची प्रत्यक्ष जननी! मातेच्या मांडीवर असतांना बालकाच्या लीलेचें कोडकौतुक जसें होत राहतें तसा प्रत्येक पुरुषार्थाचा गौरव इतरत्र होणें शक्य नाहीं! अर्थात्, सदैव कर्तृत्वशक्तीशीं चिकटून असलेल्या पुरुषार्थाचाच उत्कर्ष जगांत होत असलेला प्रत्यहीं दिसत असतो. अशा प्रकारें इहलोकांतील तिन्ही पुरुषार्थ पूर्ण करवूनसुद्धां परमार्थदृष्ट्या परमपुरुषप्राप्तिचा परमोच्च चतुर्थ - पुरुषार्थही प्राप्त करून देववितो.

## यशोविलास (२).

"स्वर्गातील नंदवनांत कल्पद्रुम आहे" असें पुराणांवरून समजतें. याला खालील नांवें आहेत:-

१ अमरद्रुम, २ सुरद्रुम, ३ कल्पतरु, ४ देवतरु आणि ६ कल्पवृक्ष. याच प्रकारचे आणखी दोन जिन्नस नंदनयनांत आहेत. एक 'कामधेनु' आणि दुसरा 'चिंतामणि.' या तिन्हींत गुणोत्कर्षाच्या मानानें कल्पद्रुम श्रेष्ठ ठरतो. कारण, चिंतामणि हा सदैव काळजीपूर्वक जवळ बाळगावा लागतो, तर इच्छित कामना धरून कामधेनूचें दोहन करावयाचें असतें म्हणून कल्पद्रुमाची थोरवी सर्वांनीं गाइली आहे! या वृक्षाखालीं बसावयाचें एवढेंच भक्ताचें काम असतें!!

१ "कल्पद्रुम" या शब्दाचा अर्थ "इच्छित फल देणारा वृक्ष" असा आहे. वृक्ष म्हटला कीं, कोणाच्याही मनांत भूतलावरील वृक्ष येतात व त्याच्या शाखा, पल्लव, फलेत्यादिकांचा विचार सुचतो! आणि असें होणें साहजिकच आहे; पण हा कल्पद्रुम सामान्य वृक्षाहून निराळया प्रकारचा आहे. स्वर्गीय सृष्टि ही तैजस - सृष्टि म्हणविली जाते अर्थात् तेथील सर्व रचना तैजसस्वरूपाची असणार व तैजसतत्त्वानेंच त्याचें सर्जन व विसर्जन होणें शक्य असतें. "तैजस - तत्त्व' म्हणजे "मनोव्यापार" होय, पण तैजस व्यापार व मनोव्यापार यांत एक मोठा भेद आहे तो हा कीं, तैजस-व्यापार सिद्धरूप असतात व मनोव्यापार निष्फल असतात. सोप्या भाषेंत सांगावयाचें झालें, तर असें म्हणतां येईल कीं, "जें मनोराज्य सफल होतें तें तैजस व जें कालापव्यय करतें तें फोल मनोराज्य!" यावरून तैजस व मनोमय याची कल्पना येण्यासारखी आहे. ज्या अर्थी कल्पद्रुम हा तैजस आहे अर्थात् त्याची जोपासनादेखील भूतलावरील वृक्षापेक्षां वेगळया रीतीनें होत असली पाहिजे. ही गोष्ट असामान्य आहे असेंही नाहीं! बऱ्याच कवींनीं "प्रेमाची वेल प्रेमाश्रुजलसिंचनानें पल्लवित करावी लागते

असें सांगितलें असून बुद्धिरूपी अंकुर अनेक प्रकारच्या अभ्यासांनीं जोपासावा लागतो असा याला निर्बंधही ते सुचवतात. तेव्हां कल्पद्रुमही याच प्रकारचा वृक्ष आहे त्याअर्थीं त्याची जोपासना ज्ञानांबुयोगें करावयाची असते!

२ कल्पवृक्ष इच्छित फल देणारा! तेव्हां त्याखालीं बसूं नये असें कोणासतरी वाटेल काय? नाहीं! प्रत्येकास केव्हांही त्याच्या सावलींतच बसून राहावेंसें वाटेल!! आम्ही या पुढेंही एक पाऊल जाऊन असें म्हणतों कीं, असें वाटणें हा प्रत्येकाचा उपजत (ज न्म सि द्ध) हक्क आहे व तो त्यानें जरूर त्या उपायांनीं अवश्य साध्य करून घ्यावा!!!

३ ज्ञानांबु-सिंचनानें कल्पतरूची वाढ झाल्यावर त्याला कोणत्या प्रकारचीं फळें येतील? तीं अनुकूल अशीं असतील कीं प्रतिकूल? अशी एक शंका जी येथें उद्भवते त्याचें उत्तरही (पूर्वीच) पूर्वाचार्यांनीं देऊन ठेविलें आहे. सर्व पुराणांत श्रेष्ठ ठरलेल्या भागवत पुराणाच्या आरंभीं हें पुराण म्हणजे "निगमकल्पतरुर्गलितं फलं" असें म्हटलें आहे. श्री ज्ञानेश्वर, रामदास, मुक्तेश्वर, श्रीधर वगैरे ग्रंथकारांनींही आपापल्या ग्रंथास कोठें सुरभि, कोठें चिंतामणि, तर कोठें कल्पद्रुम अशीं विशेषणें दिलीं आहेत. तात्पर्य, कल्पद्रुमास येणारीं फळें तात्त्विक व अमृतोपम उपदेशरूपी अशीं असतात हेंच मला प्रामुख्यानें सांगावयाचें आहे. आतां अशा फलांचा सार्वजनिक उपयोग काय? हा जो एक महत्त्वाचा प्रश्न म्हणून यावर उद्भवणार त्याचें उत्तर म्हणजे एकंदरींत विवेचनाची सफलता होय. निवळ फलाच्या दृष्टीनें विचार केल्यास मी वर लिहिल्याप्रमाणें मनांत उत्पन्न झालेली इच्छा, आकांक्षा, आशा इत्यादि ईप्सित मनोरथ पूर्ण होणें हा कल्पवृक्षाचा

गुण असें वाटतें; पण तसा तंतोतंत अनुभव आलेला ऐकण्यांतही नाहीं! तसा अनुभव जर येईल, तर यापूर्वी वर्तविलीं गेलेलीं व भावी खगोलविशारदांचीं वर्तविलीं जाणारीं भीषण भविष्यें वरचेवर अवनी-तलावर अवतीर्ण होत गेल्यास अनवस्था प्रसंग प्राप्त होईल व सृष्टीची नियामकता नाहींशी होऊन प्रत्यहीं बलबलपुरी माजेल! असें होऊं नये म्हणून या वृक्षाची योजना (योग्य व सुरक्षित स्थलीं म्हणजे) स्वर्गलोकांत केली आहे. त्या वृक्षाखालीं बसावयाचें असल्यास बसणाऱ्यास आधीं स्वर्गांत जावें लागेल!!

४ स्वर्गांत जावयाचें म्हणजे स्वर्ग कोठें आहे हें अगोदर जाणिलें पाहिजे. आपल्यास स्वर्गाची अगदींच कल्पना नाहीं असें नाहीं. नितांत आनंद झाला म्हणजे आपण त्याला "स्वर्गीय आनंद" म्हणतों. "स्वर्गीय वातावरणांत आम्ही कांहीं वेळ वावरत होतों" असा शब्दप्रयोग आत्यंतिक सुखावस्थेच्या प्रसंगाकरितां पुष्कळ वेळां अनेकांनीं केलेला आपण ऐकतों! यावरून असें अनुमान वर्तविणें चुकीचें ठरणार नाहीं कीं, स्वर्गाची पुसट कल्पना आपल्यास आहे. याचाच माग घेत राहून विचाराची वाट अधिक चालल्यास दिसून येईल कीं, ही नितांत सुखावस्था अविरत भोगतां येईल असे प्रसंग उत्पन्न करणें म्हणजेच स्वर्ग-सोपान चढणें होय. हवें तेव्हां तें सुख भोगतां येऊं लागलें कीं, आपण स्वर्गाच्या द्वारासमीप आलों असें समजण्यास हरकत नाहीं व त्या सुखाव्यतिरिक्त इतर सुखाची गोडी वाटेनाशी झाली कीं, आपण स्वर्गांत अधिष्ठित झालों असें ज्याचें त्यालाच वाटूं लागेल व असें त्याचें वाटणें केव्हांही खोटें नव्हे!

५ "जें पिंडीं तें ब्रह्मांडीं" अशी वेदान्ताची शिकवण आहे अर्थात् ब्रह्मांडांत कोठेंतरी असणारा स्वर्ग पिंडांतही पाहिजेच! व

स्वर्गातील कल्पद्रुमाचें सूक्ष्म बीज पिंडांत उद्भूत झालें पाहिजे!! या तात्त्विक दृष्टीनेंच स्वर्गाचें सुख येथें उपभोगतां येतें व प्रबल इच्छा-बलावर कल्पद्रुमाच्या दाट छायेंत बसतांही येतें!!! म्हणून तात्त्विक-दृष्टीनेंच कल्पद्रुमाचा शोध लावला पाहिजे. "ज्ञातुं, द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च ( परंतप )" शिवाय, ( उलटपक्षीं ) "ते माम् तत्त्वेन न अभिजानन्ति अत: च्यवन्ति" अशी सूचनाही श्री भगवंतांनीं बजावून सांगण्याचें बाकी ठेविलें नाहीं !

६ तात्त्विक-दृष्टीचा परिग्रह केल्यास इच्छेची सफलता हा एक विचाराचा प्रश्न होऊन बसतो! कारण, आपल्यास जी इच्छा आज सफल व्हावी असें वाटतें तीच उद्यां निष्फल ठरावीशी वाटते. कारण, प्राणिमात्रांची प्रत्येक इच्छा हितपरिणामीच असते असें निश्चयात्मक उत्तर देण्याचें धाष्टर्य कोणीच करणार नाहीं. बाल-वयांतील इच्छा तारुण्यांत फोल आणि वेडगळपणाचे वाटतात! तारुण्यांतले अगदीं स्वाभाविक व विहित वाटणारे विचार वृद्धावस्थेंत उतावीळ-वृत्तीचे आणि अनेक दोषान्वित ठरतात. तात्पर्य, बुद्धीवरील संस्करा-प्रमाणें इच्छा सफल होण्याचें-सकृद्दर्शनीं मांडलेलें-कोष्टक कमी कमी होत जातें. अधिक तर काय, काल अत्यावश्यक म्हणून ठरलेला विचार आज अगदीं अनावश्यक वाटूं लागतो! तेव्हां बाल्य, तारुण्य व वार्धक्य या तिहींतील त्रिकालाबाधित अशी इच्छा एकच होऊं शकते व ती सफल होण्यांत केव्हांही आनंदच आहे! अशी इच्छा कोणती? याचें आनुभविक उत्तर ज्याचें त्यानेंच ठरविलेलें बरें! तत्त्वज्ञानी म्हणतात कीं, "सर्वांचें उत्तर एकाच स्वरूपाचें राहणार" आपण सुखी असावें, आपणांस सर्वांनीं चांगले म्हणावें, आपणांत कोणत्याही गोष्टीची उणीव नसावी असेंच प्रत्येकास वाटतेंना? मग हेंच त्याचें उत्तर!! व हें ज्या वृक्षाच्या छायेखालीं केवल इच्छेसरशीं प्रत्यक्ष फलस्वरूपांत मिळतें तोच **क ल्प द्रु म**!!!

७ श्रीप्रभूंचें ब्रीद भ क्त का र्य क ल्प द्रु म असें आहे. भक्त या शब्दानें प्रभूंचें नांव घेणारे तेवढेच प्रभुभक्त असा संकुचित अर्थ या ठिकाणीं विवक्षित नसून जन, समुदाय, लोक या अर्थी तो वापरला गेला आहे. भगवंतांनीं भगवद्गीतेंत भक्तांचे जे चार वर्ग कल्पिले आहेत त्यांचा अर्थ विशिष्ट प्रकारचे लोक असा नसून सर्व जनता या चार वर्गांत मोडते असा त्यांच्या सांगण्याचा भावार्थ आहे. तोच व्यापक अर्थ येथें अभिप्रेत असून भक्तकार्यकल्पद्रुम या विशेषणांनीं सर्व जनतेच्या सात्त्विक आकांक्षा पूर्ण करण्याचा विडा श्रीप्रभूंनीं उचलला आहे. मात्र "या कल्पद्रुमाखालीं येतांना तुम्हीं आपली कोणती इच्छा पूर्ण करण्याचा संकल्प करणार हें विचारानें, श्रद्धेनें व कार्याकार्यव्यवस्थितीस पूर्णपणें समजून, उमजून ठरविलें पाहिजे" अशी सकलहितैषिणी शिकवणही सकलमताचार्यांनीं देऊन ठेविली आहे.

कोणत्याही विषयाचे दोन अंग असतात. एक "ता त्त्वि क" आणि दुसरें "व्या व हा रि क"! पैकीं तात्त्विकदृष्ट्या वर विवेचन केलें. आतां व्यावहारिक-विवेचनाकडे वळूं.

व्या व हा रि क दृ ष्ट्या श्रीप्रभूंच्या बिरुदावलीचा विचार करण्यापूर्वीं बिरुदावलि म्हणजे काय हें पाहिलें पाहिजे! कित्येकांस बिरुदावलि हा आत्मप्रौढीचा एक प्रकार वाटतो व जीं विशेषणें बिरुदावलींत आहेत तीं सर्व त्या व्यक्तींत असतात काय? असा त्यावर एक प्रश्नही त्यांचा सज्ज असतो; पण त्यांना हें कळत नाहीं कीं, बिरुदावलींतील विशेषणें हीं कोणत्याही व्यक्त्यात्मक गुणगौरवाकरितां नसून सर्वानुस्यूत, एकवस्त्वात्मक, अकृत्रिम असें जें तत्त्व आहे त्याच्या प्रभावाचीं द्योतक असतात. "त त्त्व म सि" "अ हं ब्र ह्मा स्मि" हीं महावाक्येंदेखील बिरुदावलींत मोडण्याजोगींच आहेत. कोठेंही

स्तुति आली कीं, तेथें हें ओळखावयाचें असतें! ज्याकरितां स्तुति केली गेली तो पदार्थ कालधर्मानुसार नाहींसा होणारा असतो. "यत् दृष्टं तन्नष्टं" अर्थात् स्तुति, स्तोत्र, ब्रीद, प्रशस्ति कोणी कोणाचीही करो! ती परमेश्वराला अनुलक्षूनच असते. "येऽप्यन्यदेवता भक्ता यजंते श्रद्धयान्विताः। तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम्" इतकेंच नव्हें, तर करणाऱ्याची इच्छा असो वा नसो वर्ण्यवस्तूस सोडून ती स्तुति. ईश्वराकडे धाव घेते. या विचारांत एक तारतम्य आहे तिकडे काना-डोळा होऊं नये म्हणून मुद्दाम सुचवतों कीं, हे विचार धनाशेनें प्रेरित होऊन किंवा आश्रितभाव अंगिकार करून, उदरनिर्वाहाचें साधन म्हणून कांहीं लोक स्तुतिपाठकांचा जणूं धंदाच पतकरतात त्यांच्या संबंधीं नाहींत. ते केव्हांही त्याज्यच होत! ईश्वरसाम्य पावलेल्या महनीय विभूति व इश्वरी-अवतार म्हणून खऱ्या अर्थानें मानले जाणारे अवतारीक यांचीं स्तोत्रें व ब्रीद ईश्वर आपलीं समजतो!! अशाच विभूतींच्या ब्रीदावल्या अक्षरशः सार्थ होत!!!

तरमग श्रीप्रभुनामसंकीर्तन, प्रभुस्मरण-कार्य हेंच ज्याचें ध्येय सदैव हृदयाशीं सल्लग्न असेल अशा भक्ताला भक्तकार्यकल्पद्रुम जरा-सुद्धां दूर नसतो हें काय निराळें सांगावें लागेल?

**भ क्त का र्य क ल्प द्रु म** माझ्या माणिकनगरांत माझ्या ह्या डोळ्यांना प्रत्यक्ष दिसत असून ऋतुकालनियमबंधनिर्मुक्त, पर्ण-पुष्प-फलसंततियुक्त अहोरात्र फोपावत आहे! वचनोपदेशामृतफलें सरसगट चाखवून भक्तांना कैवल्यपद प्राप्त करून देणारे अध्यात्मनगरीचे राजे, **गुरुसार्वभौम** पदवी सार्थ करणारे **श्री म द्रा जा धि रा ज यो गी** माझे माणिकप्रभु **म हा रा ज** स्वयंसिद्ध **त्रि भु व ना नं द** आहेत! एतदर्थ जिव्हाळयाचे म्हणविणाऱ्या आपल्या लाडक्या भक्तांना नश्वर

जगांतील क्षुद्र वैषयिक सौख्यें भुलवूं शकूं नयेत म्हणून आभासात्मक सौख्याकडे मुद्दाम कानाडोळा करावयास लावून ज्यांत सुखदुःखाची कांहींच किंमत नाहीं असल्या शब्दातीत, अकल्पनीय पण अविच्छिन्न **अ द्वै त** स्वरूपात्मक **अ भं ग** आनंदाचा जो **नि रं ज न** आणि **नि र्गु ण** तोच **नि रा लं ब** अतएव **प रि पू र्ण** असा प्रभु **स दो दि त** समान अशा शाश्वदेकस्थितींत अनेकमतीयांना एक-मतानें आणि गुण्यागोविंदानें वागावयास लावतो — कारण, ज्या विराट् स्वरूपाच्या एकाच देहांतून निर्मितिचातुर्यान्वित चातुर्वर्ण्य उत्पन्न झालें तीं सर्व लेकरें त्याला सारखींच! म्हणून त्या **स क ल-म त स्था पि त** सनातन **स द्गु रु** सकलमताचार्य **मा णि क प्र भु म हा रा ज** यांचा जयजयकार ज्या भक्ताच्या हृदयांत अहोरात्र चालू असतो आणि ज्याच्या वाणींतून वर्णन, विवेचन, संकीर्तन भजनघोष-रूपानें सदोदित होत राहातें तोच परम भाग्यवान् भक्त आणि त्याचा प्रत्येक दिवस महद्भाग्याचा आहेच आहे !

ज्या त्रिभुवनाधीश निर्गुण प्रभूनें गोजिरें सगुणरूप आणि **माणिक**-नाम धारण करून येथें अवतार घेतला, आपल्या चरण-स्पर्शानें या भूमीला स्वर्गरूप प्राप्त करून दिलें त्या सकलमताचार्य प्रभूचें अगाध आणि अनाकलनीय सामर्थ्य – पूर्णतया नसो, अंशतः तरी — शब्दानें पटवून देणारी ही बिरुदावलि अर्थदृष्टि जाग्रत ठेवून अनन्य भक्तीनें आणि अर्थानुगामी तन्मयतेनें म्हणत व सतत चिंतन करीत असणाऱ्या सद्भक्ताच्या हृदयांत तत्काल परम शांति प्राप्त करून देते! तर स्वर्ग-जिज्ञासेच्या भरीस कोण काय म्हणून पडावा? कारण, प्रत्यक्षानुभवावरून हें पूर्ण पटलेलें असतें कीं, सकलमोक्षकारण काय ती हीच बिरुदावलि ! हेंच कल्पवृक्षाचें मुख्य बीज!! आणि

हें तर भक्ताजवळच राहतें, आहे व सदैव राहाणार!!! तरमग जेथें जेथें म्हणून प्रभुभक्त आहेत व ज्या ज्या ठिकाणीं असा हा जयजयकार चालू असतो त्या त्या स्थलीं तेव्हां तेव्हां भ क्त का र्य क ल्प द्रु म असतोच असतो. विशेषत: म्हणजे स्वर्गांतील साधा क ल्प द्रु म तर श्रीमाणिकनगरांत **भ क्त का र्य क ल्प द्रु म** आज श्रीसद्गुरु **मार्तण्डमाणिकप्रभु** या नामाभिधानानें प्रत्यक्ष विद्यमान आहे. वस्तुत: आदिमध्यांतरहित मा णि क प्र भु म हा रा ज स्वत:ला लीलाविग्रहें आद्य प्रभु म्हणवून घेतात आणि उदयास्तवैकल्यविहीन देदीप्यमान - अशा विद्यमान श्री म न्मा र्त ण्ड प्रभुरूपें मूर्तिमंत छत्रसिंहासनविराजित आहेत. प्रभुस्वरूप यथातथ्यपणें पाहाण्यास हे चर्मचक्षुमात्र समर्थ नाहींत! प्रभूनेंच "दिव्यं ददामि ते चक्षु:" असें म्हणून स्वकृपया स्वस्वरूप दाखविलें तरच हे डोळेसुद्धां प्रभुदर्शनाचें दिव्यज्ञानदृष्टिकार्य करण्यास शक्त होतील. तसली दिव्यदृष्टि केवल एकनिष्ठ प्रभुभक्तालाच मिळते म्हणूनही प्रभूचें नाम "भक्तकार्यकल्पद्रुम" असें आहे. शिवाय, नंदनवनांतील कल्पद्रुम तदाश्रित मानवाच्या मनांत बरी - वाईट, साधक - बाधक जी जी कल्पना जशी जशी येत राहील तशी तशी त्या त्या क्रमानें ती ती तत्काल पूर्ण करीत सुटतो, पण हा भक्तकार्यकल्पद्रुम असा आहे कीं, एकाद्या विषयासक्त - भक्तानें अज्ञपणें बाधक - वस्तूची मागणी घशास कोरड पडेपर्यंत कितीही ओरड करून मागण्याचा सपाटा लावला, तरी त्यास मारकवस्तूचा स्पर्शसुद्धां न होऊं देतां, इकडे भक्ताला हिरमुसलेंही न करतां केव्हांही त्रिकालाबाधित अशा तारक - वस्तूचीच देणगी देतो आणि आपल्या कृपेच्या अमृतमय घनच्छायेनें संसृतिसंतप्त - भक्तांना शांत करतो. भक्ताचा कल पाहून पचेल तें देत जाऊन मधून मधून भजनपूजन, उत्सव - महोत्सवमिषें सदुपदेश करीत राहून शेवटीं अमर करतो.

## यशोविलास (३).

या पंच-भूतात्मक नश्वर अशा दृश्य देहाच्या चैतन्यात्मक स्थायिकत्वालाच आम्ही केवल अज्ञानजनित कल्पनेनें "अमरत्व" हें नांव देतों आणि तें नष्ट झाल्यावर त्यालाच "मृत्यु" असें म्हणतों. अशाच भ्रामक कल्पनेनें अज्ञानी स्वस्वरूपी सौख्यगिरीच्या अत्युच्च अशा आनंदशिखरावरून स्वतःच आपल्यास लोटून घेऊन पडण्याच्या क्रियेमुळें मिळत असलेल्या तीव्र गतीनें शोकसागराच्या तळांत गाडला जातो! खरें पाहातां मृत्यूवांचून आधीं जन्म होणेंच शक्य नाहीं!! म्हणजे जन्माचें कारण मृत्यु असें ठरलें. अर्थात् "कार्य-कारण एकरूप असतें" या सिद्धांतावरून जन्म हें मृत्युचें अपत्य होय आणि उत्पत्ति व नाश या दोहोंच्या ओढाताणींत जीवाचें अभिवर्धन होत राहतें! जसें उन्हांत वाळल्याविना फुल-झाडांची वाढ होत नाहीं, भोजनेच्छा भूक लागल्याशिवाय उत्पन्न होत नाहीं, ती भूक सडकून लागली तरच अन्न अमृततुल्य रुचकर लागतें! तद्वत् जठराग्नि प्रदीप्त झाल्यावांचून जेवलेलें चांगलें पचतही नाहीं. तसें पचलेलें अन्नच देहाभिवर्धनाला कारणीभूत होतें.

३४.F.

वस्तुतः मृत्यूची भीति किती निर्मूल आहे! भीति ही मृत्यूची नसून स्वतः मृत्यूच भीतीनें कसा ग्रस्त आहे!! तसेंच ज्याची सगळ्या जगाला भीति आहे तद्वत् ज्याच्यायोगें जगाची उत्पत्ति, स्थिति होत राहाते तो सर्वशक्तिमान्, स्वतःसिद्ध, स्वयंप्रभ आत्मा अथवा आत्मचैतन्य कसें ओळखावें हें यंदाच्या श्रीजयंत्युत्सवाच्या निमंत्रणपत्रिकेंत सकलमताचार्य गुरुसार्वभौमांनीं ज्ञानमार्तण्ड-प्रकाशानें सहज-लीलया मृत्यूच्या बागुलबुवाची हकालपट्टी करून आपल्या पूर्ण कृपायुक्त सदुपदेशानें सार्वत्रिक दिव्य-ज्ञानदृष्टि प्राप्त करून दिली आहे. लक्ष्यपूर्वक, श्रद्धायुक्तांतःकरणांतील पूर्ण निष्ठेनें पत्रिकेच्या वाचनाबरोबर अर्थावगाहन होत राहिल्यास मृत्यूच्या

भीतीचें मृत्यूसह समूल उच्चाटण होऊन एकच प्रभु जिकडे तिकडे नांदत असल्याचा प्रत्यय येईल. हा अपरोक्षानुभव! हा अवचनीय महाल्लाभ!! ही गुरुकिल्ली स्वकृपया भक्ताच्या स्वाधीन करून देण्यास जो सदैव सिद्ध असा

हा

आमचा

# भक्तकार्यकल्पद्रुम!

प्रभुदरबार. शालीबंडा, हैद्राबाद. द.
मार्गशीर्ष. शु. १५ श. १८४५
२३-१२-१९२३ इ.

ज्ञा. ७६



कविवर्य काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट्, सकलकलाकोविद, रहस्यज्ञ — य. स. कोरेकल-कृत ग्रंथ.

---

# काव्यग्रंथ :—

## १ "काव्य-कुसुम-कलिका" 'प्रथमोद्भव' पृ.सं.२२६

हें पुस्तक उस्मानिया विद्यापीठानें परीक्षेस नेमलें आहे. शिवाय, यांतील कलिकांना प्रथितयश-साहित्यिक, प्रो. श्री. **श्री. नी. चापेकर** यांची "ऋतूनां कुसुमाकरः" अशा सुरवातीनें सौरभ दरवळून सोडणारी, विद्वन्मान्य आणि अत्यंत मार्मिक अशी प्रस्तावना लाभली आहे.

**किंमत १ रु.** (सूर्ती) [ १०≡ हाली ].

## २ का. कु. क. 'द्वितीयोद्भव' "पुष्प-पाकळ्या" पृ.सं.४३३

[ रजिस्ट्रेशन नंबर ८ ता. २८ फरवर्दी १३४४ फसली. ]

यांत एकाक्षरी वृत्तापासून तों ५१ अक्षरी "अर्ण दंडक" वृत्तापर्यंतची माहिती असून या ग्रंथास विद्वद्वर्य पं. **रंगाचार्य रड्डीशास्त्री** यांची छंदशास्त्रात्मक विद्वत्तापूर्ण व उद्बोधक अशी प्रस्तावना लाभली आहे. शिवाय, अगदीं थोडक्यांत सर्व वृत्तांची माहिती मोठ्या परिश्रमानें दिलेलीं २ परिशिष्टें यास जोडिलीं आहेत. याबद्दल "छंदशास्त्रांतील मराठींतील विस्तृत ग्रंथ म्हणजे प्रस्तुतचा द्वितीयोद्भव हाच होय. यांत

शास्त्रीयचर्चा विशेष न करतां २५०, २७५ वृत्तांचें रेखालिपीनें स्वरूप देऊन विविध वृत्तांत विविध विषय मनोहर रीतीनें ग्रथित केले आहेत. त्यामुळें छंदोज्ञान व सदुपदेश या दोहोंचा लाभ वाचकांस मिळतो." असें प्रस्तावनाकार म्हणतात. विद्यार्थ्यांच्या सोयीस्तव अशा या जवळ जवळ ४५० पृष्ठांच्या ग्रंथाची **किंमत** अवघी १॥ रु. (सूर्ती) १॥। [हाली.]

## ३ का. कु. क. 'तृतीयोद्भव' "सुमन - सौरभ"

पृष्ट सं. ४०४ कापडी बांधणी.

या उद्भवांत निरनिराळ्या चालींतील व वृत्तांतील तीनशेंवर कलिका एकत्रित केल्या असून त्यांबद्दल अत्यंत प्रथित अशा **चित्रमय-जगत**—मासिकानें "त्या अध्यात्म, भक्ति, नीति, निरीक्षण, स्वदेशभक्ति, मनोव्यापार इ. विविध विषयानुलक्षी आहेत.... "अर्वाचीन व हयात कविमंडळांत इतक्या प्रचंड प्रसवशक्तीचा एकही कवि नाहीं असें म्हट-ल्यास चालेल" असे उद्गार चित्रित केले आहेत, तर "या काव्यग्रंथात ३०० कविता असून त्या आपले जनक श्री. कोरेकल यांच्या "काव्यकौस्तुभ," "वृत्तसम्राट्" व "सकलकलाकोविद" या पदव्या सार्थ करण्यासारख्या आहेत.... प्रौढ, सालंकृत व संस्कृतप्रचुर भाषा आणि तिच्या पोटीं गूढ, भावभरित व विवेकप्रचुर असा अध्यात्मविचार हाच या कवनांचा खरा थाट आहे.... अनेक कवींचा विविधविषयां-वरील काव्यसंग्रह असें या ग्रंथाचें स्वरूप वाटावें इतकें विविधत्व व विपुलत्व त्यांत आहे" अशी श्रेष्ठ प्रकारची वाङ्मयसेवा व लोकजागृति करणाऱ्या "**केसरी**"ची गर्जना आहे.

**किंमत** फक्त २ रु. (सूर्ती) १॥ रु. [हाली.]

४ का. कु. क. "**चतुर्थोद्भव**" [अमुद्रित] पृ. सं. सुमारें ३००

५ "**विरोधाभाव**" (संगीत नाटक) [अमुद्रित] " " १५०

## गद्यग्रंथ :—

## ६ "विचारवैभव" (वेदान्तपर) पृष्ठ ३२५ कापडी बांधणी.

तत्त्वज्ञानात्मक या ग्रंथांतील बहुतेक लेख तत्त्वज्ञानमंदिरासारख्या केवल वेदान्ताला वाहिलेल्या सुप्रसिद्ध मासिकांतून आले आहेत. यांत 'सरसगट एकवाक्यता,' 'समाधि,' 'सुषुप्तीचें महत्त्व,' 'स्वप्न व जागृति एकच,' 'सहजमुक्ति,' 'विलक्षण आत्मा,' 'सुखप्रवाह,' 'चिद्विलास,' 'देहशकट,' 'कांडत्रय,' "ध्येयानुसंधान" वगैरे विषयांचें प्रतिपादन सोपपात्तिक व स्वतंत्र पद्धतीनें केलेलें आहे. याबद्दल **महामहोपाध्याय, वेदान्तवागीश** पं. श्री. **श्रीधरशास्त्री पाठक** यांच्यासारख्या अधिकारी, पूर्ण निष्णात व्यक्तींनीं "चांगलें पुस्तक वाचण्याचा योग आला. वेदान्तसिद्धान्ताची आवृत्ति अभिनव पद्धतीनें घडली. कर्त्याची विद्वत्ता व विचारशालिता पूर्ण अनुभवास आली. श्री. कोरेकल यांचें उपनिषद्वाङ्मयाचें परिशीलन चांगलेंच झालेलें आहे... व त्यांनीं प्रस्थानत्रयाचेंही उत्तम परिशीलन केलेलें आहे... तसेंच त्यांनीं आपल्या प्रतिपादनांत आचार्यभाष्य व पंचदशी यांतील वाक्यांचा यथोचित उपयोग केलेला आहे व विचार मांडण्याची तऱ्हा त्यामुळेंच सुबोध झाली आहे... आमच्या दृष्टीनें स्वतंत्र प्रकरणांनीं लिहिलेला व अद्वैताचे सर्व सिद्धांत समजावून सांगणारा हा अपूर्व ग्रंथ आहे. केवल मराठी वाचकांचा यामुळें शास्त्रीय विषयांशीं परिचय होईल व शास्त्रीय ग्रंथ मूळांतून वाचण्याची त्याची जिज्ञासा वाढेल हा रा. कोरेकल यांचा महाराष्ट्र जनतेवर उपकार आहे" असा या ग्रंथाचा गौरव केला आहे.

**किंमत** २ रु. ( सूर्ती ) २॥ रु. [हाली.]

## ७ "कौस्तुभ-किरण"

अनेक लघुकथांचा व लघुनिबंधांचा सुंदर संग्रह अस या मनोहारी गद्यगुच्छाचें अगदीं थोडक्यांत स्वरूप दिग्दर्शन आहे.

जवळ जवळ २०० पृ.चा हा संग्रह आणि कापडी बांधणी असून **किंमत** फक्त १॥ रु. ( सूर्ती. ) १॥। रु. [हाली.]

## ८ "यशोविलास" [ मुद्रण चालू ]

या सौरभान्वित सुदंर गद्यगुच्छांत 'वाङ्मयचर्चात्मक,' 'मनोरंजक' आणि 'उमलत्या कलिकांकरितां लेख व व्याख्यानें' अशा तीन विभागांतून 'समालोचन,' 'प्रहसनें' आणि नाट्यछटा इ. चा विविध व मनोहर संयोजनात्मक संग्रह आहे. यांत "अभिनव शारदोपासक मंडळ पुणें" नियोजित "किर्लोस्कर सप्ताह" प्रसंगीं ज्या लेखाचा बराच गौरव झाला त्या "संगीत – सौभद्र – समालोचना"पासून सुरवात होऊन द्वितीय भागांत "मोटार - मन्वंतर" "परोपकार" व "धर्म - रूढी - बंधन" अशीं प्रहसनें व नाट्यछटा आणि शेवटल्या भागांत उमलत्या कालिकांकरितां "उद्योगाचें दैवी भांडवल," "स्वच्छता," "मुलींचीं कर्तव्यें," "ब्रह्मचर्य," थोरांचीं चरित्रें आणि "भक्तकार्यकल्पद्रुम" अशीं लहान लहान व्याख्यानें आहेत.

# हिंदी काव्य - ग्रंथ

## ९ "यशोबिम्ब" पृ. सं. सुमारें १००

सुलभ आणि मनोहर शब्दरचनेमुळें अनेकांच्या जिव्हेवर नाचणाऱ्या गजल आणि विविध चालीवरील हिंदी कवनांचा संग्रह.

[ अमुद्रित ] ( पण मुद्रणनियोजित. )

# हिंदी गद्य - ग्रंथ :–

## १० "सुधांशु" पृ. सं. सुमारें ४००

"हिंदी ज्ञानमार्तण्ड" ब्र. भू. भक्तकार्यकल्पद्रुमादि विरुदान्वित सकलमताचार्य **श्रीमन्मार्तण्डप्रभुमहाराजांच्या** कृपेनें प्रकाशणारा हा सुधांशुरूपी हिंदी अनुवादात्मक, परमोच्च तत्त्वविचार–परिप्लुत वेदान्त - ग्रंथ. [ अमुद्रित ] ( पण मुद्रणनियोजित ).

# उर्दू काव्य-ग्रंथ (दीवान)

## ११ 'सोज़ो-साज़' उर्फ़ "कलामे-नुसरत"

पृ. सं १६० किंमत ॥।

[रजिस्ट्रेशन नं. २ ता. २ बहमन १३४१ फसली.]

याला जगत्प्रसिद्ध चंदूलाल कुलावतंस,कविमंडळपूजित,विद्वन्मान्य, अनेक भाषाविशारद His Excellency राजा राजायान महाराजा **सर किशनप्रसाद बहादुर** K.C.I.E., G.C.I.E. यांची परिशीलनात्मक विद्वत्ताप्रचुर अशी अमूल्य व अत्यंत लक्षणीय प्रस्तावना लाभली आहे.

ही एकच गोष्ट इतकी स्वयंपूर्ण आहे कीं, तिच्या समर्थनार्थ अन्य कोणत्याही प्रमाणाची आवश्यकता नाहींच !

## १२ उर्दू (संगीत नाटक) 'मक़सदे-हयात' उर्फ़- "इश्तियाक़े-तआलीम" पृष्ठसंख्या सुमारें २००

या काव्य ग्रंथास मौ. तालेब अली साहेब 'नजम' बी. ए. माजी सेक्रेटरी ऑफ़ "अंजुमने-इस्लामिया बॉंबे (ज्यांना सम्राट् पंचम जॉर्ज यांच्या समक्ष क़सीदा वाचण्याचा बहुमान लाभला होता) यांचें प्रशस्तिपत्र मिळालें आहे. [अमुद्रित]

## १३ उर्दू (संगीत नाटक) "करिश्मे-इश्क़"

नाट्यकला प्रवर्तक संगीत मंडळींच्या आग्रहावरून कै. वा. हरि नारायण अपटे-कृत सं. "पिंगला" नाटकाचें मूळस्वरूप बदलूं न देतां कुशलतेनें केलेलें उर्दू रूपांतर. [अमुद्रित] पृ. सं. सुमारें १२५

# उर्दू गद्य-ग्रंथ :-

## १४ "आफ्ताबे-इरफ़ान"

उपरिनिर्दिष्ट "सुधांशु" नामक हिंदी वेदान्तग्रंथाचें सुरस व सुंदर उर्दू रूपांतर. [अमुद्रित] पृ. सं. सुमारें ३००

## १५ मराठी - उर्दू कोश

(लघुकोश) दोन्ही भाषांच्या दीर्घ व्यासंगी लेखणींतून शा
पद्धतीनें अत्यंत परिश्रमपूर्वक तयार झालेला अत्यावश्यक असा हा
उभय भाषाभ्यासूंना त्वरित मार्गदर्शक आहे असें याचा खरडा प
तज्ज्ञ हार्दिकपणें म्हणतात. [अमुद्रित] पृ. सं. सुमारें

**पत्ता** — १ अप्पासाहेब देशपांडे बी. ए. एल्‌एल
सं. माणिकनगर. पो. होमिन
जि. गुलबर्गा (निजाम
२ के. र. काशीकर, आदर्शकार्याल
पो. सांगली S. M. C.
३ य. स. कोरेकल, शाळीबंडा, पो. हैद्र
(डेक

**परगांवच्या आश्रयदात्यांस टपाल खर्च निराळा प**
**स्थानिक " " " ना**

**अमुद्रितांचें मुद्रण जनताजनार्दनाच्या आश्वासन**
**टक लावून आहे.**



# काव्यकौस्तुभांचे मराठी ग्रंथ.

१ **काव्य-कुसुम-कलिका** ( पृ. सं. २०० किं. १ रु. ) सुप्रसिद्ध विद्वान् प्रो. **श्री. नी. चापेकर** यांनीं मार्मिक प्रस्तावना लिहिलेलें व केसरी, सकाळ, चित्रमयजगत् वगैरे नामांकित नियत-कालिकांनीं वाखाणलेलें हें पुस्तक उस्मानिया विद्यापीठानें 'इंटर-मीजिएट ' परीक्षेस नेमलें आहे.

२ **पुष्प-पाकळ्या** ( पृ. सं. ४२५ **किं. १॥ रु.** ) एकाक्षरी वृत्तापासून तों तीस अक्षरी वृत्तापर्यंत सर्व वृत्तांत यशस्वितेनें कविता करण्याचा मान मराठी कवींत फक्त यशवंतरावजींनींच मिळविला असल्यानें त्यांचें हें पुस्तक नव्या जुन्या कवींना, कवितेच्या अभ्यासकांना व वाङ्मयभक्तांना अभ्यसनीय व मार्गदर्शक झालें आहे. सदरहू पुस्तकास पंडित वे. **रंगाचार्य रड्डी शास्त्री** यांची छंदःशास्त्रांतल्या अनेक महत्त्वाच्या प्रश्नांवर अभिनव प्रकाश पाडणारी विवेचक व विद्वत्तापूर्ण प्रस्तावना आहे. पुस्तकाच्या शेवटीं वृत्तपरिचायक परिशिष्ट दिलें असल्यानें अभ्यासूंची विशेष सोय झाली आहे.

३ **सुमनसौरभ** — ( पृ. सं. ३३० कापडी बांधणी किं. २८४ ) महाकवीच्या या मधुर पुस्तकांत अनेक सुरेल चालीवरील व विविध-वृत्तांत ३०० वर भावनोद्दीपक अशा गेय कविता आहेत.

४ **विचारवैभव** — ( पृ. सं. ३२५ किं. २ रु. ) अद्वैत तत्त्व-ज्ञानावरील या अपूर्व गद्य ग्रंथांत सरसकट एकवाक्यता, समाधि, सुषुप्तीचें महत्त्व, स्वप्न व जागृति एकच, सहजमुक्ति, चिद्विलास भावना,

देहशकट, शिक्षण, वाङ्मय, आमचा झोप, विलक्षण आत्मा, ध्येयानु-संधान वगैरे विषयांचें सुलभ विवेचन आहे. **महामहोपाध्याय, वेदांतवागीश** पं. **श्रीधरशास्त्री पाठक** यांनीं "अद्वैताचे सर्व सिद्धांत समजावून सांगणारा अपूर्व ग्रंथ" असें म्हणून या ग्रंथाचा विलक्षण गौरव केला आहे.

५ **कौस्तुभकिरण** — ( किं. दीड रुपाया )

अनेक लघुकथांचा व लघुनिबंधांचा हा मजेदार संग्रह कोणालाही मनोमुग्धकरच वाटेल.

६ **यशोविलास** — या ग्रंथांत निबंध, चरित्रें, परीक्षणें व प्रहसनें वगैरे साहित्यांतर्गत अनेक प्रकार असून प्रत्येकांत कवीच्या सूक्ष्म अध्ययनाची व मूलग्राही बुद्धीची प्रचीति येते. साहित्यसाधकांना व काव्य-कलेच्या आधुनिक तंत्रमंत्रांना संभाळणाऱ्या कोणाही रसिकास हें पुस्तक विचारप्रवर्तक वाटेल यांत शंका नाहीं. ( छापत आहे ).

७ **विरोधाभास** — [ संगीत नाटक ] सुप्रसिद्ध नट व नाटक-कार श्री. त्रिंबकराव कारखानीस यांनीं मुक्तकंठानें प्रशंसा केलेलें हें नाटक लौकरच प्रकाशित होईल. ( अमुद्रित पृ. सं. सुमारें १५० )

८ **मराठी-उर्दू-कोश** – ( लघुकोश ) आजकाल अनेक कारणांनीं उर्दूचें शिक्षण आवश्यक व अपरिहार्य झालें आहे. पण इतक्या कठिण भाषेचें अध्ययन सांग व्हावयास कोशाची असणारी महत्त्वाची उणीव या पुस्तकानें दूर केली आहे. हिंदी, उर्दू, मराठी या तिन्ही भाषेवर सव्यसाची लेखकाचें सारखेंच प्रभुत्त्व असल्यानें कोशाचें काम किती निर्दोष व भाषाभ्यासकांना सुलभ मार्गदर्शक झालें असेल हें सांगणें नकोच. ( अमुद्रित पृ. सं. सुमारें ५०० )

९ काव्य-कुसुम-कलिका ( **चतुर्थोद्भव** ) आतांपर्यंत प्रकाशित झालेल्या तीन उद्भवाहूनही प्रसाद - प्रतिभा वगैरे काव्य-गुणांचें तेज यांत अपूर्वतेनें व सर्वांगपूर्णतेनें पसरलें आहे असें काव्यरसिकांचें मत आहे. ( अमुद्रित पृ. सं. सुमारें ३०० )

---

वृत्तसम्राटांच्या या मराठी ९ ग्रंथांपैकीं अनुक्रमानें ५ ग्रंथ प्रकाशित झाले असून सहावा ग्रंथ '**यशोविलास**' याचें मुद्रणकार्य चालू आहे. आश्रयदात्यांनीं अपेक्षित साहाय्य केल्यास दोन वर्षांत मराठी ग्रंथ - प्रकाशनाचें काम पूर्ण करण्याचा संकल्प आहे.

# सकलकलाकोविद, रहस्यज्ञ कविवर्य –

# कोरेकल यांचे हिंदी व उर्दू ग्रंथ

१ हिंदी काव्यग्रंथ "यशोबिम्ब" — सुलभ आणि मनोहर शब्दरचनेमुळें नित्यपाठ्य होणारा हिंदी मधुर गीतांचा संग्रह.

( अमुद्रित पृ. सं. सुमारें १०० )

२ हिंदी गद्यगुच्छ "सुधांशु" — सध्यांच्या धार्मिक मतमतांतरांच्या गलबल्यांत सकल धर्ममतांचा अपूर्व समन्वय करण्याचें अलौकिक कार्य करणाऱ्या **श्रीमन्मार्तंडमाणिकप्रभुंच्या** खास कृपेनें त्यांच्या 'ज्ञानमार्तंड' या परमोच्च तत्त्वविचारपरिप्लुत वेदांत ग्रंथाचा लेखकानें केलेला प्रासादिक अनुवाद. ( अमुद्रित. पृ. सं. सुमारें ४०० )

३ **आफ़ताबे इरफ़ान** – "सुधांशु" नामक हिंदी वेदान्त-ग्रंथाचें सरस व सुंदर उर्दू रूपांतर. ( अमुद्रित पृ. सं. सुमारें ३०० )

४ **सोजो साज** उर्फ़ **कलामे नुसरत** – उर्दू 'दीवान' ( काव्यग्रंथ ) या पुस्तकाला विद्वन्मान्य अनेकभाषाविशारद महाराजा **सर किसनप्रसाद** ब. यांची विद्वत्ताप्रचुर सुंदर प्रस्तावना आहे या एकाच गोष्टीवरून या कलाकृतीच्या मुग्ध माधुर्याची कल्पना होण्यासारखी आहे. (पृ. सं. १६० किंमत ॥) [ मुद्रित ]

५ उर्दू (संगीत नाटक) **मक्सदे हयात** उर्फ **इश्तियाके तआलीम** – या तीन अंकी नाटकाला मौ. **तालेबअली** साहेब 'नजम' (ज्यांना सम्राट् पंचम जॉर्ज यांच्यापुढें कसीदा वाचण्याचा बहुमान मिळाला होता) यांचें गौरवपूर्ण प्रशस्तिपत्र लाभलें आहे. (अमुद्रित पृ. सं. सुमारें २००)

६ उर्दू (संगीत नाटक) **करिश्मे इश्क** – नाट्यकला-प्रवर्तक मंडळींच्या आग्रहावरून लिहिलेलें (अमुद्रित) पृ. सं. सुमारें १२५

---

**ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें :-**

१ य. स. कोरेकल, शालीबंडा, हैद्राबाद डेक्कन.

२ के. र. काशीकर, आदर्श कार्यालय पो. सांगली

S. M. C.




